शारदाश्रम पुरस्कृत ग्रंथमाला. नं. १८.

म्हाइंभट-संकलित

# श्री गोविंदप्रभु चरित्र

( प्रस्तावना, शब्दकोश, टीपा सूची यासहित )



संपादक

प्रो० विष्णु भिकाजी कोलते

मॉरिस कॉलेज, नागपूर

१९४४

अरुण प्रकाशनः मलकापूर ( वऱ्हाड ).

किंमत २॥ रुपये.

# अनुक्रमणिका



# प्रो. वि. भि. कोलते यांची पुस्तके

१ **लव्हाळीः** जुन्यानव्या वळणांच्या, भावमधुर सरस गीतांचा अभिनव संग्रह. **किंमत १ रुपया.**

२ **स्वस्तिकः** प्रो. कोलते, प्रो. पंडित, श्री. अगरवाल व कै. हर्णे या चार वैदर्भीय कवींच्या काव्यांचा यात अंतर्भाव झालेला आहे. **किंमत ८ आणे**

३ **उद्धवगीताः** सुप्रसिद्ध महानुभावीय कवि भास्करभट्ट बोरीकर याने भागवतातील एकादश स्कंधाच्या आधारे लिहिलेल्या प्राचीन काव्याची पाठांतरादिसहित सर्वांगसुंदर आवृत्ति **किंमत २ रु.**

४ **भास्करभट्ट बोरीकरः** शिशुपालवध, उद्धवगीता इत्यादि काव्यांचा कर्ता भास्करभट्ट त्याचे अधिकृत चरित्र व त्याच्या काव्याचे मार्मिक समालोचन. **किंमत २ रुपये**

५ **रुक्मिणी स्वयंवरः** प्रसिद्ध महानुभावीय कवि नरेंद्र याने लिहिलेल्या काव्याची पाठांतर, विस्तृत प्रस्तावना, टीपा, शब्दकोश इत्यादिसहित अभ्यासकांना सर्व दृष्टींनी उपयुक्त अशी आवृत्ति. **किंमत २॥ रुपये.**

६ **श्री गोविंदप्रभु चरित्रः** एक प्राचीन मराठी गद्यग्रंथ. प्रस्तावना, शब्दकोश, टीपा इत्यादिसहित तयार केलेली सर्वांगसुंदर आवृत्ति. **किंमत २॥ रुपये.**

७ **मराठी दीपिकाः** शुद्ध व सुंदर मराठी लेखन करू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी व लेखकासाठीं अत्यंत उपयुक्त **किं. १। रु.**

८ **सोडचिठ्ठीः** पुरुषपात्रविरहित सामाजिक दोन अंकी नाटक **किं. ८ आणे**

## अरुण प्रकाशन. मलकापूर ( वऱ्हाड )

# प्रस्तावना



## ग्रंथाचे नाव

महानुभाव पंथामधे प्रस्तुत ग्रंथ ‘ ऋद्धिपुर लीळा ’ अथवा ‘ ऋद्धिपुर चरित्र ’ या नावाने प्रसिद्ध आहे. तथापि, त्यात ऋद्धिपुर येथील श्री गोविंदप्रभु यांचे चरित्र वर्णन केलेले असल्यामुळे ‘ श्री गोविंदप्रभु चरित्र ’ याच नावाने मी आज हा प्राचीन गद्यग्रंथ प्रसिद्ध करीत आहे. महानुभावीय प्राचीन लेखकामध्ये अनेकदा अशी प्रवृत्ति आढळून येते की, ग्रंथाला नाव ठेवतांना चरित्र नायका ऐवजी तो ज्या गावचा असेल त्या गावाच्या नावानेच त्याचे चरित्र ओळखले जावे. उदाहरणार्थ, ‘ श्रीचक्रपाणी चरित्र ’ या नावाने महानुभावीयेतर मंडळी ज्या लीळा ओळखतात त्या वस्तुतः ‘ द्वारावतीचिया लीळा ’ म्हणूनच महानुभावात प्रसिद्ध आहेत. कारण श्रीचक्रपाणी यांनी आपल्या आयुष्याचा बराच काळ द्वारावती येथे घालविला होता. तद्वत, श्री गोविंदप्रभु हे ऋद्धिपुर येथील असल्यामुळे, त्यांचे सगळे आयुष्य ऋद्धिपुर येथे गेल्यामुळे त्यांच्या लीळांना ‘ ऋद्धिपुर लीळा ’ असे नाव महानुभावीयांनी दिलेले आहे. प्रस्तुत मुद्रित ग्रंथाच्या शेवटी छापलेल्या समाप्तिलेखातील ... ‘ ऋद्धिपुर लीळा संपूर्ण ’ या वाक्यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. इतर पोथ्यांच्या शेवटी सुद्धा असेच उल्लेख आढळतात. तथापि ग्रंथातील विषयाच्या दृष्टीने ‘ श्री गोविंदप्रभु चरित्र ’ याच नावाने प्रस्तुत चरित्रग्रंथ अभ्यासकासमोर येणे इष्ट आहे असे मला स्वतःला वाटल्यावरून प्रस्तुत ग्रंथाला मीने तेच नाव निश्चित केले आहे.

## संपादनः मूळ हस्तलिखिते

प्रस्तुत चरित्रग्रंथाची संहिता तयार करतांना मला अनेक पोथ्या मिळाल्या. पण त्यांतील अत्यंत प्राचीन अशा प्रामुख्याने तीन पोथ्या निवडून त्यांच्या आधारे मीने ही संहिता तयार केली आहे. पैकी एका पोथीच्या शेवटी “ शके ॥ १४९५ श्रीमुख संवत्सरे कार्तीक मासे कृष्ण पक्षे प्रदिपदीयां पून्य तीथौ भृंगदीने ऋद्धिपुर लीळा संपूर्ण ” असा समाप्तिलेख आहे. गतशक १४९५ ला श्रीमुख संवत्सर बरोबर येतो. तथापि ‘ भृंग ’(?) दिन

असा निरर्थक शब्द पडलेला असल्यामुळे वार कोणता ते कळत नाही आणि त्यामुळे ही मिती तपासून पाहता येत नाही. ‘मंगळ’ या शब्दाऐवजी चुकून ‘भृंग’ शब्द लिहिला जाणें शक्य आहे. तसे असल्यास ही मिती बरोबर ठरेल. कारण शके १४९५ श्रीमुख संवत्सर कार्तीक वद्य प्रतिपदेला पिल्ले यांच्या जंत्री-नुसार बरोबर मंगळवारच येतो. तेव्हां शकसंवत्सराच्या मेळावरून प्रस्तुत पोथी सुमारे चारशे वर्षांची जुनी आहे यात शंका नाही. हीच पोथी मींने प्राधान्याने आधाराला घेतली आहे. दुसऱ्या पोथीवर समाप्तिलेख नाही. तथापि पानांच्या जीर्णतेवरून तीहि इतकीच जुनी असावी असे वाटते. या दुसऱ्या पोथीत असलेले महत्त्वाचे पाठभेद त्या त्या ठिकाणीं ( ) अशा कंसात नमूद केले आहेत. मजकुराच्या दृष्टीने या दोन्ही पोथ्यांची जवळजवळ एकवाक्यता आहे. आधाराला घेतलेल्या तिसऱ्या पोथीतील पाठभेद [ ] अशा कंसात दिलेले आहेत.

## इतर हस्तलिखिते

या दोन पोथ्याव्यतिरिक्त इतर पोथ्यातून देखील मजकुराच्या दृष्टीने फारसा फरक नाही. क्वचित, शके १४९५ च्या पोथीत जेथे एक लीळा आहे तेथे त्याच मजकुराच्या दोन लीळा इतर पोथ्यात आढळतात. तर उलट १४९५ च्या पोथी-तील दोनदोन लीळांचा मजकूर एकाच लीळेत इतर पोथ्यांच्या लेखकांनी आण-लेला आढळतो. यामुळे एकंदर लीळांच्या संख्येत बरीच भिन्नता दिसून येते. तथापि लीळांची संख्या भिन्नभिन्न असली तरी साधारणपणे मजकूर मात्र सारखाच आहे. कोणत्या पोथीत किती लीळा आहेत, कोणत्या पोथीलेखकाने एकेका लीळेचा मजकूर दोन लीळात, तर दोनदोन लीळांचा मजकूर एकाच लीळेत दिला आहे वगैरे गोष्टी तादृश महत्त्वाच्या नसल्यामुळे तो घोळ मींने या ठिकाणी घातलेला नाही. याचे एक कारण असे की, ऐतिहासिक दृष्टया श्रीगोविंदप्रभु चरित्राला जवळजवळ मुळीच महत्त्व नाही असे म्हटले तरी चालेल. महत्त्वाचा असा एकहि ऐतिहासिक उल्लेख या ग्रंथांत आढळत नाही. यातील बहुतेक आख्यायिका म्हणजे श्रीगोविंदप्रभूच्या वेडपिसेपणाच्या व चमत्कारांच्या वृत्तांताने भरलेल्या आहेत. या आख्यायिकांना महानुभावीय लोकांच्या दृष्टीने महत्त्व असले तरी जगातील विचिकित्सक अभ्यासकाच्या दृष्टीने फारसे महत्त्व नाही. याचमुळे काही पोथ्यातून

आढळणारा थोडाफार कमीअधिक मजकूर काटेकोरपणाने निवडून काढून तो नमूद करण्याची आवश्यकता वाटली नाही. हा कमीअधिक झालेला मजकूर म्हणजे श्रीगोविंदप्रभूच्या वेडेपिसेपणाची किंवा चमत्काराची एखाददुसरी आख्यायिका त्रोटक किंवा विस्तृत स्वरूपात आढळायची एवढेच. त्यापासून दुसरा फायदा महानुभावीयेतर वाचकांना काहीच नाही. शिवाय दुसरे असे की श्री गोविंदप्रभूसंबंधीचा सर्व मजकूर शके १४९५ च्या प्रतीत अंतर्भूत झालेलाच आहे. त्यामुळे इतरांच्या दृष्टीने काय किंवा खास महानुभावीयांच्या दृष्टीने काय त्यांना श्री गोविंदप्रभूचे समग्र चरित्र प्रस्तुत प्रतीवरून पाहायला सापडतेच !

## हे संपूर्ण चरित्र नव्हे

'समग्र चरित्र' असें वर जे म्हटले ते अक्षरशः मात्र खरे नाही. कारण श्री गोविंदप्रभूसंबंधीच्या सर्वच आख्यायिका यांत अंतर्भूत झालेल्या आहेत असे नाही. उदा:—हरिपाळ देवाच्या व गोविंदप्रभूच्या प्रथम भेटीचा महत्वाचा प्रसंग[1] यात आलेला नाही. तसेच नागांबिकेला भेट दिल्यानंतर पैठण येथे कांही दिवस राहून मग श्रीचक्रधर स्वामी रितपुरला आले तो प्रसंग[2] व तेव्हांच्या आख्यायिका त्यांनाहि यात स्थळ मिळालेले नाही. इतकेच नव्हे तर श्री चक्रधर स्वामी व गोविंदप्रभू यांच्या विषयीच्या आख्यायिकांचा यात काहीच आढळ होत नाही. या सर्व आख्यायिका लीळाचरित्रांत अंतर्भूत झालेल्या आहेत. याचे कारण असे दिसते की, प्रारंभी लीळाचरित्राचे लेखन झाल्यामुळे श्रीचक्रधर व श्री गोविंदप्रभु-यांच्या परस्पर भेटी वगैरे विषयीच्या आख्यायिका त्याच ग्रंथांत घातल्या गेल्या. अर्थात्, त्याच लीळांची पुनरावृत्ति गोविंदप्रभु चरित्रांत करण्याचे कारण नव्हते. त्याचप्रमाणे एकदोनदा श्री चक्रधर स्वामींनी नागदेवाला श्री गोविंदप्रभूच्या सेवेसाठी रितपुरला पाठविले होते. त्यावेळी घडलेल्या आख्यायिका[3] नागदेवाने श्री चक्रधराजवळ सांगितलेल्या असल्यामुळे त्यांचाहि समावेश लीळाचरित्रात असणे साहजिक आहे. श्री चक्रधराच्या प्रयाणानंतर सर्वच भक्तजन रिद्धपुरला

---

१ लीळाचरित्र. एकांक. ( श्री. नेने यांनी संपादलेले ) पृ. ५ पहा.

२ लीळाचरित्र. पूर्वार्ध खंड १ लें पृ. १८ ते २१ पहा.

३ लीळाचरित्र. उत्तरार्ध 'भट रीधपुरा पाठवणे' वगैरे आख्यायिका.

येऊन श्रीप्रभूची सेवा करूं लागले. त्या वेळी घडलेल्या आख्यायिका, म्हणजे श्रीचक्रधरस्वामीच्या प्रयाणापासून तो श्रीगोविंदप्रभूच्या मृत्युपर्यंत नागदेव, म्हाइंभट, आबाइसा, आउसा वगैरेंच्या सान्निध्यातील सर्व आख्यायिका या गोविंदप्रभूचरित्रांतच आलेल्या असल्या पाहिजेत. स्मृतिस्थळांतदेखील काही आख्यायिका आलेल्या आहेत. विशेषतः ' म्हाइंभट--दास्या होड घाली म्हणणे ' ही (२४७ वी) स्मृति पहा. तेथे तर ' हे स्मृति श्रीप्रभु गोसावी असतां ऋद्धिपुरी जाणावी[४] '' असे स्पष्ट म्हटले आहे. सारांश श्री गोविंदप्रभु चरित्राव्यतिरिक्त इतरत्रहि श्रीप्रभूविषयीच्या आख्यायिका विखुरलेल्या आहेत. त्या लक्षांत घेतल्यावाचून त्यांचें समग्र चरित्र ध्यानांत येणे शक्य नाही.

## महानुभावीय पोथ्यातील लेखन पद्धति

या ठिकाणी एका गोष्टीचा थोडा विचार करायचा आहे. ती गोष्ट म्हणजे महानुभावीय पोथ्यातील लेखन पद्धति. कारण या लेखन पद्धतीविषयी बराच गैरसमज झालेला दिसतो. ' यादवकालीन मराठी भाषा ' या आपल्या भाषाशास्त्रीय ग्रंथात डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी महानुभाव वाङ्मयाचे भाषाशास्त्रदृष्ट्या महत्त्व वर्णन करतांना असे एक विधान केले आहे की, ' महानुभावांच्या पोथ्यात टिंबद्वयाने (:) शब्द आणि त्याचे साधित रूप यातील भिन्नपणा दाखविला जातो. या विशिष्ट लेखनपद्धतीमुळे नामे व त्यांचे प्रत्यय ही अलग काढण्यास मदत होते. उदा. ' चक्रधर ' या नामाची चतुर्थी ' चक्रधरा:सि, ते ' अशी व तृतीया ' चक्रधरें: सि ' अशी दाखविली जाईल, चान्त रूपेही अशीच वेगळी काढतात व मानतात. ' (पृ. ९) डॉ. तुळपुळे यांचे हे विधान अगदी चुकीचे आहे. महानुभावीय पोथ्याशी ज्यांचा प्रत्यक्ष परिचय आहे असा कोणीहि अभ्यासक सहज सांगू शकेल की, शब्द व त्याचे साधित रूप यातील भिन्नपणा महानुभावीय पोथ्यात टिंबद्वयाने मुळीच दाखविला जात नाही. इतकेच नाही तर शब्द देखील न तोडता वाक्ये लिहिण्याची पद्धत या पोथ्यात आढळते. वाक्याचा शेवट मात्र टिंबद्वयाने दाखविला जातो. क्वचित जेथे अनेक वस्तूंची किंवा व्यक्तींची नावे आलेली असतात तेथे ती टिंबद्वयांने तोडून लिहिलेली

---

४ स्मृतिस्थळ ( संपा. वा. ना. देशपांडे ) पृ. ७५ पहा.

आढळतात. उदा. 'मग मांडे पुरीयाः घारीयाः वडेः उंबरेः ऐसे'...(गोप्रच. पृ. ७६) एरवी टिंबद्वयाने वाक्याचा शेवट दाखविला जातो हे प्रस्तुत ग्रंथातील कोणत्याहि आख्यायिकेत पहायला सापडेल. प्रत्ययापूर्वी टिंबद्वय कुठेच आढळत नाही. महानुभावीय पोथ्या पाहून ही गोष्ट डॉ. तुळपुळे यांना सहज पारखून पाहता आली असती; किंवा, अशा पोथ्यांची जी चारदोन छायाचित्रे प्रसिद्ध आहेत त्यावरूनहि ती निश्चित करता आली असती. उदा. महाराष्ट्र सारस्वत भाग १ मधे महानुभावीय लिपींची चार छायाचित्रें आहेत ती पहावी. शारदाश्रम वार्षिक (यवतमाळ); भास्करभट्ट बोरीकर; 'संशोधक' त्रैमासिक (धुळे) वर्ष ५ अंक १ व २ मधेहि काही पोथ्यांची छायाचित्रे आहेत. या सर्वांवरून डॉ. तुळपुळे यांना सहज दिसून आले असते की, विभक्तिप्रत्यय टिंबद्वयाने तोडून लिहिण्याची पद्धति महानुभावांच्या पोथ्यात नाही.

यातील वस्तुस्थिति अशी दिसते की, डॉ. तुळपुळे यांनी कै. राजवाडे यांच्या मताचा सरळ अनुवाद केलेला असावा. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शके १८३७ च्या वार्षिक इतिवृत्तात (पृ. ७० वर) राजवाड्यांनीहि असेच विधान केले होते. पण त्यांचेहि ते विधान चुकीचे आहे. वस्तुस्थिति अशी की, महानुभावीय पोथ्यात काही शब्दांचे व नावांचे संकेत वापरले जातात. हे संकेत मागे व पुढे टिंबद्वय देऊन लिहिलेले असतात. अशा नावाच्या संकेतापुढे, असल्यास, विभक्तिप्रत्यय जोडलेला असतो. उदा. सुंदरी लिपीत :ओड: हा संकेत 'श्री चांगदेव राउळ' या नावासाठी आहे. आता याला विभक्तिप्रत्यय जोडतांना साहाजिकच ":ओडा: ङ्गा" (चा) असे होणार. यात 'चा' हा विभक्तिप्रत्यय तोडून दाखविण्यासाठी त्याच्यामागे टिंबद्वय येते ही राजवाड्यांची समजूत चुकीची आहे. सांकेतिक संपूर्ण शब्दाव्यतिरिक्त इतरत्र विभक्तिप्रत्यय तसे लिहिलेले नाहीत यावरून ही गोष्ट त्यांच्या लक्षात यायला पाहिजे होती. पण तिकडे त्यांचे लक्ष गेले नाही याचे आश्चर्य वाटते! अथवा यात आश्चर्य तरी कसले? या गोष्टीकडे त्यांनी लक्ष दिलें असते तर 'चा' हा षष्ठीचा प्रत्यय मानणाऱ्या "आधुनिक अडाणी वैयाकरणांना" दोष देण्याची संधी त्यांना कशी मिळाली असती! सारांश, महानुभावीय पोथ्यात विभक्तिरूपे तोडून लिहिली जातात व शब्दांचा आणि रूपांचा हा भिन्नपणा टिंबद्वयाच्या योगाने दाखविला जातो असे

चुकीचे विधान प्रथम कै. राजवाडे यांनी केले व डॉ. तुळपुळे यांनी त्या विधानाचाच अनुवाद केला. अद्यावत् शास्त्रीय ग्रंथ लिहिणाऱ्या डॉ. तुळपुळ्यांनी आधुधिक उपलब्ध साहित्याचा उपयोग करून कै. राजवाडे यांचे हे विधान तपासून पाहणे अवश्य होते. पण त्यांनी तसे केले नाही ही दुर्दैवाची गोष्ट होय !

अशा चुकीच्या समजुती होऊ नयेत म्हणून काही गोष्टी या ठिकाणी पुन्हा स्पष्ट करणे अवश्य आहे. त्या अशा की, प्रस्तुत प्राचीन चरित्र ग्रंथ छापताना केवळ वाचकांच्या सोयीसाठीच शब्द तोडून छापण्यात आलेले आहेत, मुळात ते न तोडता सरळ ओळीत लिहिलेले आहेत. शिवाय कंस व त्याचे अनुचर, म्हणजे अवतरण चिन्हे, प्रश्नचिन्हे, उद्गारवाचक चिन्हे वगैरेहि वाचनाच्या सोयीसाठीच वापरलेली आहेत. ती मुळात आहेत अशी समजूत कोणीहि करून घेऊ नये. टिंबद्वय मात्र मूळ पोथ्यात आढळतात त्या प्रमाणे कायम ठेवलेले आहेत. 'आदि' (=प्रत्येक आख्यायिकेचा मथळा देणोरे वाक्य ) व 'आख्यायिका' यांच्या शेवटच्या उभ्या रेषाहि मुळातल्याच आहेत.

**ग्रंथमहत्त्व :**

ऐतिहासिक उल्लेखांचा प्रस्तुत ग्रंथात अभाव असला तरी त्याचे महत्त्व इतर अनेक दृष्टींनी अपूर्व आहे. महानुभावीयांच्या धर्मप्रवर्तकांपैकी एका ईश्वरावतारी पुरुषाचे चरित्र या दृष्टीने हा ग्रंथ सर्वांना अभ्यसनीय वाटेल. प्राचीन चरित्र वामङ्याचा इतिहास लक्षात घेण्यासाठी, अशा वाङ्मयाच्या निर्मितीचा हेतु व रचनापद्धति अभ्यासण्यासाठीहि या ग्रंथाचा चांगला उपयोग होईल. प्राचीन मराठी गद्याचा नमुना म्हणून तर भाषाभ्यासकांना हा ग्रंथ नव्हाळीचा वाटेल. पण माझ्या दृष्टीने या ग्रंथाच्या नव्हाळीचे कारण अगदी आगळे आहे. प्रस्तुत ग्रंथाचे चरित्रनायक श्रीगोविंदप्रभु खास वऱ्हाडातील, म्हणजे उमरावती जिल्ह्यातील रितपूर या गावचे असल्यामुळे त्यांच्या व त्यांच्या वऱ्हाडी भक्तजनांच्या तोंडी आलेल्या शब्दप्रयोगावरून व वाक्यप्रयोगावरून तत्कालीन वऱ्हाडी भाषेचे स्वरूप काही बाबतीत तरी निश्चित करण्याला या ग्रंथासारखे दुसरे कोणतेच साधन नाही. लीळाचरित्रापेक्षाहि या बाबतीत या ग्रंथाची नव्हाळी निराळीच आहे. श्रीचक्रधरस्वामी 'मराठी अनवरत बोलत' असत हे खरे.

पण किती झाले तरी ते मूळचे गुजराथी असून इकडे केवळ स्थायिक झालेले होते. शिवाय त्यांचे पर्यटन नुसत्या वऱ्हाडातच नव्हे तर उभ्या महाराष्ट्रांत होते. महाराष्ट्राबाहेरील आंध्र (तेलंगण) व कन्नड प्रांतातहि त्यांनी बरेच दिवस घालविले होते. त्यामुळे या बाहेरच्या प्रांतातील, विशेषतः गुजराथ, खानदेश, आंध्र व तेलंगण या प्रांतातील भाषांचा परिणाम त्यांच्या मुखीच्या मराठीवर झाला असणे शक्य आहे. त्यांच्या तुलनेने गोविंदप्रभूचे कार्यक्षेत्र अगदी लहान. त्यांनी फारसा प्रवास केलेला नव्हता. भक्तजनासहित एकदा ते फिरस्ती (कटके) साठी गेले होते. पण त्यांनी ज्या ज्या स्थळांना भेट दिली ती सर्व स्थळे उमरावती जिल्ह्यातच आहेत. तेव्हा त्यांच्या भाषेवर इतर भाषांचा परिणाम झाला असणे संभवनीय नाही. म्हणूनच त्यांच्या व त्यांच्या खास वऱ्हाडी भक्तजनांच्या तोंडच्या भाषेवरून तत्कालीन शुद्ध वऱ्हाडीचा अभ्यास करणे सोयीस्कर झाले आहे. या ग्रंथाचे लेखन रितपुरलाच झाले हीहि गोष्ट या दृष्टीने अभ्यासकाला उपकारक होईल. सारांश, प्राचीन वऱ्हाडीचा एक नमुना म्हणून हा ग्रंथ अभ्यासकांना नवलाईचा वाटेल यात शंका नाही.

### भौगोलिक महत्त्व

याशिवाय प्रस्तुत ग्रंथाला भौगोलिक महत्त्वहि बरेच आहे. विशेषतः अमरावती जिल्ह्यातील कितीतरी छोट्यामोठ्या गावांची नावे यात आलेली आहेत. त्यातील काहींची तर वर्णने व थोडीफार माहितीहि या ग्रंथावरून आपणाला मिळू शकते. या माहितीला ऐतिहासिक महत्त्व नसले तरी प्रादेशिक महत्त्व खात्रीने आहे. त्यावरून विदर्भाच्या प्राचीन वैभवाची अभ्यासकांना चांगली कल्पना येऊ शकेल.

अमरावती जिल्ह्यातील पुढील गावांची नावे प्रस्तुत ग्रंथात आलेली आहेत. रिधपुर, काटसुरे, माहुरे, देउळवाडा, सोनोरी, नाणौरी, कुऱ्हे, अळजपुर, खेड, बेलोरा, अनदुरा, सीराळा, पुसदा, ब्राह्मणवाडा, नांदगाव, अंजनगाव, उमरावती, राहाटगाव, भानुखेडे, माळधरा, तिवसा, सेंदुरजना, भीस्नौर, गव्हाण, आखतवाडा, सीरखेड, तळेगाव वगैरे. आपल्या चरित्रनायकाचे क्रीडास्थान म्हणून अर्थातच रिधपुरविषयी बरीच माहिती यात आढळते. रिधपुरलाच 'रीधौर' (२४७, २८१, ३२२) असेहि म्हणत. इतर एक दोन पोथ्यात तर रिध-

पुरलाच 'रुद्रपुर' म्हणून म्हटले आहे. प्रस्तुत गाव आज एक लहानसे खेडे असले तरी पूर्वी फार मोठे असले पाहिजे. कारण यातील सोवनहाट, कासारहाट, सिंपेहाट, रांधवनहाट, वगैरे निरनिराळ्या हाटांची म्हणजे बाजार पेठांची वर्णने प्रस्तुत ग्रंथात आहेत. त्यावरून व्यापाराची ही एक मोठीच पेठ असावी असे दिसते. धार्मिक दृष्ट्याहि या गावाला पुष्कळ महत्त्व असावे. प्रस्तुत चरित्र ग्रंथातच, काही नाही तरी निरनिराळी साठ देवळे रिधपुरात असल्याचे उल्लेख आहेत. अशा धार्मिक महत्त्वाच्या गावाकडे औरंगजेबासारख्या कडव्या मुसलमानाचे लक्ष जाणे साहजिक होते. आणि तसे ते गेलेहि. त्याचाच परिणाम असा झाला की, श्रीगोविंदप्रभूच्या मालकीचा राजमठ आज रिधपुरला मशिदीच्या रूपाने दृष्टीस पडतो ! देवाळे या नावाचा एक मोठा तलाव या गावी होता. या तलावाच्या काठावरच किती तरी देवळें होती. आज हा तलाव वगैरे सर्व काही नामशेष झालेले आढळते ही दुर्दैवाची गोष्ट होय !

" श्रीमन्महोपाध्यायाम्नाय दिक्षीत विराटदेशोपनामालंकृत कृष्णमुनिना विरचित " 'रुद्धिपुर माहात्म्य' या ग्रंथात तर रिधपुरचे पौराणिक महत्त्व फार वर्णन केले आहे. त्याच्या मते जमदग्नि, परशराम वगैरे ऋषींचे आश्रम याच गावाला होते. हिरण्यकशिपूचा वध केल्यानंतर, त्या ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्ति मिळविण्यासाठी नरसिंहाला रिधपुर येथील देवाळे तलावात हात धुण्यासाठी यावे लागले होते, इतके त्या तलावाचे आणि अनुषंगाने रिधपूरचे पावित्र्य ! ही सर्व पौराणिक स्वरूपाची वर्णने आहेत इतके लक्षात घेतले म्हणजे पुरे. तथापि ती तपासून पाहिली पाहिजेत हे मात्र खरे. दंतकथेनुसार, हिरण्यकशिपूचा वध केल्यानंतर नरसिंह ज्या ठिकाणी हात धुवायला आला ते ठिकाण आपल्या उमरावती जिल्ह्यातीलच देउळवाडा येथे होते. त्यालाच ' करशुद्धितीर्थ ' असे आजहि म्हणतात. त्याजवळच नरसिंहाचे एक अत्यंत जुने देऊळ आज विद्यमान आहे. तेव्हा नरसिंहाचे करशुद्धितीर्थ ' देउळवाडा ' की रिधपुर येथील ' देवाळे ' ?

वरील प्रश्नाचे उत्तर एकदम देता येणे कठिण असले तरी निरनिराळ्या स्थळाविषयीची असेल ती माहिती प्रथम गोळा होणे हे मात्र आवश्यक आहे. रितपुर, देउळवाडा, अळजपुर ( = एलिचपुर ) वगैरे महत्त्वाच्या स्थळांची माहिती अनुषंगाने या चरित्र ग्रंथात आलेली आहे. ती याच दृष्टीने मला महत्त्वाची

वाटते. ‘ आंनदुरा ’ हे आज उपेक्षणीय असे लहानसे खेडे असले तरी तेथील ‘ रणराखस कांइदरणा ’ याच्या दातृत्वाची कहाणी ( २२७ ) वाचून कुणालाहि आनंद वाटेल. तेराव्या शतकात ‘ दरणा ’ आडनावाची पुष्कळ घराणी वऱ्हाडात होती. अळजपुर अथवा एलिचपुरचा रामदरणा, त्याचा मुलगा नरसिंगदरणा ( ९९ ), वर उल्लेखलेला कांइदरणा, जगळदरणा ( २६२ ) यावरून हे दिसून येईल. या सर्व व्यक्ति उमरावती जिल्ह्यातील होत्या. अशा प्रकारची बरीचशी माहिती या चरित्रग्रंथावरून मिळणे शक्य असल्यामुळे वैदर्भियांना हा ग्रंथ महत्त्वाचा वाटेल यात शंका नाही.

## प्रस्तुत चरित्र ग्रंथाचा लेखक व लेखनकाल.

श्रीगोविंदप्रभुचरित्राचा मूळ लेखक कोण असावा याविषयी खुद्द महानुभावीय ग्रंथलेखकात एकमत दिसत नाही. ‘ इतिहास प्रकरणांत ’ “ मग श्रीप्रभु ( गोविंदप्रभु ) बांजें केलेया नंतरें महीभटीं भटातें पूसोनि श्रीप्रभुचीया लीळाः लीहीलीयाः भक्ताचीये अनूभवीचीया भक्ता पूसीलीयाः जनाचीया अनूभवीचीया जनासि पूसीलीयाः तयाचीया आदी केलीयाः श्रीप्रभु मागें सा मास ऋद्धीपुरी होतेः मग भट ऋद्धीपुरी व्यवस्था करूनि मातापुरा नीगाले[१]” असा उल्लेख आहे. त्यावरून श्रीगोविंदप्रभूच्या मृत्युनंतर सहा महिन्यांच्या आंत म्हांइंभटांनी ऋद्धीपुर चरित्र ‘ लिहिले ’ असे दिसते. स्मृतिस्थळांत लीळाचरित्रांतील आख्यायिका गोळा करण्यासंबंधीच्या जशा स्मृति आहेत तशा ऋद्धिपुरचरित्रासंबंधीच्या नाहीत. तसेच लीळाचरित्राचा पूर्वार्ध व उत्तरार्ध महीभटानीच रचला असे जसे स्पष्ट म्हटले आहे तसे ऋद्धिपुरचरित्राच्या लेखनासंबंधी स्पष्ट काहीहि म्हटलेले आढळत नाही. अन्वयस्थळादि ग्रंथांतदेखील ऋद्धिपुरचरित्र म्हांइंभटानी रचले असे स्पष्टपणे कुठे म्हटलेले आढळले नाही. उलट नायंबासाचा शिष्य दामोदर मुनि याने टाचलेल्या ‘ वृद्धाचार अन्वयात ’ पुढील उल्लेख आढळतो. “ म्हांइंभटी भटा विद्यमान श्रीप्रभु गोसावियाच्या ( = गोविंदप्रभूच्या ) सन्निधानीं इतिहासरूप आन निरुक्तरूप पूर्वार्धरूप ए तीनि रूपे अन्वयी लाविली : तयाची आदी केलिया : तया उपरि भटा विद्यमान केशराजबासी उत्तरार्धरूप आन ऋद्धपुररूप ए दोनी

---

१ महानुभावांचे चरित्र-ग्रंथ : श्री. य. खु देशपांडे, भा. इ. सं. मंडळ त्रै. वर्ष १३ अंक २.

रूपे अन्वयी लाविली : तयार्चीया आदि केलीया!" या उल्लेखावरून ऋद्धिपूरचरित्र केशराजबास=केसोबासाने संकलित केले असावे असे दिसते. मग खरे काय?

अन्वयस्थळादि ग्रंथांत ऋद्धिपुरचरित्र जसे स्पष्टपणे म्हाइंभटाच्या नांवावर नाही तसे ते केसोबासाच्याहि नांवावर नाही. स्मृतिस्थळांतील आख्यायिकेत-देखील केसोबासाने ऋद्धिपुरचरित्र संकलित केल्याच्या या कथेचा पुरावा मिळत नाही. किंबहुना या दामोदरमुनीची बरीचशी माहिती चुकीची दिसते. उदाः— लीळाचरित्राचा उत्तरार्धदेखील केसोबासाने अन्वयी लाविला असे तो म्हणतो. ते तर अगदी उघड उघड चूक आहे कारण इतिहास प्रकरणांतच नाही तर इतरत्रहि लीळाचरित्राचे पूर्वार्ध व उत्तरार्ध हे दोन्ही भाग म्हाइंभटाच्याच नांवावर आहेत. स्मृ. स्थ. १४१ मधे " मग उत्तरार्ध–पूर्वार्ध दोनि विभाग केले " असे स्पष्ट म्हटले आहे. ओंकाराने गुंफिलेल्या ओवीबद्ध वृद्धाचारातदेखील ' उत्तरार्ध पूर्वार्धे शोधुनिया लीळा : लाविला शांखळा : दोही रूपा ॥ ऐसा म्हाइदेवो... ... ..." ( ४४;४५ ) असाच उल्लेख आहे सोंगोबासाच्या अन्वयस्थळांत " आन तिन्ही रूपें चरीत्रें म्हांइंभटी केली " असे म्हटले आहे. या तिन्ही रूपांत लीळाचरित्र पूर्वार्ध, उत्तरार्ध व ऋद्धिपूरचरित्र यांचा अंतर्भाव होतो असे वाटते. इतिहास-प्रकरणांत पाचहि रूपे म्हाइंभटानी लिहिली असा जो निर्देश आहे तो बरोबर नाही ही पाच रुपे म्हणजे लीळाचरित्राचा पूर्वार्ध; उत्तरार्ध; अकरा प्रकरणाच्या निरु-पणाचीं चरित्रें (=निरुक्त म्हणजेच 'प्रकरण वश' ); इतिहास आणि ऋद्धिपूरचरित्र ( महानुभावांचे चरित ग्रंथ ' हा लेख पहा ). दुतोंडे दत्तोमुनीच्या अन्वयस्थळांत " यापरी चरित्राचे इतिहास, पूर्वार्ध, उत्तरार्ध, निरुक्त तथा ऋद्धपूर ऐसी पांचीं रूपें घोकिले " या उल्लेखावरून हीं पांच रूपें कोणती तें स्पष्ट होईल. या पांच रूपापैकी सोंगोबासाने उल्लेखिलेलीं तीन रूपें कोणती ? माझ्यामतें १ लीळाचरित्र पूर्वार्ध, २ उत्तरार्ध व ३ ऋद्धिपूरचरित्र; हीच ती तीन रूपे होत. कारण या पाचहि रूपापैकी चरित्रात्मक रूपे ती ही तीनच होत. इतिहास रूप ( =प्रकरण) म्हणजे कांही चरित्र नव्हे आणि तिसऱ्या ( = प्रकरण वश म्हणजेही कांही चरित्र नव्हे केसोबासानं सूत्राची निवड केल्यानतर त्या त्या सूत्राचा प्रकरणवश निरुक्त ग्रंथांत आहे. त्यांत चरित्रांतीलच निरनिराळी प्रकरणे आहेत. तथापि तो स्वतंत्र असा चरित्रग्रंथ नव्हे. या दृष्टीने पाहता सोंगोबासाने उल्लेखिली तिन्हीरूपें चरित्रें

म्हणजे लीळाचरित्राचा पूर्वार्ध, उत्तरार्ध व ऋद्धिपुरचरित्र हीच होत असे मला वाटते. ही म्हांइंभटाने रचलेली असल्याचा इतिहास प्रकरणाचा व सोंगोबासाच्या अन्वयस्थळाचा निर्वाळा असल्यामुळे ऋद्धिपूरचरित्राचा मूळ लेखक अथवा संकलनकार म्हांइंभटच होय असे ठरते.

याला दुसरे एक असे कारण देता येईल की ऋद्धिपुर अथवा श्रीगोविंदप्रभूच्या आख्यायिका संकलित करायला त्यावेळी म्हांइंभटच योग्य पुरुष होता. कारण श्रीप्रभूचाच तो शिष्य होता.— पंथांत येण्याची स्फूर्ति त्याला श्रीचक्रधरापासून झालेली असली तरी त्याने दीक्षा घेतली होती ती श्रीगोविंदप्रभुजवळ आणि तेव्हापासून तो श्रीगोविंदप्रभूच्या मृत्युपर्यंत तो त्यांच्याच सान्निध्यात होता. " म्हांइंभटाते श्रीप्रभुदास्यावेगळे जो दाखवी तयांसि मी महावाक्य वाखाणीन " (स्मृ. स्थ. २४७) या नागदेवाच्या ' होडे ' वरून देखील हेच दिसते. तेव्हा गोविंदप्रभूचें चरित्र त्यानेच लिहिलें असणें शक्य आहे. कारण त्याने बऱ्याच लीळा अनुक्रमलेल्या होत्या. शिवाय एकंदर लीळासंकलनाचे कार्य त्याने आपल्या अंगावर घेतले होते. तेव्हा श्रीप्रभूच्याहि लीळा त्यानेच संकलित केल्या असल्या पाहिजेत. याच्या भरीला इतिहासप्रकरण व सोंगोबासाचे अन्वयस्थळ यातील उल्लेख घातले म्हणजे ऋद्धिपुर ऊर्फ श्रीगोविंदप्रभु चरित्राचा मूळ लेखक म्हांइंभट होय असे ठरते. या ग्रथाचे लेखन श्रीप्रभूच्या मृत्युनंतर सहा महिन्यांत झाले म्हणून इतिहासप्रकरणांत जो उल्लेख आहे तो ग्राह्य मानायला काही हरकत दिसत नाही. प्रथम श्रीगोविंदप्रभूच्या निधनशकाविषयी विचार करूं.

## श्रीगोविंदप्रभूचा निधन शक

श्री. वा. ना. देशपांडे यांनी " शके १२०७ व्ये संवत्सरे भाद्रपद शु॥ अष्टमी जेष्ठा नक्षेत्र ' (ऋद्धिपुर वर्णन पा. १४०) या मितीच्या उल्लेखावरून चालू शक १२०८ हा गोविंदप्रभूचा निधन शक निश्चित केला आहे. पण तो पूर्णपणे बरोबर नाही. कारण शके १२०७ ला व्यय संवत्सर येत नाही. १२०७ हा शक गत मानला तरी चालू १२०८ लाहि व्यय संवत्सर येत नाही. तर गत १२०८ ला म्हणजे चालू १२०९ ला व्यय संवत्सर येतो. श्री. देशपांडे यांच्या मितीत मूळ शक संवत्सराचाच मेळ पडत नाही. दुसरे असे की, गोविंदप्रभूच्या मृत्यूचा श्री. देशपांडे यांनी उल्लेखिलेला तेवढाच शक

पंथात प्रचलित आहे असे नाही. खुद्द पंथीयातच या बाबतीत मतमतांतरे आढळतात. गोविंदप्रभूच्या निधन शकाचे निरनिराळ्या पोथ्यातून मला पुढील उल्लेख आढळले:—

(१) श्री. वामनराव देशपांडे यांनी उल्लेखिलेला "शके १२०७ व्ये संवत्सरे भाद्रपद शुद्ध अष्टमी जेष्टा नक्षेत्र अवसी पाहारात श्रीप्रभु बीजे केले" हा उल्लेख. हीच मिती श्रीगोपिराजग्रंथसंग्रहातील एका स्थानपोथीत व ऋद्धिपुर चरित्राच्या पोथीतहि आहे.

(२) श्री. दिवाकर बुवा महंत, बांके बिहारी इंदोर यांच्या जवळच्या ऋद्धिपुर चरित्राच्या पोथीतील ३२६ व्या पानावर "शके १२०७ व्यय नाम संवत्सरी माघमासीं वदि चौथीसी श्रीप्रभु गोसावी बीज केले" असा उल्लेख आहे. श्री. वा. ना. देशपांडे यांनीहि विश्ववाणी डिसें. १९३३ च्या अंकात हीच तिथी नमूद केलेली आहे.

(३) "श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहातील पोथी नं. २७ मधे "शके १२०८ व्यये संवत्सरीं माघमासी वदि चौथी...वसी श्रीगोविंदप्रभु प्रवृत्त्यांतर केले" हा शक दिलेला आहे.

(४) श्रीगोपीराज ग्रंथसंग्रहालयातील स्मृतिवृद्धाचाराच्या एका पोथीत शक न देता नुसतेच "व्यय संवत्छरिं माघमासीं : वधि चौथीचा दीसीं श्रीप्रभुगोसावी प्रवृत्येंतर केले" असे म्हटले आहे. श्री. वा. ना. देशपांडे यांनी संपादिलेल्या स्मृतिस्थळाच्या ५ व्या आख्यायिकेतहि हीच तिथी आहे.

(५) प्रस्तुत चरित्र ग्रंथाच्या ३२२ व्या आख्यायिकेत "वय संवत्सरीं भाद्रपद वदि चौथीचां दीसीं गोसावीं बीजें केलें" असा उल्लेख आहे.

या सर्व उल्लेखात "व्यय संवत्सर" हीच एक गोष्ट सर्वांना मान्य दिसते. आणि तीच आपण गृहीत धरणे योग्य होईल. महिन्याच्या उल्लेखांच्या बाबतीत एकजण भाद्रपद शुद्ध अष्टमी म्हणतो तर दुसरा भाद्रपद वद्य चतुर्थी म्हणतो; तर बाकीचे माघ वद्य चतुर्थीचा उल्लेख करतात. यांनी वारांचा उल्लेख केलेला नसल्यामुळे त्या ताडून पाहता येत नाही. एकाने नक्षत्राचा उल्लेख केलेला आहे. पण त्याच्या शकसंवत्सरात मेळ नाही. गोविंदप्रभूचा मृत्युशक ठरवायला दुसरे कोणतेहि ऐतिहासिक साधन उपलब्ध नाही. त्यामुळे

सध्या तरी वरील अनेक उल्लेखातील " व्यय " संवत्सराचा उल्लेख तेवढा गृहीत धरून निष्पन्न होणाऱ्या निर्णयावर अवलंबून राहणे भाग आहे. गत शक १२०८ ला म्हणजे चालू शक १२०९ ला व्यय संवत्सर येतो. तेव्हा १२०९ हा गोविंदप्रभूचा मृत्युशक ठरतो. अगदी अलीकडचा महिना धरू म्हटले तरी माघ महिन्यात त्यांचा मृत्यु झाला असे मानता येईल व तदनंतर सहा महिन्याच्या आत म्हणजे साधारणपणे शके १२१० च्या पूर्वार्धात ऋद्धिपुर ऊर्फ गोविंदप्रभु चरित्राचे लेखन झाले असावे, असे मानायला हरकत नाही.

**प्रस्तुत पाठाचा लेखन काल** देखील स्थूल मानाने ठरविता येईल. प्रस्तुत चरित्र प्रामुख्याने ज्या पोथीवरून संपादलेले आहे ती शके १४९५ मधे लिहिलेली असल्याचे या ग्रंथाच्या समाप्तिलेखावरून दिसून येईल. ऋद्धिपुर चरित्राची इतकी जुनी पोथी दुसरी कोणतीच अजून माझ्या पाहण्यात आली नाही. चरित्रादिकांच्या अनेक पोथ्यामधे " वासना " " शोध " " मार्गरूढी " वगैरेंचे उल्लेख आढळतात. अर्थात ते निरनिराळ्या संस्करणकारांचे होत. उदाः लीळाचरित्र पूर्वार्ध खंड ३ रे (नेने संपादित) यातील १९ व्या पानावरील आख्यायिकेत ' हिराइसा पाठः शोधः एकी वासना ' हे शब्द आढळतात. त्याचा अर्थ हाच की अनेकांच्या वासना ( भिन्न मते ) काहींनी निर्दिष्ट केल्या; मग त्यात काहींनी ' शोध ' ( शोधलेला मजकूर ) घातला वगैरे. हे वासनाकार, शोधकार, मार्गरूढीकार निरनिराळे आहेत व ते निरनिराळ्या काळी होऊन गेलेले आहेत, हे लक्षात ठेवावे. प्रस्तुत गोविंदप्रभु चरित्रातील आख्यायिकांचा मजकूर सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास आढळून येईल की, यात केवळ निरनिराळ्या ' वासना 'च आलेल्या आहेत. शोधकारांचे शोध किंवा मार्गरूढीकारांचे उल्लेख त्यात नाहीत. तेव्हा साहजिकच अनुमान करता येते की, शोधकारापूर्वीचा किंवा निरनिराळ्या वासना एकत्रित करून चरित्रग्रंथांचे पुनर्लेखन झाले तेव्हांचा हा पाठ असावा. हे कार्य परशरामबासाने केले असावे असे म्हणायला जागा आहे. उपाध्ये आम्नायाच्या थोरल्या पाठाच्या अन्वयस्थळात " तिसरा मन्वंतरी परसरामबासी समस्त वासना एकवट करूनि एक पाठ केला " असा उल्लेख आहे. हा केवळ लीळाचरित्रासंबंधीचा असला तरी त्यावरून या चरित्र शोधनीच्या काळीच गोविंदप्रभु चरित्रातील वासना एकत्रित करून त्यांनीच हा पाठ

तयार केला असावा असे वाटते. काही असले तरी तिसऱ्या मन्वंतरात वासनांचे एकीकरण करून चरित्र शोधनी झाली असावी. हे तिसरे मन्वंतर म्हणजे परशरामबासाच्या मृत्युपर्यंत. नागदेवांचा श्री. देशपांडे यांनी ठरविलेला अगदी अलीकडचा मृत्युशक १२३४ हा गृहीत धरला तर यापुढे आणखी दोन पिढ्या म्हणजे प्रत्येक पिढीस २० वर्षे या हिशेबाने आणखी ४० वर्षांनी अर्थात् १२७४ मधे किंवा तत्पूर्वी हा पाठ तयार झाला असावा असे म्हणता येते.

प्रत्यक्ष ऋद्धिपुर चरित्राच्या शोधनीचाहि उल्लेख सापडतो. पारमांडल्य आम्नायाच्या अन्वयस्थळात " तया हरिबासाचे तळेगावकर दत्तोबास तेही हींरंबा पाठ प्रधान करूनि परशरामबासः रामेश्वरबासः आणिकहि आचार्ये तयांची **वासनांतरे** एकवटुनि पुर्वार्ध चरित्रेः उत्तरार्ध चरित्रेः द्वापार चरित्रे **ऋधपुर चरित्रे**......अन्वयी लावली " असा उल्लेख आहे ( भा. इ. स. मं. त्रै व. १७ अंक २. पृ. ५९ ) यावरून वासनांतरे एकत्रित करून ऋद्धिपुर चरित्र या दत्तोबासाने अन्वयी लावल्याचे स्पष्ट आहे या दत्तोबासाची परपरा पुढीलप्रमाणेः नागदेव-(बाइदेवबास)-गोपाळ पंडित-बाणाइसे-हरिबास दत्तोबासः-यातून कालगणनेच्या दृष्टीने बाइदेवबासाची स्वतंत्र पिढी मानण्याचे कारण नाही. कारण ते दोनतीन वर्षेच आचार्य - पीठावर होते. प्रत्येक पिढीला २० वर्षे या हिशेबाने नागदेवाचार्यापासून दत्तोबासापर्यंत ८० वर्षे होतात. तेव्हां शके १३१४ पर्यंत किंवा तत्पूर्वी प्रस्तुत चरित्र ग्रंथाचा पाठ तयार झाला असावा असे म्हणता येते. सारांश १२७४ ते १३१४ या कालाच्या दरम्यान प्रस्तुत पोथीचा मूळ पाठ तयार झाला असावा असे म्हणणे योग्य होईल.

## मराठीतील प्राचीन चरित्र वाङ्मय

मराठीतील गद्य वाङ्मयाला सुरवात महानुभावीय ग्रंथकारांनी केली हे आता सर्व अभ्यासकांना ठाऊक आहे. चरित्रात्मक ग्रंथरचना हा या प्रारंभीच्या महानुभावीय गद्य वाङ्मयाचा विशेष होय. लीळाचरित्र ( श्रीचक्रधर चरित्र ) ऋद्धिपुर चरित्र ( श्री गोविंद प्रभु चरित्र ); स्मृतिस्थळ ( नागदेवाचार्य चरित्र ) वगैरे चरित्रग्रंथावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. तेव्हा मराठी गद्याचा प्रारंभ चरित्र लेखनाने झाला हे निर्विवाद होय. मराठीतील या चरित्र वाङ्मयाचे स्वरूप या ठिकाणी पाहणे अस्थानी होणार नाही. उपर्युक्त तिन्ही ग्रंथाचे सूक्ष्म

निरीक्षण केले म्हणजे एक गोष्ट विशेष नजरेला पडते ती अशी की, हे सगळे चरित्र वाङ्मय स्मृतींच्या किंवा आख्यायिकांच्या रूपाने निर्माण झालेले आहे. त्यात क्वचित 'आत्मचरित्रा'चाहि अंतर्भाव झालेला आहे. उदाः—महदाइसाने विचारल्यावरून श्रीचक्रधर स्वामींनी आपले 'आत्मचरित्र' सांगितले असल्याचे लीळाचरित्रातील प्रारंभीच्या अनेक आख्यायिकावरून स्पष्ट होते. स्मृतिस्थळांत आत्मचरित्र—कथनाचा भाग अत्यंत अल्प प्रमाणात आहे. श्री गोविंद प्रभु चरित्रात तो मुळीच नाही. तथापि, लीळाचरितासारख्या बृहद्ग्रंथात तो असल्यामुळे प्रारंभीच्या मराठी चरित्रात्मक वाङ्मयाचा तो एक ठळक विशेष मानायला हरकत नाही. स्मृति किंवा आख्यायिका हा मात्र या सर्व चरित्र-ग्रंथाचा सर्वसाधारण विशेष होय. आणि त्यातहि महत्त्वाची गोष्ट अशी की या बहुतेक सर्व आख्यायिका, त्या त्या चरित्रनायकाच्या सान्निध्यात असलेल्या त्यांच्या अंतेवासीयांनी लिहिलेल्या. या चरित्रग्रंथांचे लेखन कसे झाले याविषयी इतिहास प्रकरणात आलेला वृत्तांत पाहिला म्हणजे दुसरी एक गोष्ट ठळकपणे लक्षात येते ती अशी की हे सगळे वाङ्मय 'कथन' पद्धतीने ( Dictation ) लिहिण्यात आलेले आहे. आपापल्या अनुभवाच्या लीळा भक्तांनी 'कथन' करायच्या आणि त्या त्याच शब्दात म्हाइंभटांनी लिहून घ्यायच्या. महानुभावांचे चरित्र-स्वरूप मराठी गद्य वाङ्मय 'कथन' स्वरूपात निर्माण झाले हा मला एक मोठा स्पृहणीय विशेष वाटतो. कथन—प्रकाराने लिहिलेले वाङ्मय साधारणपणे नित्याच्या बोलीत निर्माण होते आणि त्याला एक प्रकारचा सुबोधपणा प्राप्त होतो, असा अनुभव आहे. महानुभावांच्या गद्य चरित्रात तत्कालीन बोलभाषेचे स्वरूप पहावयास मिळते आणि ही भाषा सर्वत्र अत्यंत सुबोध आढळते ती वरील कारणामुळेच. मराठी गद्याला जसजसे 'ग्रांथिक' स्वरूप येत गेले तसतशी ती क्लिष्ट बनत गेली, असे दिसून येईल.

## चरित्र ग्रंथांचे ध्येय

चरित्र-नायकांनी केलेल्या निरनिराळ्या 'लीळा' वर्णन करणे हे साधारणपणे या चरित्र ग्रंथांचे ध्येय आढळून येईल. अर्थात् नानाविध स्थळांशी आणि व्यक्तींशी आलेला त्यांचा संबंध व तेथे घडलेला इतिहास या आख्यायिकांतून नमूद करून ठेवण्यात आलेला आहे. त्यातहि श्रीचक्रधर व श्रीगोविंद प्रभु

हे दोघेहि चरित्रनायक म्हणजे महानुभावांच्या मते प्रत्यक्ष ईश्वरावतारच असल्यामुळे त्यांनी केलेले चमत्कार या आख्यायिकातून विपुल प्रमाणात वर्णन केलेले आहेत हे सांगावयालाच नको. तथापि केवळ चमत्कार वर्णन करणे हे या ग्रंथांचे ध्येय नाही; तर चरित्रनायकाच्या आयुष्यातील महत्त्वाच्या प्रसंगांची नोंद करून ठेवणे हे मुख्य ध्येय दिसते. या दृष्टीने लीळाचरित्राला तर श्रीचक्रधर स्वामींची दैनंदिनी म्हणतां येईल. या दैनंदिनींत चमत्कार आहेत, निरनिराळ्या व्यक्तींच्या गाठीभेटीचे प्रसंग आहेत, त्या प्रसंगातील हास्यविनोदाचे विश्रंभालाप आहेत, पूर्वकालीन दंतकथा आहेत, भविष्यकथने आहेत, स्थलवर्णने आहेत आणि क्वचित लौकिक दृष्टीचा 'इतिहास' हि आहे. श्रीगोविंदप्रभुचरित्र व स्मृतिस्थळ ( नागदेवाचार्य चरित्र ) यातहि बहुतेक या सगळ्या गोष्टी आहेत. पण हे सर्व चरित्रनायकांचा 'गौरव' व्हावा ही दृष्टि राखून नमूद झाले आहे, हे विसरता कामा नये. आणि ते साहजिकहि आहे. चरित्रनायकाविषयी पूज्य बुद्धि किंवा आदर बुद्धि हीच त्यांच्या विषयीच्या ह्या आख्यायिका जमविण्याला कारणीभूत झालेली असल्यामुळे चरित्रनायकांचा जेणेकरून गौरव होईल अशाच आख्यायिका ह्या चरित्रग्रंथात नमूद होणे अपरिहार्य होते.

वरील सर्व विवेचनावरून अभ्यासकांच्या लक्षात आले असेल की, या महानुभावीय चरित्रग्रंथांचा लेखक 'एक' नसून 'अनेक' आहेत. कारण अनेकांच्या अनुभवाच्या आख्यायिका त्यात ग्रथित झालेल्या आहेत. अर्थात् या चरित्रग्रंथांना आजकालच्या 'आठवणी' च्या संकलनाचे स्वरूप आलेले आहे. त्यामुळे आजच्या चरित्रग्रंथात जो व्यवस्थितपणा, आढळतो तो या ग्रंथात आढळत नाही. चरित्रनायकाच्या आयुष्यातील प्रसंगांचे विषयवार सांगोपांग विवेचन हा आजच्या चरित्रग्रथांचा विशेष मानता येईल. ही गोष्ट महानुभावीय चरित्रग्रंथात अभावाने आढळते. चरित्रनायकाच्या ठिकाणी असलेल्या दोषांचेहि वर्णन आजच्या चरित्रग्रंथांत असते. आणि या गुणदोषांच्या तुलनात्मक विवेचनाने चरित्रनायकाची थोरवी वर्णन करण्यात येते. या गोष्टीचा आढळ महानुभावांच्या या चरित्र ग्रंथात होत नाही. पण असे असण्याचे कारण अगदी स्पष्ट आहे. आजचा चरित्रलेखक आपल्या चरित्रनायकाला सर्वसामान्य व्यक्ति लेखूनच त्याचे चरित्र लिहीत असतो; तर महानुभावीय आणि साधारण-

पणे सर्वच प्राचीन चरित्रकार आपल्या चरित्रनायकाला ‘ विभूति ’ किंवा ‘ ईश्वरावतार ’ कल्पून त्याचे चरित्र लिहितात. पहिला आपल्या चरित्रनायकाच्या मनुष्यत्वातून त्याचे विभूतिमत्त्व कसे निर्माण झालेले असते ते दाखवितो; तर दुसरा आपल्या चरित्रनायकाचे विभूतिमत्त्व गृहीत धरून त्याचा मानवी अवतार कसा वागला याचे दिग्दर्शन करतो. पहिल्याची भूमिका सारासार–गुण–ग्राहकाची आढळते; तर दुसऱ्याची भूमिका भक्ताची अथवा विभूतिपूजकाची आढळते. पहिल्याच्या लेखनात चमत्कारांना फारसे स्थान नसते; तर दुसऱ्याच्या लेखनात चमत्कारांची विपुलता असते. ईश्वरावतारांच्या किंवा संतांच्या चरित्रात तर या गोष्टी विशेष प्रमाणात आढळतात. आरंभीच्या महानुभावीय मराठी गद्य-चरित्रातच नव्हे तर पुढे नामदेव, महीपती वगैरेंनी वर्णन केलेल्या संतचरित्रांचीहि हीच स्थिति आहे.

### श्री गोविंद प्रभु चरित्राचे विशेष

प्राचीन चरित्रलेखनाचे हे विशेष लक्षात घेतले म्हणजे श्रीगोविंद-प्रभूच्या चरित्राची रचना कोणत्या दृष्टीने झाली असेल याची सहज कल्पना करता येईल. महानुभाव महंतांच्या दृष्टीने श्रीगोविंदप्रभु म्हणजे खरोखरच परमेश्वरावतार ! तेव्हा त्याच दृष्टीने त्यांच्या आयुष्यातील नानाविध प्रसंगांचे वर्णन होणे अगदी साहजिक होते. अमुक अमुक ठिकाणी ईश्वराचा अवतार होणार आहे किंवा झालेला आहे अशा कल्पित कथांची पार्श्वभूमि संतांच्या चरित्रामागे सर्वत्र निर्माण केलेली आढळते. तशी ती प्रस्तुत चरित्र ग्रंथातहि आहे. द्रावड देसीच्या एका ब्राह्मणाला भविष्य पुराणात (किंवा काहींच्या मते ‘काव्यात’) असे लिहिलेले आढळले की “ वींझा तळवटीं वराड देसु खेड रीधौरे गाओः तेथ इस्वर अवतार अवतरला असेः कांणवा ब्राह्मणाचां ठाइं ” ( २८१ ) ही गोष्ट ‘ सत्य की मिथ्य ’ हे पाहण्यासाठी तो सहकुटुंब सहपरिवारे रितपुरला आला. तेव्हा त्याला खरोखरच ईश्वरावतार श्रीगोविंद प्रभूचे दर्शन झाले. विद्यमान ईश्वरावताराचे वर्णन ‘ ईश्वर अवतार अवतरला असे ’ अशा स्वरूपात लिहून ठेवणारे हे भविष्य पुराण म्हणजे एक ठेवणीतली चीज असली पाहिजे हे उघड दिसते. प्रस्तुत चरित्रनायकाच्या बालपणीच्या आख्यायिकातून देखील “ हा ईस्वर अवतार होईलः कां देवता अवतारु होईल ” ( २; ३ ); “ नेणीजे हा गुंडो कोंणुः हा इस्वर अवतारु होये”

(४); अशीच भूमिका निर्माण केलेली आढळते. तदनंतर देखील भक्तजनाकडून "साचोकारा इस्वरु एकु असे ?" भटीं म्हणीतलें "हो असेः" तवं तेहीं म्हणीतलें: "कवणे ठाइं असे ?" तवं भटीं म्हणीतलें "हें नव्हे रीधौरीं श्रीगुडमराउळ असेति" (१९३), "भटीं म्हणीतलें "हा नव्हे देओः रीधपुरीं राज्य करीत असेति" (२१३) वगैरे प्रकारे श्रीगोविंदप्रभु प्रत्यक्ष ईश्वरावतार म्हणूनच त्यांची प्रतिष्ठा होत असे. (आपल्या या 'अवतारित्वा' ला श्रीप्रभूची देखील मान्यता होती असे २ ऱ्या लीळेवरून कळते.) याचमुळे आपल्या चरित्र-नायकाला अनेक ठिकाणी "श्रीप्रभु" म्हणून संबोधलेले आहे. एके ठिकाणी तर खास गोविंदप्रभूंनी आपण व श्रीकृष्ण म्हणजे एकच असे स्वतःच सूचित केले आहे. ("आवो हें जेवीलें म्हणेः आवो हे रुकुमीणींचा राउळी" वगैरे सवाद पहा. २२४) सारांश, चरित्रनायक म्हणजे प्रत्यक्ष अवतारच अशा जाणिवेनेचे या चरित्रग्रंथाचे म्हाइंभटाकडून संकलन व संपादन झालेले दिसून येईल.

## परमेश्वरावताराचे प्रकार.

महानुभावांनी परमेश्वरावताराचे प्रामुख्याने पाच प्रकार मानले आहेत. १. परदृश्यावतार. २. अवरदृश्यावतार. ३. आच्छादनीचा परदृश्यावतार. ४. आच्छादनीचा अवरदृश्यावतार. ५. उभयदृश्यावतार. पर (=ब्रह्मविद्या) जाणणारा तो परदृश्या; अवर (देवता संबंधाचे, ऐहिक) जाणणारा तो अवर-दृश्या, हे दोन्ही जाणणारा तो उभयदृश्या; वस्तुतः उभयदृश्या असूनहि ज्याने आपल्या ठिकाणचे अवर ज्ञान आच्छादून केवळ परज्ञान प्रकट केले तो आच्छादनीचा परदृश्या व परज्ञान आच्छादून अवर ज्ञान प्रकट केले तो आच्छादनीचा अवरदृश्या. असे या अवतारांचे थोडक्यात लक्षण सांगता येईल. पैकी श्रीगोविंदप्रभूचा अवतार म्हणजे आच्छादनीचा परदृश्यावतार होय असे महानुभाव मानतात. या गोष्टीचे प्रस्तुत चरित्र ग्रंथात प्रत्यक्ष दिग्दर्शन व विवेचन नाही. आधुनिक पद्धतीने लिहिलेल्या चरित्रात हे अवश्य आले असते. पण पूर्वीच्या चरित्रलेखकाची दृष्टी निराळी असल्यामुळे याचा अंतर्भाव प्रस्तुत ग्रंथात नाही.

या ईश्वरावतारित्वाला शोभून दिसण्यासारखेच अनेक गुण श्रीगोविंद प्रभूच्या ठिकाणी होते. त्यांची बुद्धि अत्यंत तीव्र होती. इतरांना जे ज्ञान एका वर्षात ग्रहण करता येत नसे ते त्यांना महिन्यात येत असे (२). बोपो उपाध्या-

जवळ त्यांचे वेदाध्ययन झाले होते (२); तथापि या संस्कृत अध्ययनाचा त्यांच्या वाणीवर फारसा संस्कार झाल्याचे त्यांच्या भाषेवरून दिसत नाही. द्राविड देशच्या ब्राह्मणाशी बोलत असतांना " नाहं मनुष्यो नच देवयक्षौ " (२८१) हा श्लोक त्यांनी उच्चारलेला होता. एवढेच 'संस्कृत वाङ्मय' त्यांच्या तोंडी आलेले आहे. (तथापि हाच श्लोक प्रज्ञासागर यतीशी बोलतांना श्री चक्रधराच्याहि तोंडी आढळतो हे लक्षात घेतले पाहिजे.) त्यांच्या ठिकाणी भूतभविष्याचे ज्ञान होते. " वासुदेवो भट होता, तो दुर्वा जाला म्हणणें " (२५३); " माहाडुळ मार्गि लांकाचा गाडा मोडला म्हणणें " (२५२) वगैरे आख्यायिकावरून त्यांचे भूतकाळचे ज्ञान दिसून येते. त्यांच्या भविष्य ज्ञानाविषयीच्या आख्यायिका तर ग्रंथभर विखुरलेल्या आहेत. एखाद्या घराला आग लागणार असली तर (१७; २६८); एखाद्या घरचे कोणी मरणार असले तर (४१; ८१; ८३); पुढे एखाद्याचे डोळे काढले जाणार असले तर (६९; २२७) त्या गोष्टीची सूचना गोविंदप्रभु आधीच देत असत. याशिवाय मेलेल्यांना उठविण्याचा चमत्कार (८: ९६; २४५; ३००); पर्जन्य बोलावणे (२१४); सूर्याला बोलावणे (२६६) उपडून द्राक्ष, कोहळी व पडवळ लावणे (२४; ५८; ३०१); रांजण सांदणें (६१); दुरून गाईचे दूध काढणे (३१६), पांगळ्यांना पाय देणे (२८४); मुक्याला वाचा देणे (२८५); सर्पाचे विष उतरवणे (१३१) अशा नानाविध लीळा ऊर्फ चमत्कार करण्याचे सामर्थ्य श्रीगोविंदप्रभूच्या ठिकाणी होते. ही वर्णने अर्थात त्यांच्या गृहीत विभूतिमत्त्वाला शोभून दिसणारीच आहेत. ते प्रत्यक्ष परमेश्वरावतार असल्यामुळे इतर विद्यार्थी आपल्या डोक्यावरून पेंड्या आणीत असतांना यांची पेंडी मात्र 'अंत्राळातून' यायची (३); यांच्या माथ्याहून व शरीरातून प्रकाश बाहेर पडायचा (३, १५, ३१, ३२) असे चमत्कार लोकांना वारंवार दिसत असत. भूमिगत द्रव्य ओळखण्याचेहि सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी होते (३१२, ९५). चुकलेला बैल कोठे सांपडेल (२०८), हरवलेली वस्तु कोणी नेली आहे (८६, ९२) वगैरे चमत्कारपूर्ण गोष्टी ते सांगू शकत. देवताबरोबर वारंवार त्यांचा खेळ, बोलणेचालणे वगैरे तर नेहमीच व्हायचे (४, ३१, २२८ वगैरे). सारांश, ईश्वरावताराच्या ठिकाणी जी सर्वज्ञता व कर्तृमकर्तृमन्यथात्व सर्वसामान्य

श्रद्धाशील लोक अपेक्षितात ते सर्व श्रीप्रभूच्या ठिकाणी असल्याचे वरील वर्णनावरून दिसून येईल.

## गुंडम हे मूळ नाव, गोविंदप्रभु हे नव्हे.

श्री गोविंदप्रभु ईश्वरावतार होते हे एका दृष्टीने खरे असले तरीहि ते 'मनुष्य' होते हे विसरता कामा नये. त्यामुळे इतर मनुष्याप्रमाणे त्यांच्याहि ठिकाणी रागलोभादि विकार होतेच. त्यांच्याच कमीअधिक आविष्कारावरून महानुभावीयेतर लोक त्यांचे माहात्म्य ठरविणार. तेव्हा या दृष्टीने आपणास त्यांच्या कोणत्या स्वभाव-विशेषांचे दर्शन प्रस्तुत चरित्रग्रंथातून होते ते पाहू या. प्रथम एक गोष्ट लक्षात आणली पाहिजे ती अशी की, श्री गोविंदप्रभु हे काही आपल्या चरित्रनायकाचे खरे नाव नव्हे. त्यांचे खरे नाव 'गुंडो' असे होते. ('गुंडो ऐसें नांव ठेविलें.' १. तसेच २ व ३ ह्या आख्यायिका पहा) लहानपणी सगळे जण त्यांना 'गुंडो' च म्हणत असत. मोठेपणी मात्र "गुडम स्वामी" (१८७,२७५) "श्री गुंडमराऊळ" (१९३) असे संबोधीत. पंचकृष्णाच्या नामावळीत "जैसे ऋद्धिपुरी "**श्रीगुंडम राऊळ**" असेच त्यांचे नाव आढळते. इतरत्र त्यांना श्रीप्रभु या नावाने संबोधतात. "कृमीतें ब्रह्म कीजे ऐसी **श्रीप्रभूची** लीळा" (विचार. २१३); "नेणिजे **श्रीप्रभूची** लीळा" (वि. ३१४). या शिवाय विचार सूत्रे २१९; २२०; वि. मा. ६७ पहा. 'श्री प्रभु' हे श्री गोविंदप्रभु अथवा श्री गुंडम राउळ यांचे संक्षिप्त रूप होय. प्रस्तुत चरित्रातील गद्य विभागात त्यांना 'गोविंद' म्हणून संबोधल्याचे कुठेहि आढळत नाही. तथापि, त्यांचा ध्यास करीत त्यांच्या दर्शनाला निघालेल्या 'साधे' च्या तोंडी मात्र 'गोवींदु वो! गोवींदु वो' (१७४) असे नाव आढळते. त्यांना उद्देशून ओव्या गात असतानाहि तिच्याच तोंडी "गोवींदु आइः गोवींदु बाइः गोवींदु माझी बाळवेसी" (१७९) असे नाव आलेले आहे. यावरून श्री प्रभूच्या हयातीतच त्यांना 'गोविंद' असेहि म्हणत असावेत असे दिसते. आज त्यांच्या विषयी हेच नाव विशेष प्रचलित आहे. म्हणूनच या ग्रंथाला श्री गोविंदप्रभु चरित्र असे नाव मीने दिलेले आहे. वास्तविक श्री गुंडमस्वामी चरित्र हे नाव अधिक यथार्थ झाले असते.

## " ऋद्धिपुर माहात्म्या " तील चिद्भव.

'श्रीमन्महोपाध्याम्नाय दिक्षीत विराटदेशोपनामाळंकृत कृष्णमुनिनां विरचित' ऋद्धिपुर माहात्म्य नावाच्या एका हस्तलिखित ग्रंथांत तर गोविंदप्रभूचे मूळ नांव " चिद्भव " असे दिलेले आहे. " श्रीचिद्भव नामस्वीकारें । बाळलीळा खेळि-जैल दातारें ॥ (६०३. ओवी ). कृष्णमुनीच्या वर्णनात एकंदरीत फारच विसंगति झालेली मला आढळली. चिद्भव व गुंडम या नावांचा त्याने अतिशय गोंधळ उडवला आहे. उदाः— भविष्य पुराणातील म्हणून एक श्लोक देतांना त्यानेच ' तद्गुंडमेतिप्रतिपाद्यनामा '' म्हणून उल्लेख केला आहे. त्यावर व्याख्यांन करितांना " **गुड** वेष्ठन ऐसा धात । हें सारस्वत व्याकर्ण जाणावें संस्कृत । व्यष्ठ म्हणिजे नीभ्रांत । व्यापकत्वाते ॥ ६०४ ॥ तरि **मायेने** विश्व असे व्यापिलें तियेचे पुर देवें अंगिकारिलें । म्हणोनि नाम स्वीकारिले चिद्भव ऐसे ॥ ६०५ ॥" म्हणजे गुंडम नावाची उपपत्ति देऊन शेवटी चिद्भव नावावर आलां. यातील विसंगति उघड आहे. भविष्य पुराणातील कोणत्या तरी 'चिद्भव' नावाशीं गुंडमचा संबंध जोडून देण्याच्या इच्छेने कवीने हा घोटाळा केलेला दिसतो. तेव्हा तिकडे दुर्लक्ष केलेलेच बरें.

## गुंडम राउळ आणि नाथपंथ.

'गुंडम राउळ' या नावावरून श्री गोविंदप्रभु नाथपंथी होते की काय अशी एक शंका येते. ती या ठिकाणी नमूद करणे अवश्य वाटते. चांगदेव वटेश्वरकृत ' तत्त्वसार[१] ' या ग्रंथांत जी नाथपंथीयांची यादी दिलेली आहे तीत

अवधुतु **गुंडम राउळ**, शबरी
मनु अजगिरी ।
जिराबाई खेचरी
देमादेवी ॥ ( ८७७ )

असे एका 'गुंडम राउळाचे' नाव आलेले आहे. तत्त्वसार हा ग्रंथ शके १२३४ मध्ये लिहिला गेला. त्यावेळी आपल्या गोविंदप्रभूचे निधन होऊन २४ वर्षे लोटली

---

१. चांगदेव वटेश्वर कृत तत्त्वसार. संपादक डॉ. ह. रा. दिवेकर, प्राच्य ग्रंथ संग्रहालय उज्जयिनी.

होती. तेव्हा त्यांचा उल्लेख गुंडम राउळ या नावाने त्या ग्रंथात येणे अशक्य नाही. तथापि गुंडम राउळ ऊर्फ गोविंदप्रभु हे नाथपंथीय म्हणून त्यावेळी व त्यानंतरहि कधी प्रसिद्ध नव्हते. तेव्हा तत्त्वसार ग्रंथातील 'गुंडम राउळ' कुणी तरी निराळा असला पाहिजे. याचा अर्थ इतकाच की महानुभाव पंथाप्रमाणेच नाथ पंथामधे देखील कुणीतरी गुंडम राउळ या नावाचा सत्पुरुष होऊन गेला असावा. याशिवाय नाथपंथीयात चक्रपाणी, नागार्जुन, देमादेवी इत्यादि सत्पुरुष व स्त्रिया होऊन गेल्या.[१] हीच नावे महानुभावपंथीय महंतात देखील आढळतात, हे लक्षात घेण्यासारखे आहे. यावरून नाथ पंथ आणि महानुभाव पंथ यांचा अन्योन्य संबंध शोधून काढायला बरीच मदत होईल असे वाटते. वरील व्यक्तीशिवाय तत्त्वसार ग्रंथांत उल्लेखिलेल्या श्रीमुक्तादेवी योगिनी[२] (८६९) जळांधरु[३] (८७०); नागार्जुन, कणेरी[४], लुइलाला[५], (८७१); कान्हू[६] (८७७); ३ गोविंदचंदु[३] (८७८); घोडा चुळि[७] (८८०) या सत्पुरुषांच्या कथा लीलाचरित्रांत चक्रधराच्या तोंडी आलेल्या आहेत, ही गोष्टहि या ठिकाणी नमूद करावीशी वाटते. आपल्या चरित्रनायकाचे 'गुंडो' हे मूळचे नांव. तथापि या 'गुंडों'-च्या ठिकाणचे चमत्कार सामर्थ्य पाहून, तत्पूर्वी होऊन गेलेल्या नाथपंथीय 'गुंडम राऊळा'-ची आठवण लोकांना होत असावी आणि म्हणून या गुंडोला 'गुंडम राउळ' हें नांव पडले असणे अशक्य नाही. सारांश, नाथपंथीय गुंडम राउळ आणि महानुभावपंथीय गुंडम राउळ यांचा संबंध चिन्त्य आहे एवढेच येथे सुचवून ठेवतो.

## श्रीगोविंदप्रभूंची आकृति, वेष, वर्तन वगैरे.

श्रीगोविंद प्रभूंच्या एकंदर आकृतीचे, वेषाचे, बसण्याउठण्याचे वर्णन 'विचार बंद' ग्रंथात एकत्र आलेले असल्यामुळे तेच इथे उध्दृत करतो. "श्रीप्रभु आर्ये : हें आर्यनागर : श्रीकृष्ण चक्रवर्ती ते नागर" (विचार. सूत्र

---

१. तत्त्वसार. ओव्या ८६९; ८७१ व ८७७ पहा. २. लीलाचरित्र. एकांक. ८. या मुक्ताबाईलाच इतरत्र 'कर्दळीचा वनीः **मुक्ताई योगिनी** । देओ धायधणी पूजिएले" असे म्हटले आहे. ३. लीलाचरित्र. उत्तरार्ध ४१८. ४. ली. च. उत्त. ४२०. ५. ली. च. उत्त. ४१९ यात लुइलाला ऐवजी लुइपाई असे नाव आहे. ६. ली. च. उत्त. ४२२. ७. ली. च. एकांक २०.

८०) या सूत्रावर टीका करतांना बंदकार लिहितो : "आर्य म्हणजे आरिख-पण : म्हणजे मनुष्य–व्यवस्थेसीं अनसारखेंपण ।...मा तर ते आरिखपण कैसे : ना **उठणें** म्हणजे शीघ्रता : **बैसणें** म्हणजे उकड[1] : तथा श्रीचरणावर श्रीचरण घालौनि : **चालणें** म्हणजे गगनाचीं वास पाहत : तथा दुडुदुडु[2] धावणें : बोलणें म्हणजे वेंभळ : तेचि कैंस : ना : मेली आली : तथा : मेली गेली : तथा तोचि शब्द पुन्हां पुन्हां बोलणें : **घेणें** म्हणजे आसडुनि : यथा लाख-भाकर : आमलक : तथा बदरीफळें बलात्कारें घेणें : **देणें** म्हणजे टाकुन घालणें : यथा सेंगुळ बुडडें : **नेसणें** म्हणजे सोळा हात वस्त्र मीरीया घालुनि सीर पालव घेणें : **पांगुरणें** म्हणजे सव्य भाग टाकौनि वामांगी पदर घेणें : जेंचि वेढणें तेचि पांगुरणें । ऐसा **वेष आरिख** म्हणजे मळवट : कुंकुम भरणें : माथां भांग खोपा जवादि भरणें : कर्णीं सुकडी लावणें : पायीं[3] वांकि : गळां सांखळ : मुकुटीं तेल[4] : वेणी : नाभिचुंबित खाड (=दाढी) तथा स्मश्रु : श्रीकर[5] मवंडणें : टाका मत्ररी देणें : विहरण वर्तन आवघें आरिख : हें वेषाचें अंगीकृत । तारि **मूर्ति आरिख** ते कैसी : ना पुराचें (=शरीराचे) सौंदर्य तें नाही : आन मूर्ति शामगोर : आणि वाम नेत्र लात्रणें : वाम कनिष्ठिका वक्र करणें : हें मूर्तीचें आरिखत्व" यावरून श्रीगोविंदप्रभूच्या ध्यान मूर्तीची सहज कल्पना येईल. प्रस्तुत ग्रंथातील आख्यायिकावरून देखील या सर्व गोष्टी वाचकांच्या लक्षात येतीलच.

याशिवाय त्यांच्या सवयी म्हणून आणखी एकदोन गोष्टींचा उल्लेख करणे अवश्य आहे. "आवो मेली जाय" ही शिवी गोविंद प्रभूच्या तोंडी नेहमी असायची. आणि कोणतीहि गोष्ट आपल्या मनासारखी झाली म्हणजे "ऐया माझाः आता होए म्हणे" हा आनंदोद्गार त्यांच्या मुखातून नेहमी बाहेर पडायचा. आजकाल मुलींच्या तोंडी "अय्या!" शब्द फार येतो म्हणून वृद्ध तक्रार करितात. त्यांनी श्री गोविंदप्रभूच्या तोंडी असलेल्या या शब्दाकडे नीट लक्ष द्यावे म्हणजे झाले! एखाद्याकडून आपले काम करून घेतल्यावर किंवा एखाद्याचे काम आपण करून दिल्यावर किंवा एरवीहि इतरांना उगीचच थापटा

---

१. आख्यायिका ५४, ६५, ७३ व ९१ पहा. २. पहा. ३४; ९८. ३. पहा ७४. ४. पहा ९१. ५. पहा १४.

मारायचीहि श्री प्रभूंना सवय होती. ( २६, ५८, १०९, १२९, १७०, १९९ वगैरे पहा. )

इतरांना उगीचच वेडावून दाखवणे, हातवारे [ अनुकार ] करणे, गरगरा हात फिरवणे वगैरे सवयीहि त्यांना होत्या. याशिवाय खादाडपणा ही त्यांची आणखी एक मोठी सवय म्हणून उल्लेखिता येईल. प्रस्तुत चरित्र-ग्रंथातील किती-तरी आख्यायिका या सवयीसबंधीच्याच आहेत. एकदा ते गूळ खात होते. तोहि कसा ? तर ' श्रीकरें भेली मुखीं घातली : आणि आरोगुं लागले : ते श्रीमुखुनि ओघळु नीगेति : ते खाड (दाढी) माखे : दोंदावरी गळे : ऐसा गुळु आरोगीला" (९७). हा अव्यवस्थितपणाच नव्हे तर काय ? या खादाडपणामुळे त्यांचे पोट अनेकदा दुखत असे. शेवटी वृद्धापकाळी त्यांना ' बाहीरितीचा उपद्रो ' म्हणजे हगवण लागली आणि त्यातच त्यांचा मृत्यु झाला. हाहि त्यांच्या या खादाड-पणाचा परिणाम दिसतो. सारांश, गोविंदप्रभूचा वेष, खाणेपिणे बोलणेचालणे वेड्यापिशाला शोभण्यासारखे होते. आणि असे म्हटल्याबद्दल आश्चर्य वाटायला नको. त्यावेळचे लोकहि त्यांना " राउळ वेडे : राउळ पीसें " (७;९) " वेडे : पीसे " (१५) म्हणत असत. महानुभाव महंतहि गोविंदप्रभु म्हणजे वेडापिसा अवतार म्हणून मानतात. ते त्यांच्या या लोकविलक्षण वर्तनामुळेच.

## स्वभाव विशेष

तथापि श्रीगोविंदप्रभूच्या ठिकाणी असलेले हे काही लोकविलक्षण बाह्याचार सोडून दिले तर त्यांच्या ठिकाणी इतर काही आंतरिक सद्‌गुण अस-ल्याचे आढळते. ते आमृत्यु नैष्ठिक ब्रह्मचारी होते, ही गोष्ट त्यांच्या कडकडीत वैराग्याची द्योतक आहे. नेहमीच्या स्वभावधर्मानुसार त्यांना एकदा बाशिंग बांधून घेण्याची इच्छा झाली. पण तो केवळ क्षणभर खेळ म्हणून. त्यावेळी ईश्वरनायक तर त्यांना आपली मुलगी द्यायलाहि तयार झाला होता. पण त्यामुळे श्रीप्रभु त्याच्यावर रागावले. ( २२४ ). जन्मभर ते अनासक्त वृत्तीनेच राहिले. कुणाच्या पैशाअडक्याचा त्यांनी कधीहि लोभ धरिला नाही. पण याहीपेक्षा त्यांच्या ठिकाणचा महत्त्वाचा गुण सर्वाभूती समानदृष्टि. म्हणूनच हा नीच आणि हा श्रेष्ठ असा भेदभाव मनात न आणता ते सगळ्यांच्या घरी भोजन करीत. कुणब्यांच्या घरी (६) ते जेवले; मांगांच्या पाणपोईतील पाणी ते प्याले; महा-

रांच्या घरचे अन्न त्यांनी भक्षण केले. " राउळ मातांगां माहाराचां घरोघरी वीचरताती : आणि तैसेचि दीक्षीतां ब्राह्मणांच्या घरीं वीचरताती " ( ४७ ) ही त्यांची वृत्ति त्यांच्या मनाचा मोठेपणा दाखविते. आता ह्या गोष्टीहि त्यांच्या वेडेपिसेपणाचाच एक प्रकार होय असे म्हणायचे असल्यास गोष्ट निराळी. तथापि त्यांच्या मनात अंत्यजाविषयी " अनुकुंपा " होती यात मात्र शंका नाही. ( ४८ ). इतरांच्या विषयीहि ते नेहमी सदय असलेले आढळतात. कुणाहि अडल्यापडल्याचे काम श्रीप्रभूंनी करून द्यावे, असे अनेक आख्यायिकावरून दिसते. ( ७, ९, २८, ३८, ३९, ४० वगैरे ) श्रीप्रभु म्हणजे अनाथ व असहाय स्त्रियांचे माहेरच ( १५६ ). त्यांच्या ठिकाणी उपजत विनोदबुद्धीहि होती. त्यामुळे गमतीने आपल्या परिवारातील भक्तजनांना " नावे " ठेवण्याची " खोड " च त्यांना लागली होती. कुणाचा हात मोडला असला तर तिला त्यांनी ' खोडी ' म्हणावे ( १२७ ); कुणाचे शरीर स्थूल असले तर त्याला ' कोथळा ' म्हणून संबोधावे ( १९४ ); आपल्या मठात एखाद्याची फार वरवर होत असली तर त्याला ' जावइ ' असे नाव ठेवावे ( २०७ ) वगैरे अनेक प्रकार आढळतात. नागदेवाचार्याला ते ' हरिमा ' म्हणत असत ( ११६, २७७, ) तर म्हाइंभटाला ' चारुवारु ' ( २५० ) म्हणून हाक मारीत असत. अशा या " लोकविलक्षण " व्यक्तीचे चरित्र प्रस्तुत ग्रंथात आख्यायिकांच्या रूपाने वर्णन केलेले आहे. आणि अनुषंगाने त्यांच्या परिवारातील अनेक भक्तजनांचीहि माहिती त्यात अंतर्भूत झालेली आहे.

## तत्कालीन सामाजिक परिस्थिति

या सर्व आख्यायिकातून तत्कालीन सामाजिक परिस्थितीचेहि थोडेफार प्रतिबिंब पडलेले आढळते. त्या पैकी काही महत्त्वाच्या गोष्टीकडे अभ्यासकांचे लक्ष वेधतो. वऱ्हाड प्रांत त्यावेळी " टेकीच्या राया " च्या ( ६९ ) म्हणजे देवगिरी येथील राजांच्या ताब्यात होता. येथील राजाला अपराध्यांचे "डोळे काढण्या"ची शिक्षा देण्याची विशेष सवय होती असे दिसते ( ६९; २२७ ). शिमगा ( ६४, २८० ); श्रावणी ( ३५ ); पोळा ( ३०९ ); भावे सण ( १२५ ) व दमनकपर्व ( दवणापर्व ११७ ) इत्यादि सण त्यावेळी वऱ्हाडात साजरे होत असत. यापैकी शिमगा, दमनक पर्व व भावे सण यांची विस्तृत वर्णने या ग्रंथांत आलेली

आहेत. आजकाल हा भावे सण कुठे साजरा होत असल्याचे आढळत नाही. त्यावेळच्या अंत्यविधीचेहि ८३, १३८, ३०० या आख्यायिकातून विस्तृत वर्णन आले आहे ते पाहण्यासारखे आहे. अमूल्य वस्त्रे नळीत राखून ठेवीत ( २७० ). श्रावण महिन्यात झाडाला येणारे आंबे झाडावरच वस्त्रांनी गुंडाळून मुद्दाम राखून ठेवीत ( २२० ) ही पद्धत अजूनहि आढळते. खरेदीखत 'तांबे याच्या पत्रा' वर म्हणजे ताम्रपटावर करीत असत ( ११५ ) अर्थात ताम्रपट हे राजांनीच दिलेले असत असे नाही तर खाजगी व्यवहारहि ताम्रपटांकित करून ठेवण्याची रीत त्यावेळी होती. हिवाळ्याच्या दिवसात दारासमोर ताप करून त्यावर अंग शेकण्याच्या पद्धतीचा १० व्या आख्यायिकेत उल्लेख आहे. या तापावर अंग शेकणाऱ्या प्रत्येकाने आपल्या वाट्याचे जळतण आणून तापात घालायचे असे. या आपापल्या वाट्याच्या जळतणाला आज कांही खेड्यातून 'सासू' म्हणतात. त्यालाच त्यावेळी "भोई" असे म्हणत असत. पोट दुखल्यास ते कसे शेकीत हे ८७ व्या आख्यायिकेवरून लक्षात येईल. मुतखडा झाला तर लघवी होण्यासाठी "सात वेळ उंबरा ओलांडीला : आंडोरा करवीं खेड घालवीले :" आणि शेवटी वाजेश्वराला "खीच पुरीचा" नवस केल्याची पद्धत मनोरंजक वाटेल. ( १३४ ). पूर्वी महारांची घरे वेशीच्या आत असत असे ४७ व्या आख्यायिकेवरून म्हणता येते त्यांचा विटाळ दीक्षित ब्राह्मणांना सहन होत नसे. मांग वगैरे अंत्यजासाठी पाण्याच्या स्वतंत्र विहिरी असत (४८). स्पृश्यांच्या विहिरीवर त्याना पाणी भरू देत नसत आणि म्हणून "पाणियेंवीण मरते असों" अशीहि पाळी त्यांच्यावर यायची : अळजपूर, रितपुर सारख्या मोठमोठ्या गावीं "सामान्य स्त्रिया" म्हणजे वेश्या असायच्याच. ( ४४; ४५; ) स्त्रियांना मधून मधून नागव्याने आंघोळ करण्याची लहर येत असे (१८१). यात्रेचे मोठे क्षेत्र म्हणून रामटेकला फार महत्व असावे असे दिसते. जो उठतो तो राम-यात्रेला जातांना दिसतो ( ४४, ७३, २०३ वगैरे ). याशिवाय इतर अनेक सामाजिक प्रसंगांचे प्रस्तुत चरित्र ग्रंथात अप्रत्यक्ष उल्लेख आढळतात. ते सर्व अभ्यासकांनी अभ्यासण्याजोगे आहेत एवढेच येथे सुचवून ठेवतो.

## श्रीगोविंदप्रभूचा जन्मशक

श्रीगुंडम उर्फ गोविंदप्रभूच्या निधन शकाविषयी मागे उल्लेख केलाच

आहे. त्यांचा जन्मकाल मात्र निश्चित करता येत नाही. नाही म्हणायला पूर्वोक्त " रिद्धपुर माहात्म्या " मधे

शालिवाहान शकिं अकरा शतावरी
नव वर्षें प्लवंग संवत्सरी
भाद्रपद शुद्धाष्टमि गुरुवारी
अवतरैल परमेश्वर[1] ( ६०२ )

अशा भविष्यकथनाच्या रूपाने एक मिती दिलेली आहे. त्यावरून शके ११०९ प्लवंग सवंत्सर भाद्रपद शु. अष्टमी. गुरुवार हा गोविंदप्रभूचा जन्मकाल ठरतो. पण तो विश्वसनीय मानायला दुसरा कोणताच आधार नाही. महानुभावीय इतर ग्रंथकारांनी कुणीच ही काय किंवा आणखी दुसरी काय, जन्मशकाची मिती दिलेली नाही. त्यामुळे वरील मितीची सत्यासत्यता पडताळून पाहता येत नाही. विशेषतः, या रिद्धपुर माहात्म्यातील एकंदरीत कल्पित भाग लक्षात घेतला असता, ही मितीहि कल्पितच असावी अशी शंका येते. त्यामुळे या ठिकाणी ही मिती नमूद करून ठेवण्याखेरीज दुसरे काहीहि करता येत नाही.

'हेतुस्थळ[2]' नामक ग्रंथात गोविंदप्रभूच्या आयुर्मानासंबंधी एक अप्रत्यक्ष उल्लेख आहे, तो असा : " रीधपुर कळीची द्वारका म्हणितली : कां : ईश्वरें (= श्री गोविंदप्रभूनी ) १०२७ वरषें राज्य केलें." १०२७ हा आकडा चुकून पडला असावा हे उघड दिसते. १२७ वर्षे असे लेखकाला म्हणायचे असावे. तसे असले तर, गोविंदप्रभूचा मृत्युशक १२०९ हा लक्षात घेतल्यास, त्यांचा जन्मशक ११०९ च्या आणखी बराच मागे घ्यावा लागणार ! सारांश, जन्मशकासबंधी कोणतेहि निश्चित विधान करतायेण्यासारखा आजची स्थिति नाही एवढे खरे.

## शब्दसंपत्ति

यानतर प्रस्तुत ग्रंथाच्या भाषेकडे लक्ष देऊ. घरगुती प्रादेशिक शब्द या

---

१ हीच ओवी 'ऋद्धिपुरवर्णन' (य खु. देशपांडे) प्रस्ता. पा. १४ वर थोडी निराळी आहे. त्यावरून श्री. देशपांडे यांनी काढलेले अनुमानहि कसे चुकीचे आहे ते तो प्रस्तावनेचा भाग मूळात वाचून पाहिल्यास सहज लक्षात येईल.

२ या ग्रंथाविषयी थोडी माहिती पुढे दिलेली आहे.

ग्रंथात विपुल प्रमाणात विखुरलेले आहेत. याचे मुख्य कारण असे की श्री गोविंदप्रभूंनी आपले सगळे आयुष्य प्रामुख्याने रितपुरातच घालविले. आपल्या मठात किंवा गावातील निरनिराळ्या व्यक्तींच्या घरी जाऊन तेथे नानाविध लीळा व चेष्टा करणे, खेळ खेळणे, आरोगणा ( भोजन ) करणे वगैरे हे त्यांचे नित्याचे कार्यक्रम होऊन बसले होते. त्यामुळे या चरित्र ग्रंथात वऱ्हाडातील घरगुती वातावरणाचे मोठे मनोहर चित्रण झालेले आहे. या वातावरणाच्या अनुषंगाने ह्यात घरगुती शब्द विपुल प्रमाणात आढळत असल्यास आश्चर्य नाही. तीळ, तांदुळ, गहु, जोन्हळे उडीद, चवळे, तुरी, गाजर, मुळा, बोरे, केळे, सुकेळे, आंबे, वांगे, मधुकाकडी, वालाचे पोपट. सोल, वोंग्या, आळकवसा, तरोटा, पोथी, द्राक्ष, नारिंगे, मातुळिंगे, कोहळा, पडवळ, मोहाळ, पेंडाळ, ग्रीबा, उळा इत्यादि धान्यपदार्थ व भाज्या यांच्या यादीत उळी (कांद्याची पान), ग्रीबा ( कडु भोपळा ), अळकवसा ( तरोटा, तरवंटा ) हे शब्द अभ्यासकांना नवीन वाटतील. उळी हा मूळचा कानडी शब्द असून कांद्याची पात या अर्थाने तो अजूनहि वऱ्हाडातील खेड्यातून क्वचित वापरला जातो. आळकवसा हा शब्द तर श्रीप्रभूच्या सेवादास्याला आलेल्या आबाइसेला त्याकाळी सुद्धा माहीत नव्हता. तेव्हां ‘ आळकवसा ’ म्हणजे ‘ तरवंटा ’ असे म्हाइंभटाने तिला सांगितले ( २२१ लीळा पहा ). यावरून हा शब्द खास वऱ्हाडप्रांतीचा असावा असे दिसते. आळकवसा शब्दाप्रमाणचे ग्रीबा हा शब्दहि महाराष्ट्र शब्द कोशात आढळत नाही.

प्रस्तुत चरित्र ग्रंथात पुढील **खाद्य पदार्थांची नावे** आलेली आहेत· भाकर ( ही जशी जोंधळ्याची करीत तशी लाखाचीहि करीत २९ लीळा पहा ) धीडरे, अहिता, दीवे, मुठीये, मुदा, ( १८७ ); ‘ मांडे, पुरीया, घारीया, वडे उंबरे ’ ( २२४ ), ठोंबरा, ठेंटरी, घाटा, पेवणे, कानवला, ताक, आंबील, मधुरांबील, वडेयाचे आंबट, तीळकाकवी, भात, राळेयाचा भात वगैरे. आहिता म्हणजे धीडरें, अर्थात आजचे ‘ धिरडे ’. आहिता शब्द पूर्वी खास वऱ्हाडात वापरला जात असावा असे ‘जी जी ! आमचे गंगातीरीं धीडरे म्हणेति तुमंते वऱ्हाडी आहीता म्हणेति ’ (८८) या माहादाइसाच्या वाक्यावरून दिसते. याच लीळेत आहीता कसा करीत असत याची रीत दिलेली आहे ती पहावी. आहिता शब्द महाराष्ट्र शब्द कोशात नाही. ठेंटरे, पेवणे, मुठीये, सागवती या पदार्थांची नांवेहि

महाराष्ट्र शब्दकोशात नाहीत. हे पदार्थ पूर्वी वऱ्हाडातील असले पाहिजेत असे दिसते. ठेंटरीं हा जोंधळ्याच्या पिठाचा पदार्थ तयार कसा करीत याची माहिती १५० व्या आख्यायिकेत आलेली आहे. " जी जी वऱ्हाडीं भाकरि केसी जी ! " (२२४) या वाक्यावरून वऱ्हाडात भाकरी करीत नसत असा गैरसमज होण्याचा संभव आहे. पण या वाक्यात ' वऱ्हाड ' हा देशवाचक शब्द नाही, तर लग्नाला आलेली मंडळी या अर्थाचा तो आहे. अर्थात वऱ्हाडी मंडळीला द्यावयाच्या खाद्य पदार्थात भाकर कशी ठेवायची ? एवढाच महदाइसेच्या प्रश्नाचा अर्थ आहे. तो ती संपूर्ण आख्यायिका नीट रीतीने वाचणाराच्या सहज लक्षात येईल.

' वडेयाचें आंबट ' (२०१) या उल्लेखावरून वऱ्हाडात पूर्वी इकडे दहीवडा खाण्याची रीत असावी असे दिसते. तूपभात (२०१); दूधभात (१७४); दहीभात (११६); ताकभात (१७४) खाण्याची पद्धति लक्षात ठेवण्यासारखी आहे नुसत्या ताकाबरोबर जेवण्याची रीत (३८) वऱ्हाडातील खेड्यापाड्यात गरिबांच्या झोपडीतून अजूनहि चालू असलेली आढळते. ताकभात वगैरेंच्या ओळीत वरणभाताचा मात्र या ग्रंथात उल्लेख आढळला नाही. एके ठिकाणी ' चणेयाचे वरणाचा ' (३१३) व एके ठिकाणी ' चवळेयाचें वरणाचा ' (२०१) निर्देश आहे तो पहावा विशेषतः त्या ठिकाणी " मग मांडे आणि चवळेयाचें वरण " असे म्हटलेले आहे. यावरून (चवळीच्या) वरणाबरोबर मांडे खाण्याची पद्धत वऱ्हाडात होती असे दिसते. याच पद्धतीचा उल्लेख भास्करभट्ट बोरीकरकृत शिशुपालवधातील " रजवांचें हातवणीं सूदलें : गजमांसाचें वरण वाढिलें : तोंडांनि मांडे घातले : चाणौरमुष्टिकांचे " (४३७) या ओळींत रूपकाच्या साह्याने आलेला आहे. साध्या मांड्याप्रमाणेच साखरमांडेहि तयार करीत असत असे " मग तीहीं वडे : **मांडे** : अमृतफळें : खीरि : घारीया : पुरीया : उंबरे : फेणियां : **साकरमांडे** खीरि ऐसा बरवा पदार्थु उत्तमु नीफजवीला " (२४७) या उल्लेखावरून दिसते.

फेंदी, रुंड, मुंड, खापरखांड, बोडी, बोडीकारी, वोसारी, मोसारी, बोचकवडी, पंचकवडीया इत्यादि शिव्या श्रीप्रभूच्या तोंडी आलेल्या आहेत. शिव्या म्हणून का होईना पण ही भाषेतील शब्दसंपत्तीच गणायला पाहिजे. याशिवाय ज्यांना वऱ्हाडी म्हणता येतील असे डो, केजी, सातरी, सेव, पोपट,

पोथी, उळी, भिडा, काद्या, पुंजा, उबाळा, भिंतें; पानद, वावर, इळी, माय, (आई) लाहाकणं, चुची, भोई, धारुकें, जाडी, चामचोर, धरमाळी, राहाटी वगैरे अनेक शब्द प्रस्तुत चरित्र ग्रंथात आलेले आहेत. शेवटचे सहासात शब्द महाराष्ट्र शब्दकोशात नमूद झालेले दिसत नाहीत. सारांश, असे काही नवीन वऱ्हाडी शब्द हे प्रस्तुत ग्रंथाचे एक वैशिष्ट्य म्हणून मानायला हरकत नाही.

## काही सुंदर वाक्प्रचार व म्हणी

सर्वसाधारण भाषेच्या दृष्टीने जरी प्रस्तुत ग्रंथाकडे पाहिजे तरी अभ्यासकांना यात अभ्यसनीय अशा पुष्कळ गोष्टी आढळतील. खास वऱ्हाडी आणि घरगुती शब्द हे जसे या ग्रंथाच्या भाषेतील एक वैशिष्ट्य आहे तसेच सुंदर वाक्प्रचाराची योजना हेहि एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. योग्य वाक्प्रचारांच्या उपयोगाने भाषेतील अर्थवाहकता कशी वाढते हे या ग्रंथातील अनेक उदाहरणावरून वाचकांना अभ्यासता येईल. काही निवडक वाक्प्रचार पहा: डाव घालणे (१३); पूजा बांधणे (६५); कोणीं रीगणे (७२); फाटका पाय सूणे (९१); राज्य करणे (९७); ताट करणे (८०); बोले दांडेवरि मारणे (६२); टाव करणे (९७); वेल लावणे (९९); रूप करणे (१०७); पोटीची खाच जळणे (१२६); बेलसरी घालणे (१८०); पान लागणे (१३१); रसु अभिनवणे (२१३); घरवात करणे (२१३); सेस भरणे (२१३); धाए मोकलणे (२१३); सीत वाजणे (२६६); अपरोक्ष होणे (१); सीक लावणे (२१५); आड पडणे (२७१); मोडत येणे (२४) वगैरे. यांपैकी "राज्य करणे" (राहणे, नांदणे); "पान लागणे" (सर्पदंश होणे) हे वाक्प्रचार ज्ञानेश्वरीत आढळत नाहीत. वऱ्हाडात मात्र अजूनहि ते वापरले जातात. उदा:—

"गुणी पाहता जावई, माझ्या संतोषल्या भुजा
लाडणी गे सुखी जोडा, **करो राज** सदा तुझा[१]" (गीत ४५).

"गोरीला **लागे पान**, बारियांच्या वेटाळांत
डोले नाग पेटाऱ्यांत" (गीत ३८).

---

१ श्री. पां. श्रा. गोरे यांनी संपादलेल्या 'वऱ्हाडी लोकगीतें' या पुस्तकातून ही उदाहरणे घेतलेली आहेत.

यावरून हे वाक्प्रचार मुळापासूनच वऱ्हाडी असावेत असे वाटतें. पान=सर्प. या शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत पन्नग शब्दापासून झालेली आहे हे सांगायला नकोच.

या वाक्प्रचारा प्रमाणेच काही सुंदर म्हणी पहाः—'नीघरां जालें घर : धरीचीयां गोसावियां जाली वोसरी' ( १६ ); 'लोण नाहीं जें चींचेसीं खाइजे' ( १२२ ); वगैरे. अर्थवाहकतेच्या दृष्टीने पुढील काही वाक्ये लक्षात ठेवण्यासारखी आहेत. 'पाणियें दीवा पाजळला होता' ( १६९ ); 'चक्रस्वामींत्रीन गंगातीर तांबा जळतु देखीजतु असे जी' ( १८६ ); ऐसा आवघा लोकु पीडा भुनला' ( ११५ ); 'तयाचेनि दुःखें पोटीची खांच जळतचि असे' ( १२६); 'मग तीयें दीउनि कोथळोबा तीळु तीळु झीजेति' ( १९८ ); बंबाळ दीवा पाजळत असे' ( २६५ ) वगैरे वगैरे.

द्विरुक्त व जोड शब्दांच्या योजनेने भाषा अर्थवाहक व हृदयंगम कशी होते हे पुढील उदाहरणावरून दिसून येईल. 'तें **चुटचुटां** पेवों लागलें' (८); तवं चाक **करकरां** वाजे (९८) '**डुळडुळित** दसीया होति' ( २६ ); 'म्हणौनि **दुडुदुडु** करि धांव घेतली ( ८ ); '**झिरमीट झिरमीट** ऐसें पांणीं यत असे' ( २०९ ) वगैरे. याशिवाय खांदोखांदीं [ १४२ ] घरोंघरीं ( ४७ ); काढाकाढी ( १७ ); भींदाभींदीं ( २२० ) वगैरे; तसेच सिखासूत्र (१); चुकिभुलि ( २ ); चलनवलन ( ७ ); सेजाशाइलीया ( ७ ); जरुतावो ( ८ ); आश्चर्यवीस्मो ( २७, ५७ ); वाळलेंसुकलें ( ५८ ); फळतेंफुलतें ( ५८ ); साकपाक ( ८९ ); गतिमति ( ७५ ); मोटेथाटे ( १९४ ); मसीवसी (२७२); हाल्हळविल्हळ (२२३) इत्यादि जोड शब्द लक्षात घेण्यासारखे आहेत.

रचनेच्या दृष्टीने पुढील काही वाक्याकडे अभ्यासकाचे लक्ष वेधणे अवश्य आहे. "हेलभरि पाणीयां आंणींन" (७); "मग मीं घागरि भरुनि पाणीया घेउनि येइन" (९); "मग सुखींन झाली" (७); "म्हणौनि सुखींन जाली" (९); "तुम्हां लोभ करूं लाभे परि लेंकरू न लभे" (८); "ते मास-उपवासीं बैसली होतीं" (२००); "उचलुं बैसलीं: तवं नुचले (१९९); "कटकींहुनि रामासि म्हणौनि नींगाली" (२०३); "ते पुराण सांघतां लक्ष्मींद्रभटीं रसु अभींनवीला" (२१३); "तवं मध्यान एकि रात्रीं" (१५); "राउळीं लेंकरुवासि जतन केली असे" (७) वगैरे.

## व्याकरण विशेष

श्री गोविंदप्रभु चरित्राची भाषा ज्ञानेश्वरकालीन मराठी गद्याची असल्या-मुळे सर्वसाधारणपणे तत्कालीन बहुतेक व्याकरणविशेष प्रस्तुत ग्रंथात आढळतात. विभक्तीची रूपे पुढीलप्रमाणे आहेत. **प्रथमा** ए.व. दंडवत (३१); प्रकास (३२); मरुवाः दवना (११); कुरकुलीः केर्जा (११); लपंडाही (१२); उजीएद्धः पहुड (३२); पालउ, पाळौ (३७); पान्हावो (८); वीस्मो (१२): अ. वः पसुवा (२६८); वांबीया (२१९); संन्यासीया (२७९); दासी (१४७): भक्तिजनें (२६४); दहींयें: दुधें: तुपें: लोणियें: ताकें: (२५, २६); मोतींय (२१७). **द्वितीयाः** वीहीरी (८५); रीधपुरासिः मातेसि (१) सासुवेसि (३८); इसि (८); आमंसी (२६); तुम्हासि (५); गोसावियांतें (२); लेकरुवातें (८). **तृतीयाः** दृष्टि (४३); श्रीप्रभु (१२२); अंगठेन (१५५); मामेनि, माउसीयां (१); वरीखां (१); चाटां (३); गोसावीं (९); महाजनीं (१८); दीसें मांसें (२); दायंबायें (१८२); दायदादोयें (१८२); दादेसीं (१४); मीयां (६); म्यां (२९४); आंमंसी (२६); तेणें (१७४): तीया (७); तीहीः तेहीं (८); घोटेवरि (६४); दांडेवरि (६३); **चतुर्थी**; पाणीयेसीं (७); साधासीं (१७६); गोसावियांसि (१५०); दरिसनां (६९); चाटयां (२): राऊळालागि (१५०); वासरुवांलागि (३). तुम्हासि (८): **पंचमीः** माथां होउनि (४); हाटवटीं होउनि (२७); सराळां होउनि (९७); घरी होउनि (२८): घरींहुनि (१५०); घरुनि (१५१): कोल्हापुरुनि (२५५): श्रीमुखुनि (९७); दीहुनि (१९८): ठाउनि (९७): तेथौनि (७७); पैलांकडुनि (६); श्रीमूर्तिपासौन (४); **षष्ठीः** राउळाचां (६); ब्राह्मणाचां घरीं (१०); वांटयांचां (५); कुणबीयांचें (६'; गोसावियांचे मातेसि (१): तीचें (५७): तयांचें आंमुचें (६); आमुंचाचि (५); साळे उतरे (११); **सप्तमीः** पाळणाः कोणटां (९); दीसीं (१); अडीः वीहीरीं (७); डोइये (३): पाटांए (९); वांटयाआंतु (५); घरांआंतु (९).

द्वितीयेच्या " पाणीयां " या रूपाकडे अभ्यासकांचे लक्ष वेधावेसे वाटते. आजकाल असे रूप आपण वापरीत नाही. कै. राजवाडे यांनी ' ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण " या ग्रंथांत ( पृ. ३९ ) ' पाणिया–पाणियाँ ' ही

चतुर्थीची एकवचनी रूपे दिली आहेत. द्वितीयेचीहि रूपे तशीच असतात. तेव्हा 'पाणीयां' हे 'पाणी' या शब्दाचे द्वितीया विभक्तीतील अनेकवचनी रूप लक्षात ठेवण्यासारखे आहे.

द्वितीयेचा 'ला' प्रत्यय या ग्रंथात आढळत नाही. (हा प्रत्यय शिव-कालानंतर मराठीत आला असे राजवाडे यांचे मत आहे) तेव्हा, आजच्या वऱ्हा-डीत रूढ असलेला 'ले' प्रत्यय 'ला' चेच एकारान्त रूप ( उदा : माझ्या दाराहुनी : कळप राघोचे गेले : रंग हिरवा **चोळीले** ' [ व. लो. गीत १९ ] ' कोण काशीच्या वेगळं, **मले** म्हणणार जेव ' [व.लो. गीत १६] ) सापडत नाही यात आश्चर्य नाही.

आज वऱ्हाडात रूढ असलेले तृतीयेचे 'म्यां' हे रूप ( उदा: ठेवला चरणीं माथा, बाई **म्या** येतां जातां" [व. लो. गीत ११]; "कडु पिकलं कारलं, महादेवाला वाहिलं, सुनमुख **म्या** पाहिलं " गीत ४२ वगैरे ) प्रस्तुत चरित्र ग्रंथात पुष्कळ ठिकाणी आहे. पण ' मिनं, तुनं ' ही तृतीयेची रूपे तसेच 'माहा, तुहा' ( उदा: ' बाई वाघिणी गे **तुहा**, सांभाळ बिपट्या वाघ : **माहा** पारधी नेणता, गेला कालवडी मागं " ( व. लो. गीत ४१) ही रूपेहि आढळत नाहीत.

## पंचमी विभक्तीच्या 'हून' प्रत्ययाची उपपत्ति

**पंचमी विभक्ति**–प्रत्ययाच्या बाबतीत एक अत्यंत महत्त्वाचा विशेष प्रस्तुत ग्रंथात आढळतो. मराठीतील पंचमी विभक्तीचा 'हून' हा प्रत्यय व्युत्पत्ति-शास्त्राच्या दृष्टीने कसा बनला याविषयी विद्वानात बराच मतभेद आढळतो. प्राकृतातील 'हिन्तो' या प्रत्ययापासून तो आलेला आहे असे काहीजण म्हणतात. डॉ. भांडारकरांनी आपल्या भाषाशास्त्रीय व्याख्यानात 'होऊन' या 'हो' धातूच्या 'ऊन' प्रत्ययान्त धातुसाधितावरून तो आला अशी व्युत्पत्ति मांडली आहे. [Collected works of Sir R. G. Bhandarker Vol.IV. PP. 538]. बीम्स, ब्लोक व कृ. पां. कुळकर्णी हे याच मताचे पुरस्कर्ते आहेत. ( यादवकालीन मराठी. पृ. १६४ ) के. राजवाडे यांना हे मत मान्य नाही. कारण त्यांच्या मते " शक ९००पासून १२१२ पर्यंतच्या कोणत्याहि शिलालेखांत किंवा ग्रंथांत पंचम्यर्थीं होऊन हें धातुसाधित योजलेलें आढळत नाहीं. म्हणजे परंपरा-

---

१ ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण. पृ. १२–१३.

दृष्टथा व इतिहासदृष्टया हून हा प्रत्यय होऊन पासून साधला जाणे अशक्य आहे. " असे सांगून त्यांनी महाराष्ट्री प्राकृतातील 'पुत्तातो' या पंचमीच्या रूपापासून आपली व्युत्पत्ति बसवली आहे. [ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण पृ. १२–१३ ] वस्तुतः होऊन हे धातुसाधित पंचम्यर्थी कुठे वापरलेले नाही हे राजवाडे यांचे म्हणणे बरोबर नाही. कारण त्यांनी संपादलेल्या ज्ञानेश्वरीच्या आवृत्तीतच " पाताला **हौनि** निम्न । जियें उंचियें सानें गगन " ( अ. १६. ३२९ ) या ओवीत 'होऊन' हे धातुसाधित 'हौंनि' या रूपात तरतमभावाने आलेले आहे. पण पंचमीच्या अर्थाने 'होऊन' या धातुसाधिताचा प्रत्यक्ष व स्पष्ट असा उल्लेखच पाहिजे असेल तर तो प्रस्तुत चरित्रग्रंथात अनेकवार आलेला आहे. ( आणि या ग्रंथाचे प्रथम लेखन शके १२१० मधे झालेले आहे ही गोष्ट मीने पुढे दाखविलेली आहेच. ) पुढील वाक्ये पहाः—

" गुंडोचा **माथां होउनि** प्रकासु नीगतु असे " [४]

" नाः मीं **हाटवटीए होउनि** आलां " [२७]

" राउळो ! **घरीं होउनि** आमुचें लेंकरुं आणुनि देया कां " [२८]

" मी **सरालां होउनि** आलां " [९७]

" न्याय-भारथी **वारानसी होउनि** खेडासि आले " [२७९] वगैरे.

या सर्व उदाहरणात 'होउनि' हे धातुसाधित पंचमीच्या अर्थानेच वापरलेले दिसून येईल. मीने पाहिलेल्या 'वच्छहरण' काव्याच्या एका अत्यंत प्राचीन पोथीतील [ शके. १४५७ ] " आपुलें नावं एक धाडीं । जें बंदीसाले **होउनि** काढी " (४३९) या ओवीत देखील 'होऊन' हे धातुसाधित पंचमीच्या अर्थाने वापरलेले मला आढळलें. तेव्हा कै. भांडारकरांच्या मताप्रमाणे 'हून' प्रत्यय 'होऊन' पासून साधलेला आहे असे मानायला परंपरेची व इतिहासाची कांही हरकत दिसत नाही. 'होऊन' पासूनच 'हून' प्रत्यय तयार झालेला असावा हे पुढील उदाहणावरून दिसून येईल. [१] " **घरीं होउनि** आमुचें लेंकरुं आणुनि देया कां " (२८) व " तीचा **घरींहुनि** भक्तीजनीं आणिलें " (१५०). [२] " मी **सरालां होउनि** आलां " (९७) व " म्हाइंभट **सराळाहुनि** मात्रेचा चतुर्दसीं आले " (९७). या उदाहणावरून 'हून' हे रूप 'होऊन' पासूनच तयार झालेले आहे हे स्पष्ट दिसून येईल.

आणि या 'हून' पासूनच 'ऊन' प्रत्यय बनला असावा असे " तीचा **घरींहुनि** भत्तीजनीं आणिलें " [१५०] व " मग केमवननाएकाचीय **घरूनि** तुगी आणीर्लीया " [१५१] या उदाहरणावरून म्हणायला हरकत नाही. ज्या पोथी-वरून मीने प्रस्तुत चरित्रग्रंथ छापला आहे तीत ' होउनि ' हे धातुमाश्रित पंचम्यर्थी वापरलेले असल्यामुळे तिची मूळ प्रत किती जुनी असावी याची अभ्यासकांना सहज कल्पना करता येईल.

## क्रियापदांची रूपे.

नामविभक्तिरूपे पाहिल्यानंतर आता काही क्रियापदांची रूपे पाहू या.

(१) **प्रथम पुरुषी क्रियापदांची** पुढील रूपे लक्षात घ्या.

" म्हणौनि यथ टाकुनि **आलां** " (१६)

" **मीं** हाटवटीए होउनि **आलां** " (२८)

" **मी** सरलां होउनि **आलां** " (९७)

" **मी** भीक्षे **गेलां** होतां " (२२२)

अशी रूपे तत्कालीन गद्यपद्य वाङ्मयात विपुल आहेत. [ स्मृ. स्थ. १०६; ह. पा. ११, ९९, १०५; ऋद्ध. ६२, ६४३ वगैरे ]. आजच्या वऱ्हाडात ती नाहीत. खानदेशात मात्र अशी रूपे अजून क्वचित वापरली जातात. ' तयासि जरि नेमु होववैल तरि आम्ही **एउनि** " [ येऊं ]; " तरि आम्ही **वीचारुनि** [ विचार करूं ] मग **येउनि** " [ येऊं ] [ २०९ ] ही प्रथम पुरुषी अनेक-वचनी रूपे आहेत. यातील शेवटचा ' नि ' आता केवळ शीर्षबिंदूच्या रूपाने शिल्लक राहिलेला आहे. प्रथम पुरुषी भूतकाळी स्त्रीलिंगी रूपे " **वीसरलीयें** राउळो ! " [ १५० ]; " जी ! जी ! **आलीए** जी " [ २०३ ] यात आढ-ळतात. " वीसरलीयें," "आलीए" ही जुनी रूपे आजच्या शिष्ट म्हणून समजल्या जाणाऱ्या भाषेत विसरलें–ल्यें; आलें–ल्यें अशी झाली आहेत; तर वऱ्हाडीत ती विसरलीं, आलीं अशा स्वरूपात विद्यमान आहेत. उदाः " विठ्ठल **झालीं** अंतःकरणीं । गृहधंदा मी **विसरलीं** " " गृह सोडुनियां धरलें रान । वृंदा-वनांत मी **शिरलीं** " [ देवनाथ. पद. ७९ ] याशिवाय पुढील ओव्या पहाः

" पहांटेच्या प्रहरीं, मला संसाराचा धंदा
नांव तुझं रे गोविंदा, **विसरली**[1] "
" भाऊजी लक्षीमणा, ठेवा रथ जरा उभा
म्हणे सीता " **विसरली**, घरीं कुंकवाचा डबा[2] " [ गीत ७ ]
" भरल्या बाजारांत, **आली** रिकाम्या पदरीं [ गीत ३२ ]
" बाई सर्व लेणं **लेली**, **लेली** लसण्या ताईत
कुंकु कपाळीचं लाल, साऱ्या लेण्यांचा नाईक " [ गीत ७२ ]
" गोड जेवण **जेवली**, माझ्या माउलीच्या ताटीं " [ गीत ७६ ]

सारांश, हल्ली वऱ्हाडात रूढ असलेल्या प्रथम पुरुषी भूतकाळी स्त्रीलिंगी क्रियापद रूपांचे मूळ " वासरलीयें " " आलीए " या सारख्या क्रियापदरूपात आहे हे दिसून येईल. " कसारीण बाई। बिलोर भर मला, रुपया **देतो** तुला " ( व. लो. गीत. ३४ ); " आज तुला संसाराच्या, पिया **सांगतो** कहाण्या " ( व. लो. गीत ४३ ) या सारख्या प्रथम पुरुषी वर्तमानकाळी स्त्रीलिंगी रूपांचा मात्र या चरित्रग्रंथात कुठे मागमूस आढळला नाही ! प्रथम पुरुषी भविष्यकाळी एकवचनी रूपे आजच्या सारखीच आहेत. उदाः " पाणीयां **आर्णीन** " (७); " पाणीयां घेउनि **येइन** " (९) वगैरे. पण " काइ **करीन** वो आई " (७); " आतां काइ **आर्णीन** राउळो " (८); या वाक्यात मात्र करीन, आर्णीन हीं रूपे प्रश्नार्थक आहेत.

**( २ ) द्वितीय पुरुषी क्रियापदाची रूपे** पहाः– ' धनें आथिला **असासि** (१७२); 'धोपटीं **होस** न : मसीघसी **होस** न : (२७२); 'तु यथ **आहासि** म्हणे ' ( २२८ ); " आवो तुं ठाउवा ठाउवा **होसि** म्हणे " ( २६५ ). आधुनिक ' आहेस ' या क्रियापदरूपासाठी असासि, आहासि, होसि, होस ही रूपे पूर्वी प्रचलित होती. यांपैकी "असासि" हे रूप आज केवळ पद्यात वापरले जाते. " आहेस " हे रूप तर प्रचलितच आहे. पण " होस " हे रूपहि वऱ्हाडातील खेड्यापाड्यात आजहि ऐकायला मिळते.

" कारे बोबाते **असा–अहा** " ( २७ ) " आवो तुम्हीं **आहा** म्हणे :

---

१ साहित्याचें मूलधन. पृ. ५. २ हे व या पुढील उदाहरणे श्री. गोरे यांच्या वऱ्हाडी लोकगीतातील आहेत.

नांहीं म्हणे : **आहाति** म्हणे" (२५४). "असणे" या धातूची ही अनेकवचनी रूपे आहेत. शिवाय 'तुं दामु काइसया **देतासि**' (१७२); 'आवो काह्या नेतासि' (१५६) ही वर्तमानकाळी रूपें; "एल्हो **भुकैलीसि**" (१७४); "एल्हो ! तुं आजि कोठे **होतीसि**" (१५३) "आवो ! तु राउळातें वोवाळु **गेली होतीसि**" (१५३) ही भूतकाळी प्रश्नार्थक रूपे व "आवो ! राउळा चाखों **देतीसि** तरी तुझें **वीकतें** (२६) ही संकेतार्थक रूपे पहा. यातील तू **येतीस** तर, **जातीस** तर ही रूपे आजहि वऱ्हाडात प्रचलित आहेत. प्रांथिक भाषेत या ऐवजी सामान्येकरून 'आली असतीस,' 'गेली असतीस' अशीच रूपे वापरली जातात.

(३) 'अस' क्रियापदाचे **तृतीय पुरुषी रूप** पहा: "मोदळां **आहाति** म्हणे" (१४९); 'आवो **आहाति आहाति** म्हणे' (१५०) "नां: राउळ **आहाति**" (१५६); "**आहाति** म्हणोनि गोसावी मागताति कीं !" (२२०). वगैरे. ही रूपे तर वऱ्हाडी आहेत. आजच्या प्रांथिक भाषेत "आहांत" हे रूप द्वितीय पुरुषी अनेकवचनी म्हणून वापरले जाते. उदा: तुम्ही आहांत. तृतीय पुरुषी अनेकवचनी रूप "आहेत" असे आहे. उदा:–ते आहेत; आंबे आहेत, वगैरे. या 'आहेत' ऐवजीच 'आहात' हे रूप आज वऱ्हाडातील खेड्यातून वापरले जाते. उदा:– मालक घरात **आहात.**' "आहात" हेच रूप 'आहाति' या स्वरूपात आपणास गोविंदप्रभु चरित्रात आढळते, हे वरील उदाहरणावरून दिसून येईलच.

द्वितीय पुरुषी एकवचनी आज्ञार्थाची पुढील रूपे लक्षात घ्या:—

"**जाय** नींदेवाचे नींदेवे" (१५६)

"परते **जाय**" (५८)

"आवो मेली **जाय**: परती परती **जाय**" (२४२)

"आवो कृष्ण रुक्मीणी **गाय** म्हणे: तुरया थाट **गाय** म्हणे:" (२२४)

"काह्यां काह्यां बोबातीसि ? **खाय खाय**: गोड असे म्हणे" (१२३)

"आवो मेली **जाय**...आवो हे **खाय खाय**:" (२४६)

"आबैसीं म्हणीतलें उभे ! उगी **अस**" (१३३)

"याचां सेजारीं **अस**" (८)

यातील आज्ञार्थी क्रियापदे आजहि वऱ्हाडात वापरली जातात. उदाहरणार्थ पुढील अवतरणे लक्षात घ्याः—

" वाटच्या वाटसरा ! वाटेनं तूं उगा **जाय**
आगाशीं आंबा, गोटा मारून करिसी काय " ( व. लो. गीत ५२ )
" भाऊ बोलावे जवळ, बोले '**बस** माझ्या ताटीं'
बोलल्या वहिनी आंत, सारी सोय माझ्या हातीं" ( व. लो. गीत २१ )
" ऐक सखये तुज विनवीतें
कृपा करीं **जाय** माय निरुतें
यमुना तिरीं गोवत्सांतें
चारितो **जाय** सांग त्यातें " ( दयाळनाथांची कविता. पद ३८ )

प्राचीन मराठीत 'जाए'; 'खाए'; 'गाए' अशी रूपे आढळतात. ती तर प्रस्तुत ग्रंथात आहेतच; पण त्याशिवाय जाय, खाय वगैरेहि रूपे आहेत. ती वऱ्हाडी मानायला हरकत नाही. इतरत्र ती फारशी वापरण्यात नाहीत. असणे, बसणे या क्रियापदांची 'अस' 'बस' हीच आज्ञार्थी रूपे बरोबर व शुद्ध वाटतात. पण त्याऐवजी पुण्यामुंबईच्या भाषेत 'ऐस' 'बैस' रूपे करतात. ती किती कर्णकटु वाटतात याचा अभ्यासकांनी विचार करावा. याच नियमाप्रमाणे मग पुण्या-मुंबईच्या भाषेत हसणे, डसणे वगैरेची आज्ञार्थी रूपे 'हैस' 'डैस' अशी व्हायला पाहिजेत. पण तेथे मात्र 'हस' 'डस' अशीच रूपे ते करतात. मग असणे बसणे यावरच 'ऐस बैस' चा हा अत्याचार का? याच्या तुलनेने वऱ्हाडी 'अस' 'बस' या रूपांची शुद्धता सहज कळून येईल.

या शिवाय पुढील आज्ञार्थी रूपे पहाः—

" आतां आरोगणा **कीजो** जी " (१४७)
" जी जी आता **सांडीजो** जी ! " (१४८)
" जी जी आतां **जाइजो** आपुलेनि ऐश्वर्यें (९०)

हीच रूपे पण भविष्यकाळार्थी आजहि वऱ्हाडात प्रचलित आहेत. करजो; सांडजो; जाजो ही त्यांची आधुनिक वऱ्हाडी स्वरूपे होत. उपर्युक्त उदाहरणात ही आज्ञार्थी रूपे वर्तमानकाळी आहेत. पण वऱ्हाडात जाजो, करजो, बोलजो वगैरे आज्ञार्थी रूपे भविष्यकालार्थी वापरली जातात. हा फरक अत्यंत महत्त्वाचा

आहे. तो लक्षात येण्यासाठी प्रत्यक्ष एकदोन उदाहरणे पाहू या. श्री.पां.श्रा.गोरे यांच्या "वऱ्हाडी लोकगीतातील", आणि श्री. चोरघडे व कालेलकर यांच्या "साहित्याच्या मूलधनातील" पुढील ओव्या पहा. रामाच्या उत्तर चरित्रात गंगा-दर्शनासाठी बाहेर पडत असतांना आपल्या मागे रामाची चाकरी कशी करावी याविषयी सेवकांना समजावून सांगतांना सीता म्हणते—

जाते सीताबाई वना, सेवभार वहिणीला
" **धुजो** हलक्या हातांनी, रामाचा रेशमी शेला." (व. लो. गी. ७)
" दिवाळी दसरा, आला कार्तिक महिना
कंथ धा**डीजो** पाहुणा–गोरेबाई " (साहित्याचें मूलधन. पृ. ६५)
' देवाबापा नारायणा, तुम्ही अस्तमाना **जाजा**
याद माझी राहूं **देजा,** हृदयात ' [ सा. मू. पृ. ३३ ]

यातील खास वऱ्हाडी 'धुजो', ' धाडीजो ' [ धाडजो ] ही एकवचनी व 'जाजा', 'देजा' ही अनेकवचनी आज्ञार्थी रूपे भविष्यकालीन आहेत, हे अर्थावरून सहज कळून येईल. पण गोविंदप्रभु चरित्रातील वरील रूपे आज्ञार्थी असली तरी ती वर्तमानकालीन आहेत, भविष्यकालीन नाहीत, हे लक्षात ठेवावे. अशी भविष्य-कालीन रूपे मला प्रस्तुत चरित्रग्रंथात आढळली नाहीत. इतर ग्रंथातहि नाहीत. श्री. वामनराव देशपांडे यांनी वऱ्हाडीतील वैशिष्ट्ये दाखवितांना देजो, जाजो, करजो, येजो अशी रूपे " ज्ञानेश्वरकालीन महानुभाव ग्रंथात या रूपांची सढळ हाताने खैरात उधळली आहे" [विचारसमीक्षा पृ.८] असे जे म्हटले ते,वरील सूक्ष्म फरक लक्षात घेतला तर यथार्थ नाही असेच म्हणावे लागते. त्यांनी दिलेली उदाहरणे वर्तमानकाळी आज्ञार्थाची आहेत तर वऱ्हाडात ही रूपे भविष्यकाळार्थी वापरण्यात येतात. अशी आज्ञार्थी पण वर्तमानकाळी रूपे आज वऱ्हाडात वापरली जात नाहीत. असो.

याव्यतिरिक्त सर्वत्र आढळणारी 'घेया' (७) ' देया ' (५) ' नेया ' (८) 'बैस' (१०४); ' उठा ' (१५); ' आणा ' (१०) वगैरे आज्ञार्थी रूपे प्रस्तुत चरित्र ग्रंथात विपुल प्रमाणात आहेत.

नेहमीच्याहून थोडी निराळी अशी पुढील वाक्ये लक्षात घ्यावी ' अण न खातिः उदक न **पीयति** ' (१९८); ' तयांसवें पांचसे संन्या**सीयां होतीं** '

(२७९); मग जयाचे **मरांवे असे'** (४१) वगैरे. अनेक ठिकाणी शब्द लिहितांना 'ह'कार पुष्कळ वेळा आलेला दिसतो. उदाः—कोण्ही (७); तेहवाळि (७, ८, ९); तेव्हलि [ ]; कोण्हाचीय घरांचे मरण्हार असे' [४१]; कव्हणी [१०७]; बीहवात्र [९५]; नीहपति [१०६]; ल्हाउं (८२); जोन्हळे (१५३) उन्ह ( ) वगैरे वगैरे.

## तुमन्त आणि ल्यबन्त रूपे

"**जेऊं** बैसलीया" (३८) ; **धों** लागेति" (४०); "**रीगों** नेदीचि" (४५); पदों घातलें" (२); "**पेवों** लागलें" (५७ ; "**भेओं** लागले" (५) **आणुं** जाति" (३) वगैरे अशी तुमन्त रूपे आणि आणुनि (१५); घेउनि; टाकुनि (१६); उचलुनि (७); म्हणौनि (९, १२); हाणौनि (४४); नीरपौनि (४४); सांडौनि (५); ठाकौनि (५) अशी ल्यबंत रुपेहि पुष्कळ आहेत. आणुनि, घेउनि अशा लयापेक्षा सांडौनि, ठाकौनि अशी "औनि" प्रत्ययान्त ल्यबन्त रूपे प्रस्तुत ग्रंथांत अधिक आहेत. त्यावरून भाषेच्या व पोर्थाच्या प्राचीनपणाची सहज कल्पना करता येईल.

उन व औनि प्रत्ययान्त ल्यबन्त रूपा प्रमाणेच उ प्रत्ययान्त ल्यबन्ताचीहि अनेक रूपे प्रस्तुत गद्य ग्रंथात आढळतात. ही रुपे म्हणजे आजच्या वऱ्हाडी भाषेचा एक महत्त्वाचा विशेष होय. गुंडून गुंडून या ऐवजी '**गुंडु गंडु**' (२२०); सोलून सोलून याऐवजी '**सोलु सोलु**' (१७२); 'ऐसे अवघे उलथ उलथु अवलोकीलें' (२२४) इत्यादि रूपे लक्षांत घ्यावां. 'गुंडु गुंडु', 'सोलु सोलु' 'उलथ उलथु' या रूपात वऱ्हाडीपणा आहे. आज देखील **रडू रडू** त्याच तोंड उतरलं', 'तो लावू लावू खात होता' अशी रूपे वऱ्हाडातील खेड्यापाड्यातून सर्रास वापरली जातात. पुढील उदाहरणे पहाः—

घराची अस्तुरी, बेजार **लाजू लाजू**
बाहेरच्या नारीसाठी, खिशांत नेतो काजू (व. लो. गीत ६३)
उभी माडीवर, माडी, जळे दिवा **राहूराहू**
वर चौसर खेळती, भावजय माहा भाऊ (व. लो गीत ६६)
वर नजर भरोनी, पाहतां कां **रांगू रांगू** (व. लो. गीत ७०)
गावाला गेले दादा, वहिनी किती सांगू

यातील 'लाजू लाजू,' 'राहू राहू' व गोविंदप्रभु चरित्रांतील 'गुंडु गुंडु,' 'सोलु सोलु' ही रूपे सारखीच आहेत. 'रीगों बैसली' (स्मृ. २३;) 'जाऊं बैसली' (स्मृ. ५३) ही रुपे देखील ऊन कृदन्ताची (= ल्यबन्ताची) म्हणून डॉ. तुळपुळे यांनी दिलेली आहेत. (यादवकालीन मराठी पृ. २५१) पण ज्या वाक्यात ती वापरली आहेत ती वाक्ये नीट लक्षात घेतली तर दिसून येईल की ही रूपे ल्यबन्ताची नसून तुमन्ताची आहेत.

**अकरण रूपांची उदाहरणे** तर प्रस्तुत ग्रंथात विपुल आहेत. उदाः–नेजवीति (५); नेदखे (७); नेवाचि (८); नुठी (१६); नेदीसीचि (२५); नाणवे (९१); नेजवावा (९१); नुपकरें (९४); नेफेडावीया (१४७); नोव्हवा (२२७), नेयों (२७८) वगैरे.

**जोड शब्दाला प्रत्यय लावतांना** पहिल्या शब्दाचे साधे सामान्य रूप करण्याची रीत पुढील उदाहरणावरून दिसेल. "लाडुवां तिळुवागांची चुरि" (५०); "मातांगां माहाराचां घरीं" (४७); "दीक्षीतां ब्राह्मणांचां घरीं" (४७; "एळां मीरीयां लवंगाची" (८८)

**विशेषणविशेष्यांना तृतीयेचे प्रत्यय** कधी निरनिराळे लागतात. उदाः–आगळेन मोलें (२६); दुनलेनि मोलें (५२); दुसरेनि श्रीकरें (९७); डरियाचेनि पाणियें (९१); आवघेन लोकें (७०) वगैरे, तर कधी दोहोंनाहि एकच प्रत्यय लागतो. उदाः–श्रीचरणांचेनि अंगुठेनि (९१); पुवीलेनि दारवठेनि (१०१) वगैरे.

**तरतमभाव** दाखवण्याची पद्धति पहा. "तुम्हीं भीक्षुकांचीं भीक्षुकें होआ" (१६७); "जाय नीदैवांच नीदैव!" (१५६); "हा ठाओ पवीत्राचा पवीत्रु जाला जी" (३१३), वगैरे.

### इतर आनुषंगिक ग्रंथ

गोविंदप्रभु चरित्राशी संबद्ध असलेल्या काही आनुषंगिक ग्रंथांचा या ठिकाणी उल्लेख करणे अवश्य आहे. त्यापैकी कृष्णमुनिविरचित 'ऋद्धिपूर–माहात्म्याचा' उल्लेख पूर्वीच केलेला आहे, (पृ. १२) तो या ठिकाणी लक्षात आणावा. प्रस्तुत मराठी ग्रंथात, गोविंदप्रभूचे निवासस्थान असलेल्या रिद्धपुरचे माहात्म्य नाना तऱ्हांनी वर्णन केलेले आढळते. हा मराठी ग्रंथ ज्या ग्रंथाच्या आधारे

लिहिला तो संस्कृत ग्रंथहि मला पहावयास मिळाला. पण या ग्रंथाच्या पोथीला आदि व अंत नसल्यामुळे तो कुणी लिहिला हे सांगता येत नाही. त्यातील प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "इति श्रीसिद्धयामळेमहान्मायागमेसैह्याद्रिखंडे–ऋद्धिपुरमाहात्म्ये तीर्थलक्षणं नाम······अध्यायः" असे उल्लेख आहेत. यातील ऋद्धिपुरचे महात्म्य वाचले म्हणजे महानुभावांच्या अंतःकरणातील या नगरी विषयीच्या पवित्र प्रेमाचा प्रत्यय सहज येतो; आणि महाराष्ट्राविषयी त्यांनी प्रगट केलेली विशेष आस्था पाहून अभिमान वाटतो. अयोध्या, मथुरा, माया वगैरे सात पुरी मोक्षदायक म्हणून सांगितलेल्या आहेत खऱ्या पण

तथापि ताः प्रहित्वा वै महाराष्ट्रस्थितानि च
बुधास्तीर्थानि सेवंते महाराष्ट्रं च सर्वदा ( २–५ )

ही त्यांची भावना आहे. आणि म्हणूनच आपल्या पवित्र तीर्थाशी महानुभावी-यांनी या सप्तपुरींचे पुढील प्रमाणे साम्य कल्पिले आहे.

काशीं प्रतिष्ठानपुदाहरंति यद्द्वारका ऋद्धिपुरं वदंति
पुरं त्वळकं मथुं ब्रुवंति ह्याळापुरं चैव वदंत्ययोध्यां ( २–६ )
वंकीं च मायां प्रवदंति लोके कांतीं फळस्थानमिति ब्रुवंति
तच्छिन्नपापं प्रवदंत्ययोध्यांवर्य्यां महाराष्ट्र उदार भाषा ( २–७ )

असे सांगून नंतर

कळौ ऋद्धिपुरीं रम्यां ये गच्छंति नरोत्तमाः
कुळकोटिशतैर्युक्तास्ते गच्छंत्यच्युतं पदं

या पद्धतीने अनेक श्लोकात ऋद्धिपुरचे माहात्म्य व तेथील यात्रेचे फळ वर्णन केले आहे. ऋद्धिपुरला एवढा मोठेपणा महानुभावांच्या दृष्टीने जो आलेला आहे तो तेथे झालेल्या श्रीगोविंदप्रभूच्या अवतारामुळे. या गोविंदप्रभूचे चरित्र प्रस्तुत संस्कृत ग्रंथाच्या आठव्या अध्यायात आलेले आहे.

ग्रामे प्रभुः कंटसरे पवित्रे
वैदर्भ देशे मनुजस्य वेषं

---

१. या श्लोकात 'अयोध्या' नावाची पुनरुक्ति झालेली आहे. तेथे 'अवंति' नाव असावे. हा पोथी 'लेखका'चा प्रमादहि असू शकेल. तसेच 'कांती' ऐवजी 'कांची' असे असावयास पाहिजे.

श्रुत्वा वरं ऋद्धिपुरे रराम
तत्प्रांतसद्ग्रामसमूह एव ( ८-३ )

अशा रीतीने चरित्राला प्रारंभ केला आहे. द्राविड देशातील कृष्णशर्मा नावाच्या ब्राह्मणाला भविष्यपुराणातील उल्लेखावरून रिद्धपुरला येण्याची स्फूर्ति झाल्याची कथा या संस्कृत ग्रंथातहि आहे. त्याने गोविंदप्रभूला सादर केलेला "हृदय भज परेशं स्वामिनं गुंडमाख्यं"—हा श्लोकहि आहे. दुर्दैवाने, मला मिळालेल्या पोथीच्या आठव्या अध्यायातील साडेतेरा श्लोकापुढील भागाची पाने गहाळ झालेली असल्यामुळे या ग्रंथाविषयी आणखी जास्त असे काहीहि लिहिता येणे आज शक्य नाही.

या दोन ग्रंथाशिवाय महेश्वर पंडित यांनी लिहिलेला "ऋद्धिपुर माहात्म्य" आणि कमलाकर व्यास अयाचित ऊर्फ कुमाराम्नाय कोठी विरचित "स्थानपोथी" असे आणखी दोन ग्रंथ, प्रस्तुत विषयाशी संबद्ध असे उपलब्ध आहेत. त्या विषयीची माहिती श्री. य. खु. ऊर्फ आप्पासाहेब देशपांडे यांनी नारोबास बहाळियेकृत 'ऋद्धिपूर वर्णना' च्या प्रस्तावनेत ( पृ. ११-१३ ) दिलेली असल्यामुळे तिची पुनरुक्ति या ठिकाणी करण्याचे कारण नाही. स्थानपोथीतील ऋद्धिपुर येथील स्थानांचा, म्हणजे विशेषतः श्रीगोविंदप्रभूच्या स्पर्शाने पवित्र झालेल्या स्थळांचा संपूर्ण भाग त्यांनी त्या पुस्तकातील परिशिष्ट अ मध्ये अंतर्भूत केला आहे तो अभ्यासकांनी जरूर पहावा.

## हेतुस्थळः वस्तुचंद्रिका

वर निर्देशिलेल्या चार ग्रंथाव्यतिरिक्त "हेतुस्थळ" या नावाचा आणखी एक ग्रंथ आहे तो फार महत्त्वाचा आहे. "न्यायव्यास बाइंदेकर" याने प्रस्तुत ग्रंथ लिहिला अशी माहिती श्री. य. खु. देशपांडे यांनी नमूद करून ठेवली आहे. ( महानुभावीय मराठी वाङ्मय पृ. ४२; मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २, पृ. ७३१ ) हा ग्रंथ मला नुकताच पहावयाला मिळाला. तो बाइदेशकरांच्या स्वतंत्र लिपीत लिहिलेला आहे. तिची किल्ली तयार करून त्यातील काही भाग मी वाचला. ग्रंथाच्या शेवटी "हे हेतु स्थळ नायाबासाचे ॥ ० ॥ हे स्थळ महास्थळ जानिजे ॥ ० ॥ शके १५९५..." असा उल्लेख आहे. त्यावरून ग्रंथ नायाबासाचा— म्हणजे न्यायंबासाचाच यात शंका नाही.

या हेतुस्थळाशिवाय चरित्र–हेतु वर्णन करणारा “ वस्तु चंद्रिका ” नावाचा आणखी एक ग्रंथ माझ्या अवलोकनात आला. ऋद्धिपुर–चरित्र–हेतु वर्णनाच्या आरंभी “रीधपुर चरीत्रें: पाठ शोधकाराचा: चरीत्र तात्पर्यार्थ बोलीला असे : लीळा भास्ये : गोपीभास्कर आन्वयेकार : वस्तुचंद्रिका स्थळ ” असा उल्लेख आहे. आणि शेवटी “ इती रिद्धपुर चरित्रें वस्तुचंद्रिका स्थळ : लीळा भास्ये : तात्पर्यार्थे : पाठ शोधकाराचा : लीळा आर्थमाळा आन्वयकार गोपीभास्करें लिहिला असे ॥ छ ॥ शके १५९८ (आ) नळ संवत्सरीं ॥ छः छः छः ॥

यावरून प्रस्तुत ग्रंथाचे नाव “ वस्तुचंद्रिका स्थळ ” असे असून तो गोपीभास्कराने लिहिलेला आहे आणि त्यात चक्रधरादिकांच्या लीळांचे हेतु आहेत हे दिसून येईल. श्रीगोविंदप्रभूंनी प्रत्येक लीळा कोणत्या हेतूने केली हे धार्मिक दृष्ट्या व तत्त्वज्ञानदृष्ट्या समजून घेण्यासाठी या ग्रंथाचे अध्ययन अवश्य आहे. हे लीळांचे हेतु कोणत्या पद्धतीने वर्णन केले आहेत ते लक्षांत येण्यासाठी दोन लीळांचे हेतु या ठिकाणी उद्धृत करतो.

“ **प्रतिगृहीं क्रीडा ॥** श्रीप्रभुगोसावी घरोघरीचीया उतरडी उत्तरीति : सकळ पदार्थां संबंध देतिः चाविशुकि करीतिः तरी भजनाचें गोमटें असे कीं: नसेः का प्रवेसन नाहीः ना स्वीकरीलें गोमटें नीर्हेतुकः उतरडी रचीतिः तेथ हेतु संबंधाचाः तें बाइको कोपैल म्हणौनि हें लीळा स्वरूपाचे आंत दानाचीः कां लीळेची राहाटि म्हणौनिः तथा मागीलही ॥

“ **कमळसेटी वीनती स्वीकारुः** कमळसेटी तो कांसारः श्रीप्रभुगोसावी तयाचीये आळीयेः तयाचीये घरा बीजें कहीं न करीतीचिः म्हणौनि कमळसेटी कांसारें वीनवीलेयां श्रीप्रभुगोसावियासी प्रवृत्ति आलीः पुजा आरोगण स्वीकरीलीः तरि मागां श्रीप्रभुगोसावी तें आळीए कां न वचतीचिः ना आणीकां अवताराचीया संतीचे जीव होते ते श्रीप्रभुगोसावी आंगीकरीलीः मग कमळसेटीचेनि गेलीः कणव ते मागुती आली म्हणौनि ॥ ”

या उताऱ्यावरून साधारणपणे प्रत्येक लीळेचा तात्त्विक हेतु कसा वर्णन केलेला आहे हे अभ्यासकांच्या लक्षात येऊ शकेल. यानंतर प्रस्तुत चरित्र ग्रंथाचा लेखक म्हाइंभट याचे चरित्र देऊन ही प्रस्तावना संपवितो.

**म्हाइंभटाचे चरित्र :**

म्हाइंभट हा मूळ सराळे या गावचा राहणारा. याच्या पत्नीचे नाव देमाइसा. गणपति आपयो नावाच्या एका विद्वान पंडिताजवळ याने पाच शास्त्रांचा सांगोपांग अभ्यास केल्यावर 'प्रभाकर' (?) नामक सहाव्या शास्त्राचा अभ्यास करण्याची त्याला इच्छा झाली. पण महाराष्ट्रात या शास्त्राचा अभ्यास करण्याची सोय कुठेच नव्हती. कारण त्याच्या अभ्यासाने अभ्यासकाच्या अंगावर कोड फुटते किंवा त्याचा निर्वंश होतो अशी समजूत त्यावेळी प्रचलित होती. त्यामुळे या शास्त्राच्या अभ्यासासाठी म्हाइंभट तेलंगणातील विद्यानगरीला गेला. पण पूर्वपरीक्षा घेतल्यावाचून तेथील पंडित त्याला शिकवण्यास तयार होईनात. आणि ही परीक्षा काही सोपी नव्हती ! एका देवतेच्या देवळात घंटा बांधलेली होती. हातात विडा घेऊन डोळे मिटून या घंटीला आपला स्पर्श होऊ न देता देवतेवर जो विडा वाहील तोच परीक्षेत उत्तीर्ण व्हायचा ! पण या दिव्यातून म्हाइंभट तीन वेळा यशस्वी रीतीने पार पडला. त्यावरून त्याच्या बुद्धिमत्तेविषयी तेथील पंडितांची खात्री झाली व त्यांनी त्याला 'प्रभाकर' दर्शन शिकवले. याशिवाय आणखी इतर शास्त्रांचाहि अभ्यास त्याने तेथे केला. या विद्याभ्यासामुळे व विशेषतः षट्शास्त्रप्रावीण्यामुळे प्रज्ञावंत म्हाइंभटाला गर्व चढला नसता तरच आश्चर्य ! आपल्या बुद्धीच्या व विद्येच्या गर्वाने फुगून जाऊन तो आपल्या पायात तृणाची वाकी घालू लागला व दिवसाढवळ्या आपल्यासमोर दिवटी पाजळू लागला. हेतु हा की इतर पंडित हे तृणाच्या वाकीप्रमाणे आपल्या पायाजवळ राहण्याच्या लायकीचे असून आकाशातील सूर्य हा दिवसा पाजळलेल्या दिवटीप्रमाणे आपल्यासमोर निष्प्रभ आहे हे इतरांच्या लक्षात यावे. अशा रीतीने विद्यासंपन्न पण गर्वान्ध होऊन म्हाइंभट महाराष्ट्रात परत आला. त्याने अनेक पंडिताबरोबर चर्चा करून त्यांना निरुत्तर केले. महाराष्ट्रातील पंडितामध्ये, गणपति आपयो यांना थोडफार काहीतरी येते, पण इतर पंडित तर अगदीच मंद आहेत असे त्याला वाटू लागले. हे पाहून गणपति आपयो एके दिवशी त्याला म्हणाले की डोबेग्रामी असलेल्या श्री चक्रधराची आणि तुझी भेट झाली तर तुझ्या या विद्येचे चीज होईल. हे कळल्यानंतर, चक्रधराशी वाद करण्याची म्हाइंभटाला तीव्र इच्छा झाली. पुढे लौकरच काही राजकार्यानिमित्त गणपति आपयो देवगिरीकडे जाण्यास निघाले. तेथून डोमेग्रामी

श्री चक्रधराच्या दर्शनाला जाण्याचा त्यांचा विचार होता. म्हणून म्हाइंभटाला बरोबर घेऊन ते गेले. रस्त्याने जात असता, चक्रधराशी कशा रीतीने वाद करायचा याचा विचार म्हाइंभट एकसारखा करीत होता. ते दोघे भामाठाणापाशी आल्यानंतर काही कामानिमित्त गणपति आपयो तेथेच राहिले; आणि तेथून डोंबेग्रामाकडे जाणाऱ्या पिंपळे वामन भटाबरोबर म्हाइंभट डोंबेग्रामाला गेला. गर्वाल्यतेमुळे चक्रधराला साष्टांग प्रणिपात न करता त्याने केवळ काया–प्रणाम केला. तथापि, श्रीचक्रधरस्वामींच्या सान्निध्याचा परिणाम म्हाइंभटावर झाल्याशिवाय राहिला नाही. त्यांच्या आंतर प्रभावापुढे तो दिङ्मूख होऊन स्तब्ध राहिला हे पाहून चक्रधरांनीच त्याच्याशी वादाला सुरवात केली. प्रथम मराठीत वाद चालू होता. पुढे म्हाइंभटाने संस्कृतातून वाद घालायला सुरवात केली. त्यावेळी अस्खलित व सुंदर संस्कृत भाषेत चक्रधर बोलू लागल्याचे पाहून म्हाइंभट आश्चर्यचकित झाला! या वादात शेवटी म्हाइंभट निरुत्तर झाला, श्री चक्रधरावर व त्यांनी सांगितलेल्या श्री गोविंदप्रभु अवतारावर ईश्वर म्हणून त्याची श्रद्धा बसली आणि संसारातून निवृत्त होऊन चक्रधराचे अनुयायी होण्याचे विचार त्याच्या डोक्यात घोळू लागले.

## पंथात प्रवेश: अनुसरण:

अशा विचारातच म्हाइंभट घरी परतला. पुढे काही दिवसपर्यंत बाह्यतः प्रापंचिक कृत्ये तो करीत असे हे खरे, पण संसारनिवृत्तीचे विचार त्याला काही केल्या सोडीनात. श्री चक्रधराचे अनुयायित्व स्वीकारण्याची तळमळ त्याला एकसारखी लागली. अशा स्थितीत एका भावे द्वादशीच्या दिवशी शौचविधी आटोपून हातपाय [illegible]ण्यासाठी त्याने हातात मातीचे टेकूळ घेतले व तो गंगेकडे जाऊ लागला. तेव्हा त्याच्या या निवृत्तिपर विचारांनी विशेष उचल खाल्ली. "सगळ्यांची व्यवस्था करून एका वर्षाने आपण निवृत्त व्हावे व अनुसरावे" असा विचार त्याला सुचला. "पण त्यापूर्वीच आपला देह गेला तर? बरे सहा महिन्यांनी, किंवा तीन महिन्यांनी किंवा एक महिन्याने अनुसरलो तर? पण त्यापूर्वीच आपण मृत्यु पावणार नाही कशावरून?" म्हणून एका आठवड्याने निवृत्त होण्याचे त्याने ठरवले. पण तेवढ्यानेहि म्हाइंभटाला समाधान झाले नाही. म्हणून दुसऱ्याच दिवशी निवृत्त होण्याचा त्याने निश्चय केला. पण

दुसरा दिवस उजाडलेला दिसेलच हे तरी कशावरून ? कारण या आयुष्याची शाश्वती काय ? मृत्यु केव्हां गाठेल हे कोण सांगू शकणार ? असे विचार मनात येताच म्हाइंभटाने त्याच दिवशी अनुसरण्याचा विचार केला. तत्पूर्वी घरी जाऊन सगळी निरवानिरव करावी असे वाटले पण तेहि त्याला पटले नाही. कारण "घरी गेल्यावर आप्तेष्टांचा मोह पडून आपली वासना पालटणे शक्य आहे. छे छे ! त्यापेक्षा आताच गंगेवर जाऊन हातपाय धुऊन मार्गाला लागावे. पण गंगेवर जाण्याइतका वेळ तरी का घालवा ? कदाचित, गंगेवर जातांना एखादा सर्प आपणाला दंश करून आपला देह घेऊन जाईल. त्यापेक्षा तावडतोब निघणे बरे," असा विचार करून तो चालू लागला. 'श्री चक्रधरांचे अनुयायित्व स्वीकारून आपण इकडेच ( आपल्या गावाजवळ ) राहिलो तर कदाचित आपले आप्तेष्ट आपल्याला परत नेण्याचा प्रयत्न करतील; त्यापेक्षा, परमेश्वरावतार म्हणून ज्या श्रीगोविंदप्रभूंचे नांव चक्रधरस्वामींनी सांगितले त्यांच्याकडेच जाऊन त्यांचे शिष्य होणे अधिक चांगले,' असा विचार म्हाइंभटाला सुचला. म्हणून तो तसाच सरळ रिद्धपुरला आला आणि त्याने श्रीगोविंदप्रभूंचे शिष्यत्व स्वीकारले.

### विरक्त म्हाइंभट

म्हाइंभट महानुभावपंथात कसा आला याचा असा हा मनोरंजक वृत्तांत, लीळाचरित्र ( उत्तरार्ध लीळा १११ व ४७१ ), श्रीगोविंदप्रभुचरित्र ( ली. ९७ ) व लक्षण बंद ( अन्यव्यावृत्ति ) यात आला आहे. श्रीगोविंदप्रभु व म्हाइंभट यांच्या प्रथम भेटीचा प्रसंग प्रस्तुत चरित्रग्रंथाच्या ९७ व्या आख्यायिकेत वर्णन केलेला आहे तो मूळातून पहावा. म्हाइंभट हा अतिशय श्रीमंत होता. पण आता निवृत्त होऊन तो श्रीप्रभुजवळ राहू लागला. तत्पूर्वी कदन्न व भिक्षान्न खाण्याची सवय करणे त्याला फार जड गेले. पहिल्या दिवशी तर भिक्षान्न घशाखाली उतरेच ना. कसाबसा एक घास घशात कोंबल्यावर तो ओकला. पण पुढे दोनतीन दिवसात त्याने भिक्षान्नाची सवय स्वतःला लावून घेतली. ( ली.च.उ. ४७१; गो. च. २५० ) आपल्या संपत्तीचा उपयोग तो श्रीप्रभूंच्या सेवादास्या-प्रीत्यर्थ करू लागला. रितपुरला श्रीप्रभूकडे येणाऱ्याजाणाऱ्यांना रीतीभातीप्रमाणे खेळापागोटे किंवा चीरचोळी द्यायची असली म्हणजे ती म्हाइंभटच विकत आणीत असे. ( ११२, १५२, १५३, २१३, २७२, २८३ वगैरे पहा ).

रितपुरला असतांना तो सोन्याचांदीचा व्यापार करीत असावा असे दिसते ( २४९, ३०५ ). पण तो पैसा श्रीप्रभूच्या सेवेला लावण्याच्या निमित्तानेच हा व्यापार असावा. एरवी म्हाइंभटाच्या विरक्तीला त्यामुळे डाग लागतो. रितपुर येथील गोविंदप्रभूचा राजमठ व त्या भोवतालची जागा म्हाइंभटानेच आपल्या पैशाने विकत घेऊन दिली होती हे प्रस्तुत ग्रंथातील ११५ व्या आख्यायिकेवरून लक्षात येईल.

## काही स्वभाव विशेष

म्हाइंभट लहानपणापासून अभिमानी व गर्विष्ठ होता. प्रथम त्याला आपल्या विद्येचा गर्व होता. पुढे विरक्तीनंतर श्रीप्रभूची सेवा करण्यासाठी " आपण " पैसा देतो असा गर्व त्याला वाटत असे. पण श्री चक्रधरस्वामींनी जसा त्याच्या विद्येचा गर्व नाहीसा केला तसाच श्री गोविंदप्रभूंनी त्याच्या सेवा-द्रव्याचा गर्व नाहीसा केला. ( २७१; २७२ ). चक्रधरांनी त्याचा विद्येचा गर्व नाहीसा केल्यामुळे त्यांच्यासमोर त्याचा मान विनम्र होत असली तरी इतरांना मात्र तो तुच्छच लेखायचा. चक्रधराच्या सेवेत असलेल्या नागदेवादिकांना तो " मुंडदेव " समजत असे. त्यामुळे नागदेवाला म्हाइंभट नमस्कार देखील करीत नसे. पण याहि बाबतीत चक्रधरांनी त्याचा गर्व हरण केला. शंकराचार्यापेक्षाहि नागदेव श्रेष्ठ असल्याची जाणीव म्हाइंभटाला झाली व तेव्हांपासून तो नागदेवाला नमस्कार करू लागला. ( लीळा चरित्र उत्त. १३५ ). त्याने स्वतःला एकदा " योगभ्रष्ट " म्हणवून घेतले हा तरी त्याच्या गर्वाढ्यतेचाच परिणाम नव्हे का ? पण 'योगभ्रष्ट' " तवं माझीये दसेचा नव्हे : मां तुमचीयें दसेचा काइ होइल " (स्मृ. स्थ. १९) असे नागदेवाने उत्तर दिल्यानंतर म्हाइंभट किती खजील झाला असेल ! सारांश, म्हाइंभटाची पूर्वीची गर्वाढ्यता संसारनिवृत्तिनंतर देखील पूर्णपणे नाहीशी झाली नव्हती.

अनुसरणानंतर त्याची पत्नी देमाइसा ही त्याच्याच सान्निध्यात राहत होती. गो. चरित्रातील १९७ व १९८ आख्यायिकेत वर्णन केलेल्या प्रसंगावरून ही बाई विरक्त होती की आसक्त होती हे वाचकांनीच ठरवावे. तिच्या वर्तनामुळे म्हाइंभटाने कोथळोबावर जसा आक्षेप घेतला तसाच एकदा गुरुकुळावर व विशेषतः महदाइसेवर घेतला होता. या दुसऱ्या प्रसंगी

म्हाइंभटाच्या पिशवीतून देमाइसेने दोन आसू चोरून ते आपल्या चोळीत लपवून ठेवले होते. पण चतुर महदाइसेने तिची चोरी उघडकीस आणली. (स्मृ. स्थळ. पान १०२). गो. च. १४६ लीळेत या बाईच्या लबाडीची आणखी एक गोष्ट आलेली आहे.

श्रीगोविंदप्रभूवर म्हाइंभटाची श्रद्धा मात्र अपूर्व होती. आणि म्हणूनच तो नेहमी त्यांच्या सेवेत निमग्न असायचा. "म्हाइंभटातें श्रीप्रभुदास्यावेगळें जो दाखवी तयांसि मी महावाक्य वाखाणिन" (स्मृ. स्थ. २४७) असे नागदेवाचार्यांनी एकदा म्हटले होते त्यावरून हीच गोष्ट सिध्द होते. गोविंदप्रभूच्या मृत्युपर्यंत तो त्यांची सेवा करीत असे. मृत्युनंतर त्यांना खांदा देणाऱ्या चौघामध्ये म्हाइंभट एक होता. खास श्रीचक्रधरानेरूपित शास्त्रामध्ये त्याची फारशी गति नसावी (स्मृ. स्थ. ६८); तथापि एकंदरीत त्याचा अधिकार मोठा होता (स्मृ. स्थ. ६९; ली. च. उत्त. ४८५) यात शंका नाही. इतराबरोबर वादचर्चा करण्याचा प्रसंग येई त्यावेळी अनेकदा म्हाइंभटच वाद करायचा (गो. च. २७९; स्मृ. स्थ. १९२ वगैरे). अशा चर्चांच्या प्रसंगी तो संस्कृतातून बोलत असे (गो. च. २८०). एकदा तर याच्या संस्कृत भाषणामुळेच याची चोरांच्या हातून सुटका झाली. (स्मृ. स्थ. २०)

### म्हाइंभटाचे ग्रंथकर्तृत्व

या सर्व गोष्टींपेक्षा "ग्रंथकार" म्हाइंभटाचे महत्त्व आपणाला विशेष आहे. म्हाइंभट हा स्वतः संस्कृत भाषेचा जाडा पंडित असूनहि त्याने आपली बहुतेक रचना मराठी भाषेतून केली याबद्दल त्याचे कितीहि कौतुक केले तरी ते थोडेच होईल. आतापर्यंत उपलब्ध झालेल्या माहितीवरून तरी म्हाइंभट हा मराठीतील आद्य ग्रंथकार म्हणून मानायला कोणतीच हरकत नाही. त्याने लिहिलेल्या चरित्रग्रंथांचे स्वरूप संकलनात्मक आहे. पण तेवढ्यामुळे त्याच्या ग्रंथकर्तृत्वाच्या कीर्तीला कमीपणा येतो असे नाही. विशेषतः या चरित्र-लेखन-कार्यासाठी त्याने केलेले श्रम (स्मृ. स्थ. १३९–१४२) लक्षात घ्यावे म्हणजे त्याच्या कार्याचे महत्त्व कळून येईल. श्रीचक्रधर स्वामींच्या आख्यायिका जेथे जेथे व ज्याच्या ज्याच्या जवळ म्हणून सापडणे शक्य होते तेथे तेथे व त्याच्या त्याच्याकडे जायला म्हाइंभटाने कधी आळस केलेला दिसत नाही. 'खेइभट कृषी करावेया जाति : त्यांसरीसे म्हाइंभटही जाति : खेइभट

कृषीकर्म करीति : आणि म्हाइंभट तयां मार्गा मार्गा गोसावीयाचीया लीळा पुसतिः खेइभट सांघति : त्या म्हाइंभट नमस्करूनि घेतिः मग भिक्षा करूनि जेवीति " ( स्मृ. स्थ. १४० ) केवढी ही तळमळ आणि केवढा हा प्रचंड उद्योग ! या प्रचंड उद्योगाला लागलेली मधुर फळे म्हणजे हे चरित्र ग्रंथ होत. त्यामुळे तत्कालीन मराठी भाषा, व्याकरण व वाङ्मय यावरच नाही तर इतिहास, धर्म, समाज इत्यादिकावर देखील फार मोठा प्रकाश पडतो. या सर्वांचे श्रेय जर कुणाकडे असेल तर ते म्हाइंभटाकडे. सारांश, आद्य मराठी गद्य ग्रंथकार म्हणून जशी म्हाइंभटाची कीर्ति अजरामर राहील तशीच ती आद्य चरित्रकार म्हणूनहि राहील हे निर्विवाद होय.

**म्हाइंभटाचे काव्य : धवळ्यांचा उत्तरार्धः**

पण म्हाइंभट केवळ गद्य लिहिणारा होता असे नाही तर पद्य देखील लिहिणारा होता. महदाइसेच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या ' धवळ्यां ' च्या उत्तरार्धांची रचना म्हाइंभट व लक्ष्मीधर भट यांनी केलेली आहे (स्मृ. स्थ. १७४) हा उत्तरार्ध महदाइसेसाठी रचलेला असल्यामुळे तो तिच्याच नावाने ओळखला जाणे वाजवी आहे असे श्री. वा. ना. देशपांडे म्हणतात. ( आद्य. म. कव. प्रस्ता. ११ ) पण ते बरोबर नाही. काव्य कुणासाठीहि लिहिलेले असो, ते ज्यांनी लिहिलेले असेल त्यांच्याचकडे त्याचे कर्तृत्व जाणे वाजवी ठरेल. म्हाइंभट व लक्ष्मीधरभट या दोघापैकी, धवळ्यांच्या उत्तरार्ध–रचनेचे बरेचसे श्रेय केवळ म्हाइंभटाचे असावे असे म्हणण्याला जागा आहे कारण " अन्वयस्थळा " च्या अनेक पोथ्यातून धवळ्यांचा उत्तरार्ध जसा म्हाइंभटाच्या नावावर निर्दिष्ट केला आहे तसा लक्ष्मीधरभटाच्या नावावर नाही. " आन धवळ म्हाइंभट संबंधुनि महदाइसाते सांघति तो श्रीगोविंदप्रभुवरि गावविला " असे हरिबास व सोंगोबास यांच्या अन्वयस्थळात म्हटले आहे; तर " पंच श्लोक आणि धवळे करूनीः मददंबे लागूनी म्हणवीती " ( ८३ ) असे कृष्णमुनीच्या अन्वयमाळेत लिहिले आहे. यावरून धवळ्याचा उत्तरार्ध प्रामुख्याने म्हाइंभटाने लिहिला असावा असे म्हणायला हरकत नाही.

**इतर पद्यरचना : " जतीचा दशकु "**

धवळ्यांच्या उत्तरार्धाशिवाय इतर स्फुट पद्यरचना म्हाइंभटाने केली आहे पण ती फार थोडी आहे. " चरणशरणपारं " इत्यादि पाच श्लोक व दहा

मराठी आरत्या म्हाइंभटाच्या नांवावर मोडतात. (हरिबास व सोंगोबास यांचे अन्वयस्थळ) या आरत्या " जतीचा दशकु " म्हणून महानुभावीयात प्रसिद्ध आहेत. या आरत्यांचे सगळेच चरण म्हाइंभटाने रचले असे नाही. तर पूर्वीच्या आरत्यात त्याने आपले काही चरण योजले म्हणून त्या त्याच्या नावावर मोडतात. काही स्वतंत्र आरत्याहि त्याने केलेल्या आहेत. त्याने केलेल्या आरत्यांची यादी हरिबास व सोंगोबास यांच्या अन्वयस्थळांत पुढीलप्रमाणे दिली आहे.

" सकळा मंगळाची होए जइं वृष्टीः तिया माते ॥ १ ॥ परम मंगळ जयाः परम पावन जया ॥ २ ॥ जएजएकारी मंगळ उच्चारी ॥ ३ ॥ परिएळी आरतिया उजळलिया ॥४॥ नारद तुंबर वीणा वाती ॥ ५ ॥ भुजंग जीणौनि आले मुरारी ॥ ६ ॥ परसरामें जो केला आचारी ॥ ७ ॥ जयाचि आवस्था तो पैं भेटला ॥ ८ ॥ सकळ सिध्दान्ता अगोचरा ॥ ९ ॥ जए मंगळ मंगळा ॥ १० ॥ ऐसिया दाहा आरतिया "

या काव्यकर्तृत्वाविषयी एका पोथीतील वृध्दाचारात मला पुढील उल्लेख आढळला: "म्हाइंभटीं भटा विद्येमान श्रीप्रभुचा सनिधानीं आर्तियाचा दशक केलाः तेथ काही सिद्धें पदें योजिलीः कांही आपण गुंफिलीः कोथोळोबासाचें नाव घातलेंः तो गुरूकूल घोकिलेः तो कवीश्वरबासीं टाचिलीः तया उपरि श्रीप्रभुगोसावियाचा वियोगीं म्हाइंभटीं आपुली सामग्री ईश्वरीं आर्पिलीः भणौनि ते काइही बंध न करितीचि " यावरून श्रीप्रभूच्या वियोगानंतर स्वतंत्र पद्यरचना म्हाइभटांनी केली नसावी असे दिसते. वरील आरत्याशिवाय " आजिचा दिन आम्हा सोनियाचा " ही आरती म्हाइभटाच्या नावावर एका पोथीत असल्याचा उल्लेख श्री. वा. ना. देशपांडे यानी स्मृतिस्थळाच्या प्रस्तावनेत ( पा. १५ ) केला आहे. गीता वाखाणीत असतांना तात्काळ पदे करण्याइतके शीघ्रकवित्व देखील म्हाइंभटाच्या अंगी होते; (गो. च. १३५) हें लक्षात ठेवण्यासारखे आहे.

अशा गद्यपद्यकार प्रज्ञावंत महानुभावाने संकलित केलेल्या श्रीगोविंद-प्रभूच्या आख्यायिकांचा चरित्रग्रंथ आता आपणास अभ्यासावयाचा आहे. तेव्हा " झाले एवढे मंगलाचरण पुरे झाले " असे म्हणून ही प्रस्तावना इथेच आटोपतो आणि अभ्यासकांना प्रत्यक्ष आख्यायिका वाचून त्यांचा आस्वाद घेण्याची विनंती करतो.

---

## आणखी थोडे : चिद्धव नाव :

प्रस्तावनेच्या २५ व्या पानावर उल्लेखिलेल्या ‘ चिद्धव ’ नावाविषयी थोडा खुलासा करणे अवश्य आहे. “ गुंडो ” आणि “ गोविंद ” या नावाप्रमाणेच “ चिद्धव ” हेहि गोविंदप्रभूचे एक नाव असल्याचे दिसते. ‘ हृदय भज परेशं स्वामिनं **गुंडमाख्यं** ’ या ऐवजी ‘ **चिद्धवाख्यं** ’ असा एक पाठ आहे. याशिवाय (१) ‘ विंध्याशैल समीपखेडविशदप्रांतं पुरं ऋद्धिरं । नामास्य द्विज **चिद्धवे**ति ’–दर्शनप्रकाश. पृ. ८३; (२) ‘ देवा **श्रीचिद्धवातें** स्तविन इति पुढां ज्ञानतूर्यान्वयातें ’–ध्यानामृतस्तोत्र; (३) ‘ भजैक आदि **चिद्धया**–स्वभूमि शुद्ध ऋद्धया ’ –गोविंदप्रभ्त्राष्टक (४) ‘ नमो **चिद्धवा** आर्यलीळा–विहारा ’–वाकी मालास्तोत्र; वगैरे उल्लेखावरून चिद्धव हेहि गोविंदप्रभूचे नाव असल्याचे दिसते. प्रस्तुत चरित्रग्रंथात व श्रीचक्रधरस्वामींच्या मुखी मात्र हे नाव आढळत नाही. ते तदुत्तरकालीन कवींनी वापरलेले आहे हे लक्षात ठेवावे.

## दवडण्याचा अवतार :

परमेश्वराचे अवतार घेण्याचे प्रकार तीन आहेत. गर्भ, पतित व दवडणे. पैकी गोविंदप्रभूचा अवतार ‘दवडण्याचा’ होता. या प्रकारात परमेश्वर, मातेच्या गर्भातून एखाद्या जीवाला दवडवितो आणि तेथे आपण अवतार घेतो. अशा वेळी, दवडलेल्या जीवांचे देहधर्म व स्वभाव त्याला स्वीकारावे लागतात. गोविंद-प्रभूच्या अवताराने ज्याला दवडले होते तो जीव वेडापिसा होता. त्याचे देहधर्म स्वीकारावे लागल्यामुळेच गोविंदप्रभूचा अवतार वेड्यापिशाचा झाला ही गोष्ट प्रस्तुत चरित्राच्या अभ्यासकांनी लक्षात ठेवावी.

---

# श्री गोविंदप्रभु-चरित्र

श्री परेसाये नमः ॥ **रीधपुर प्रांतीं अवतारु स्वीकारु** : ॥ रीधपुर प्रांतीं दीढा गाउवा कांटसरें : एकी वासना : कांटोपरें : एकी वासनाः माउरें: काणवां ब्राह्मणांचां घरीं गर्भी अवतारु स्वीकरीला : अनंतनायक्रु पीता : नेमाइसें माताः गोसावियांचीये मातेसि बहुतें लेंकरुवें जालीं : तीयें जीतींचि नां तेणें दुखें थोर आरंबळली : मग गोसावी नीपटनेयांचे जाले : गुंडो ऐसें नांव ठेविलें : बरीषा दीसा माता पीता अपरोक्ष जालीं : मग मामेनि माउसीयां वाढविलें : सातां वरिखां मुंजिबंधन जालें : सीका-सुत्र कासोटी दीधली : पळसुला : ऐसे च्यान्ही दीस जाले : चौथां दीसीं उपाधीं म्हणीतलें : "गुंडो ! वों भवति भीक्षां देही : यणें शब्दें भीक्षा माग : " म्हणति ' भीक्षां देही ' ऐसें म्हणति : परि वोंकारु न म्हणति : ऐसे मुंजीव्रत जालें : मग रीधपुरासि घेउनि आलीं : ॥ १ ॥

**रीधपुरी अवस्थान** : ॥ बोपो उपाध्ये : तयांचे रांमो उपाध्ये : तयांचे तीकोपाध्ये : गोसावियांतें बोपद उपाध्यांपासि पढों घातलें : वेदधन ( वेदाध्ययन ) करुं लागले : गोसावी अचाट सामग्री स्वीकरीली : गोसाबियांसि दीसें ये तें आणीका मासें नैये: गोसावियांसि मासें ये तें आणीका वरीखा नैये : चुकि भुलि ते चाट्यांहीं सांघति आणि उपाधीयांहीं सांघति : ते म्हणेति "गुंडो सामान्य नव्हे : हा इस्वर अवतारु होइल : हा पढतां नायकों : नीगदीतां नायकों : यकसरी कांडीचि म्हणतां आइकतों :" एकी वासना : " म्हणतां नायकों : वाचीतां नाएकों : एकसरें नीगदीतांचि आइकतों : हा गुंडो सामान्य नव्हे : हा इस्वर अवतारु होइल : कां देवता अवतारु होइल : " ऐसें बोप-उपाधे म्हणत्ति : आणि गोसावी हास्य करीति : आणि हळूचि म्हणति : " मेला जाय हो होए म्हणे : " चाटयांतें म्हणति : य त र प स्यें : ॥ २ ॥

**सामर्थ्य प्रकासणें** : ॥ आवघे चाटें : उपाधीयांचीया वांसरुवांलागि गवत आंणुं जाति : ते याकि येकि दो दो पेंडीया घेति : आवघे डोइय ठेवुनि घेउनि यति : गोसावियांची पेंडी ते अंत्राक्ष ( अंतरिक्ष ) ए : तें चाटां देखीलें : येउनि

उपाध्यांपुढें सांघीतलें : उपाधीं म्हणीतलें : " हा गुंडो सामान्य नव्हे : हा इस्वर अवतारु होइलः का देवता अवतारु होइल : " मग आपुली ब्राह्मणीतें म्हणीतलें : " या गुंडोसि नीर्सीण म्हणीये नेदावें हो ! " एकी वासना : उपाधी गोसावियांचे दोन्ही स्रीचरण धरिले : " जी जी : मी पापीया नेणें : तरि मज सांघावे जी : " आणि गोसावी हास्य स्वीकरिलें : परि सांघती ना : ॥ ३ ॥

**प्रकास दरीसन** : ॥ एकु दी गोसावी चाटया आंतु पहुडु केला होता : तवं स्रीमुर्तिपासौनि प्रकासु पडीला : तो चाटा देखीला : आणि भ्याले : एउनि उपाध्यांपुढें सांघीतलें : " उपाधीये हो ! गुंडोचा माथा-होउनि प्रकासु नीगतु असे : आपें आपु बोलतु असे : ' तुं का आलीसि वो : तुं का गेलीसि वो ' ऐसे : म्हणतु असे : " उपाधीं म्हणीतलें : " नेणीजे हा गुंडो कोंणु : हा इस्वर अवतारु होये : " ॥ ४ ॥

**लेकरुवांसवें आरोगणें** : ॥ लेंकरुवें जेवीतें असति : तवं गोसावी बीजें करीति : तयांसवें गोसावी आरोगण करीति : आणि लेंकरुवें बोबाति : तयांची माए म्हणे : " का बोवाते असा ? जेउं दया : " मग ते वांटे करी : " राउळो ! हा तुम्ही जेवा : हे लेंकरुवें जेवीति : " ते म्हणाति : " आइ ! राउळ आपुला वांटा नेजवीति : आंमुंचाचि जेवीताति : " ते म्हणे " राउळो ! आपला भागु सांडौनि लेंकरुवांचा भागु का जेवीतु असा ?" मागुता लेंकरुवां-चाचि भागु जेवीति : मग ते म्हणे " राउळांसि जेउं देया : मग तुम्हासि आंणीक वाढीन : " तीयें डोइयेवरि थाळा ठेवीति : मग उभे ठाकौनि आरोगण करीति : ऐसी तयांचेया वांटयांची आरोगणा करीति : आपुलेया वांटयाचा प्रसादु करीति : तया वांटयाआंतु आंणीक वाढीति : मग तीयें जेवीति : ॥ ५ ॥

**साधीं प्रसादु घेणें** : ॥ एकु दी गोसावी कुणबीयांचीय घरीं आरोगणा करीत होते : तवं पैलाकडुनि साधें आलीं : तीहीं दंडवत केलें : आणि प्रसादु घेतला : तीया बाइला म्हणीतलें : " काइ वो जालें या ब्राह्मणांचीया रांडांसि ? आम्हुचें कुणबीयांचें अन्न खाति असे : " साधीं म्हणीतलें " काइ आलीए : सवीया कैसीया देत अससी ? मीया तरि राउळांचा प्रसादु घेतला : " " मां

काइ जालें ? राउळांचा प्रसादु : परि अन्न आंमुचें ! " आणि गोसावीं हास्य केलें : मग आणीकु प्रसादु दीधला : ॥ ६ ॥

**पाखाला बाळक पांगुरवणें** : ॥ बाइल येकि पाणीयेसि नीगाली : तीचांये घरीं वडील धाकुटें कोण्हीं माणुंस नांहीं : तवं गोसावीं बीजें केलें : तीया म्हणीतलें : "राउळो ! नावेक लेंकरु घेया हो : हेलभरि पाणीयां आंणींन" मग गोसावीं घेतलें : नावेक खेळवीलें : मग खुंटीची पाखाल काढीली : येका आंखेयावरि नीजवीलें : एक आंखें पांगुरवीलें : आणि गोसावीं बीजें केलें : तवं ते आली : घागरि ठेवीली : घरांआंतु गेली : पाळणां पाहीलें तवं नेदखेचि : बाजेवरि पाहीलें : तवं तेथही नांहीं : मग सेजां साइलीयांतें पुसीलें : " हां वो ! राउळीं लेंकरुं तुम्हापासि दीधलें ? " " नां नांहीं दीधलें : " मग सेजां साइलीं म्हणींतलें : " हां वो ! राउळां हातीं लेंकरुं कैसें दीधलें ? राउळ वेडे : राउळ पींसे : एकाधीये अडीं घालीति : एकाधीए वीहीरी घालीति तेहवळि काइ करीसि ? " ऐसी धांवत घरांआंतु गेली : तवं पाखालेचें आंखें हालीनलें : पाहे तवं लेंकरु देखीलें : मग चळनवळण न करीं : आंणि तैसीचि बोंबाइली " काइ करीन वो आइ ! काइ करीन वो आइ ! " म्हणोनि उचलुनि पाहीलें : तवं आनंदभरीत नीजैलें असे : मग तीया म्हणीतलें : " आ वो ! आ वो ! राउळीं लेंकरुवासि जतन केली असे : राउळ माए : राउळ बापु: " मग सुखींन जालीः ॥ ७ ॥

**मृत्य बाळक जीववणें** : ॥ एकाचें लेंकरु गोसावी खेळवीति : तें सरलें : तें नेउनि वाजेस्तरा इसान्य कोंणीं पांनदीं पुरीलें : तवं गोसावीं तयाचेया घरासि बीजें केलें : तवं गोसावीयातें देखिलें : आंणि रडों लागलीं : मग तीहीं म्हणींतलें : " राउळो ! जीया लेंकरुवातें तुम्हीं खेळवा : तें आजि सरलें : " म्हणौनि अवघीं रडों लागलीं : आंणि राउळांसि अनुकुंपा उपनली : मग गोसावी म्हणीतलें : " आवो मेला जाये : आंणि आंणी नां म्हणे : " तेहीं म्हणीतलें : " आतां काइ आंणींन राउळो ? " " आवो मेली जाये : आंणि आंणी आंणी नां म्हणे : " तीहीं म्हणीतलें : " आतां काइ आंणीन राउळो? " " आवो मेली जाये : आंणावें म्हणे : नांणावें म्हणे : आवो आंणावेंचि म्हणे :" म्हणौनि दुडुदुडु-करि धांवं घेतली : तेथ बीजें केलें : दगड फेडीले : उकरीलें : मग काढीलें : झाडीलें : पुसीलें :

आनंदभरीत वास पाहों लागलें : मग उपंगळीए घेउनि आले : तेहीं देखीलें : आणि कवाड घातलें : " नेया नेया राउळो ! सव परते नेया: " तवं तयाचा सेजारीं म्हातारी एकि होती : तीचीए उपंगळीये नेउनि घातलें : तीया म्हणीतलें : " राउळो ! मीं काइ करीन : मीं सतानीक बाइल " : मग गोसावी तीची चुची तयाचा तोंडीं घातली : आणि ऋहाटीत पान्हावो आला : तें चुटचुटा पेवों लागलें : तवं तीहीं कवाड उघडीलें : पाहाति तवं तैसें देखीलें : तवं गोसावी बीजें केलें : तीयें मागों लागलीं : म्हातारीया म्हणीतलें : " तुम्हासि देत होते तेह्वळि का नेघाचि ? मा आता मीं का देइन ? " तैसींचि महाजनापासि न्यावो सांघात्रेया नीगालीं : महाजनीं म्हणीतलें : " राउळीं इसि दीधलें : तें लेंकरु इचेची : तुम्हा लोभ करुं लाभे परि लेंकरु न लभे : आता तुं ऐसें करि : याचा सेजारीं अस : " मग तयाचा सेजारीं असों लागली : मग तेहीं बाज सुपवती दीधली : एकि गाए दीधली : मग तो सतानीकु जाला : गोपि प्रवीणू जाला : तया नांवं दामोधरु : जवं जीयाला : तवं तयासि जरु तावो नाहीं : आपुलीए अनुभवींचीया केलि लीळा : भक्तिजनापुढें सांघे : ॥ ८ ॥

**कापुसु पाहाळीं बाळक नीजविणें ॥** बाइला एकी म्हणीतलें : राउळो ! नावेक लेंकरु घेया का ? मग मीं घागरि भरुनि पाणीयां घेउनि येइन " बाळक गोसावियाचीए उपंगळीए घातलें : गोसावीं नावेक लेंकरु खेळवीलें : पांटीए कापुसाचें पाहाळ होतें : तेथ लेंकरु नीजवीलें : आणि वरि पाहाळ मीळौनि गेलें : मग गोसावीं बीजें केलें : तवं ते आली : घागरि ठेवीली : घरा आंतु गेली : लेंकरु पाहों लागली : पाळणा पाहीलें : बाजेवरि पाहीलें : कोणटा सांदी पाहीलें : तवं नेदखेचि : मग सेजीया साइली-यातें पुसीलें : " आवो ! राउळीं लेंकरु तुमचा हातीं दीधलें ? " तेहीं म्हणीतलें ना नाहीं : आवो ! राउळ वेडे : राउळ पीसें : एकाधीए अडां का वीहीरी घालिती : का एकाधीए पेवीं घालीति : तेह्वाळि काइ करीसी ? " ऐसें जवं पाहे तवं पाहाळ हालिनलें : पांटीए लेंकरु आनंदभरीत नीजैलें असे : " पहा वो ! राउळ माय : राउळ बापु : राउळीं लेंकरुवासि जतन कैसी केली " म्हणौनि सुखीन जाली : ॥ ९ ॥

**लेकरुवांसवें तापणें : ॥** गोसावी ताप करीति : अवघीं लेंकरुवें

आपुलाली भोइ आंणीति : मग एकें वेळें अवघे घालीति : ते म्हणति : "राउळो ! थोडीं घाला" म्हणौनि मागुतीं जाति : भोइ घेउनि येति : माघौती गोसावी एकें वेळें अवघीं घालीति : तो थोरु जाळु होए : आंणि हास्य स्वीकरीति : मागुतें तीयें म्हणति : "राउळो ! राउळो ! थोडीं थोडीं घाला" म्हणति : मागुती आंणा म्हणाति : गोसावी मागुतें तैसेंचि करीति : सेवटीं वीखरौनि बीजें करीति : ॥ १० ॥

**अनेत्र ( अन्यत्र ) माळीणीसीं क्रीडा :** ॥ सेजा गावीचीया माळीणी : वांगीं : गाजरें : भाजी : फुलें : मरुवा : दवना : ऐसें घेउनि यति : तीया साळे उतरे पौळीसीं बैसाति : वीकरा करीति : तेथ गोसावी बीजें करीति : तयांसीं खेळु करीति : श्रीकरीं कुरुकुली घेउनि केजीं घेति : भाजी घालीति : गाजरें घालीति : "आवो हें थोडी : हे बहु म्हणे:" थोडी तेथ आंणीक घालीति : बहु तेथ फेडिति : बाइला म्हणाति "राउळो ! घातली आतां फेडीता कां ?" आंणि गोसावी हास्य स्वीकरीति : ॥ ११ ॥

**वीनाएकामागें लपणें:** ॥ लेंकरुवें लपंडाही खेळतें असेति : तवं गोसावी बीजें करीति : लेंकरुवा सांघातें खेळति : लपेति : गोसावी वीनाएकामागें लपेति : लेंकरुवें पाहाति भवंतीं भवंतीं : परि नेदखेति : आंणि "गुंडो" म्हणौनि बोबाति : आंणि तेथाचि "वो" म्हणति : परि देखेति ना : आंणि मागुतीं "गुंडो !" म्हणौनि बोबाति : आणि तेथाचि "वो" म्हणौनि उठति : आणि आवघीयां लेंकरुवा वीस्मो होए : मागुतीं खेळेति : आणि मागुतें गोसावी तैसेंचि करीति : ऐसा खेळु खेळेति : मग गोसावी बीजें करीति : ॥ १२ ॥

**चींचोरां खेळु :** ॥ लेंकरुवें चींचोरां खेळतें होतीं : वीनाएकाचेया ओटेयावरि : तवं गोसावी बीजें करीति : खेळु स्वीकरीति : चींचोरयांसि धांमे पाडीति : डावो घालीति : तो गोसावीयांचाचि डाओ पडे : ऐसे आवघे चींचोरे जींतले : लेंकरुवें म्हणति "राउळांचीयाचि धांमींयां पडताति : आमचीया न पडेति :" तीयें म्हणति : "चाला रे ! आंणीक चींचोरे आंणू : मग आंणीक धांमे करूं :" म्हणौनि आंणीक चींचोरे आंणीति : धांमे करीति : मागुतें खेळेति : तवं गोसावियांचीयाची धांमींयां पडति : ऐसे अवघे चींचोरे जींतले :

मग बीजें करीता : " होजेरे होजेरे " म्हणौनि वीखुरीले : आणि लेंकरुवांचीया झोंबीया पडलीया : आणि गोसावी हास्य स्वीकरीति : मग बीजें करीति : ॥१३॥

**श्रीकरु भवंडणें :** ॥ महदाइसीं म्हणीतलें : " जी जी ! गोसावी धाकुटेंपणीं श्रीकरु भवंडीति तो मज दाखवावा जी ! " राजमठा आंतु न्हांणी-पासि गरगरां श्रीकरु भवंडु लागले : खांच पडली : मग गोसावीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : खोडीया सांघीतलें म्हणे " म्हणौनि भुमि हाणितली आणि हास्य स्वीकरीलें : गांवींचेनि लोकें गोसावियांपुढें सांघीतलें : आबैसीं महदाइसा पुढें सांघीतलें : ॥ १४ ॥

**उडीवां अवस्थान :** ॥ गोसावियासि तीकोपाध्यांचीय उडीवां बारा वरिखेंपर्यंत अवस्थान : एकु दीसीं गोसावी उडवेया आंतु पहुडु स्वीकरीला होता : तवं मध्यान एकि रात्री श्रीमुर्तीहुनि प्रकासु गगनपर्यंत वाढीनला होता : तो तीकोपाध्यांचिया ब्राह्मणीं देखीला : तीया तीकोपाध्यांपुढें सांघीतलें : " उठा उठा : वेडे पीसे यथ यक आंणुनी घातले असेति : तीहीं आगि लाविली : " उपाध्ये धांवत बाहीरि आले : तवं गोसावियांचीए श्रीमुगुटींहुनि प्रकासु देखीला : आणि दंडवत घातलें : जवळि गेले : श्रीचरणांवरी डोइ ठेवीली : मग वीनवीलें : " जी जी ! ओटेयावरि पहुडु स्वीकरावा जी ! " गोसावीं ओटेयावरि बीजें केलें : मग मुठु आंथुरावया दीधला : मग गोसावी पहुडु स्वीकरीला : उपाधीए घरा आंतु गेले : ॥ १५ ॥

**राजणीं सातरा घालणें :** ॥ उपाधीयांचीया दोघी लेंकी : गावीत्री : सावीत्री : गावीत्री ते वीटाळुसी जाली : ते गोसावियांचीया ओटेयावरि बैसोनि जेवीति असे : तवं माया म्हणीतलें : " आवो ! राउळाचीया वोटेयावरि जेउं नको : बैसों नको : " तीया म्हणीतलें : " हें काइ ओ जालें : ' नीघरां जालें घर : घरीचीयां गोसावियां जाली वोसरी ' : तवं गोसावीं बीजें केलें " आवो उठि उठि : आवो मेली जाय : जाये नां म्हणे : " ते न वचोचे : आणि गोसावी पसाभरि धुळि सातरां घातली : आणि थापा हाणितली : सातरा घेउनि राजणीं घातला : तवं उपाध्ये आले : तयापुढें सांघीतलें : गावीत्री राउळां-चेया ओटेयावरि जेउं बैसली : मीयां म्हणीतलें : " आवो उठि उठि " :

तवं हे नुठीचि : तवं राउळ आले : तीहीं पसाभरि धुळि सातरा घातली : तीतें थापा हाणितलें : सातरा घेउनि राजणीं घातला : राजणासि वीटाळु केला : " उपाधीं म्हणीतलें : " थोरा मांडेयासि काइ वीटाळु असे ? पांणीं उपसा कुहीटि जाळा : " तो पाणिये भरला होता : तवं उपाधीं रात्रीं मुंजीया एकु स्नान करीता देखिला : उपाधीं म्हणीतलें " हें ऐसें काइ ? " " ना राउळें रांजणीं सातरा घातला : तें हें माहातीर्थ थोर जालें : म्हणौनि यथ टाकुनि आलों : " मग उपाधीं तेणेंचि पाणिये राहाटि करवीली : ऐसा गोसांवीं तयांचा वीकल्पु नासिला : ते थोर कणवेचे : ॥ १६ ॥

**काढाकाढि करणें** : ॥ एकु दीसी गोसांवी काढाकाढि करूं लागले : तेहीं म्हणीतलें " राउळ ! आजि काइ सुचीक देखत असेति तें नेणिजे : " पाटु दोंदसीं धरिला : तो बाहीरि ठेवीला : मांचळी दोंदेसीं धरीली : ते बाहीरि आणीली : चौरंगु आणिला : तोहीं बाहीरि ठेवीती : ताट थाळा तांबीया घेउनि बाहीरि आणिले : तवं आगि लागली : तो अवघा गाओं जळीनला : गोसांवीं काढिलें तें वांचलें : ॥ १७ ॥

**घोडेयावरि आरोहण** : ॥ एकु दी गोसांवीं घोडेयावरि आरोहण केलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : चाल चाले ना म्हणे : " म्हणौनि सींपुटीया हाणाति : तवं माहाजनीं म्हणीतलें : " तुम्ही न चलवा तें न चलें : तुमचेनि न चले ऐसें काइ असे ? आणि गोसांवीं हास्य स्वीकरीलें : आणि घोडेयावरुनि उतरले : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ १८ ॥

**घाटेयां हरिभटां वीस्मुर्ति** : ॥ एकु दी गोसांवी घोडेयावरि आरोहण केलें होतें : तवं घाटे हरीभट आले : दांवें नेसलें : दोरु पांगुरलें : हातीं खापरी : खापरा आंतु राखौंडी : ऐसे आले : गोसांवियांसि धुपु दाखौं लागले : मग गोसांवीं म्हणीतलें " आवो मेला जाए : जाए जाए ना म्हणे : मेला जाए जाए सींगणांपुरासि जाए ना म्हणे : " तैसेचि ते सींगणापुरा गेले : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ १९ ॥

**केसव-नायकाचीए पव्हेचें उदकपान** : ॥ एकु दी गोसांवीं केसव-नायकाचीए पव्हेसि बीजें केलें : तेथ एक आंडोरें राखत ठेबिलें होतें : तें

श्रीनेत्रीं व्हार्टाले : आणि थाप उगारीली आणि तें भ्यालें : तें परतें गेलें : गोसांवीं पव्हेचें धारुकें फेडीलें : श्रीमुखीं घातलें : उदक स्वीकरुं लागले " आवो पुरे पुरे म्हणे : " म्हणौनि श्रीकरें वारीति : तें आंडोर म्हणे : " हो हो आतां पुरे होइल : " म्हणौनि तेथेनि हांसे : ऐसें दोन्हीं राजणीचें पांणीं सांडीलें : मग दोहीं राजणांमध्यें आसन केलें : एकु श्रीचरणु एका राजणा आंतु घातला : दुसरा श्रीचरणु दुसरां राजणीं घातला : ऐसा नावेकु क्षेळु केला : मग गोसावीं बीजें केलें : ॥ २० ॥

**खडखांबुलां क्षेळुः** ॥ गोसावी सामान्येस्वरासि बीजें केलें : तेथ लेंकरुवें खेळतें होतीं : गोसावी खेळु स्वीकरीला : लेंकरुवें म्हणाति : " राउळो ! हा खांबु नको सीवों : " तवं गोसावी तोचि खांबु सीवीति : ऐसा आवघेयां खांबांसि संबंधु दीधला : एकु वाव्य कोणीचा वांचौनि : गोसावियांसि तेथ आसन जालें : आंडोरीं कवीठें आणिलीं : तीयें फोडिलीं : गोसांवीं प्रसादु केला : मग बीजें केलें : ॥ २१ ॥

**संन्यासी वीपलाणें** : ॥ भद्रांपासि गोसावी खेळु करीत होते : तवं संन्यासी पुढि करितां देखीला : मग गोसांवीं म्हणीतलें : " पांकु–पांणि : दाळिः तैल्यपात्र : तक्रपात्र : घृतोदन : सलोणी : ऐल घर पैल घर : सरो भरोः " ऐसे गोसांवीं वीपलाइलें : तो जाओं लागला : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ २२ ॥

**मातांग–पव्हेचें उदकपानः** ॥ गोसांवीं मातांग–पव्हेसि बीजें केलें : तेथ एक आंडोरु बैसलें होतें : तेथ सोंगटें दोनि ठेविलीं होतीं : तें एक सोंगट गोसांवीं श्रीकरीं घेतलें : आणि आंडोरांपाठीं लागले : तें पळालें : करा श्रीकरीं घेतला : मग उदकपान केलें : रांजणीचें अवघें पांणीं सांडीलें : रांजणाचीए बुढीं उरलें पांणीं तेया आंतु गोसावी श्रीकर श्रीमुख प्रक्षाळीलें : श्रीचरण प्रक्षाळीले : रांजणा आंतुचि : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ २३ ॥

**उपडौनि द्राक्ष लावणें** : ॥ गोसांवीं अळजपुरासि बीजें केलें एका ब्राह्मणाचीए घरीं द्राक्ष होती : ते गोसांवीं उपडीली : तेहीं म्हणीतलें " हा राउळो ! फळतें फुलतें झाड कां उपडीलें ? " तें गोसांवीं तीसरां दीसीं आणिलें : मग काडिया ( काठिया ) करुनि उकरीलें : मोळीया रोवीलीया : तीनि चुळ रांजणीचें पांणा

घातलें : तीहीं म्हणीतलें : " राउळो ! हें सुकलें वाळलें : आतां हें काइ लागैल !" मग गोसांवीं बीजें केलें : तवं ते तीसरां दीसीं फळीं फुलीं घडीं मोडत आलीं : आणि तयांसि आश्चर्य जालें : मग म्हणीतलें : " राउळ माए : राउळ बापु : राउळ इस्वरु : राउळ करीति ते काइ नव्हे ! " ऐसी स्तुति करूं लागली : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ २४ ॥

**बैलौर-मार्गी गौळणींसीं क्षेळु :** ॥ वडा-बुढि आवघीया गौळणी मीळेति : तवं गोसांवीं तेथ बीजें करीति : तयांचीं दहींयें दुधें : तुपें लोणियें : ताकें : ऐसें आवघें चाखेति : जिया चाखों देति तियांचें जातुखेओ वीके : जया चाखों नेदीति तीया आवघीया गांवांतु हींडेति परि वीके ना : एरी म्हणति " हां वो ! राउळांसि चाखो नेदीसीचि म्हणौनि न वीकेचि : आतां राउळांपासि नेया पां : आणि वीकैल : " मग तीया गोसावियांपासि येति : चाखवीति : मग वीके मग गोसांवी म्हणेति : " आवो मेली जाये : हें गोड आहे म्हणे : " ऐसें म्हणेति आणि हास्य स्वीकरीति : ऐसा क्षेळु करीति : ॥ २५ ॥

**खेड-मार्गी गौळणींसी खेळु :** ॥ गौळणीं गौळीणींते पुसेति " आजि कां वो ! उशीरु लागला ? " " ना राउळ आंमंसी क्षेळु करीत होते : दहींयें दुधें तुपें लोणियें : लौकरि चाखेति ना : धुमाळि करीति : म्हणौनि उशीरु लागला : " गांवींचिया म्हणेति " राउळ आंमंसीं क्षेळत होते : " एकी म्हणेति " राउळ आंमंसीं खेळत होते : " ऐसें आवघीयां गौळणींसीं संवादु होए : जेया चाखों नेदीति तयांचें तैसेंचि राहे : हालवें पाणीं ऐसें होए : डुळडुळित दसीया होति : ऐसा आवघा गाउं हींडेति परि वीके ना : एरी म्हणेति " आवो ! राउळां चाखों देतीसी तरि तुझें वीकतें : आतां तऱ्हीं राउळासि चाखों देया मग वीकैल : " मग ते राउळांपासि घेउनि जाए : राउळ चाखेति : " आवो मेली जाए : गोड आहे म्हणे : आतां जाए म्हणे : " आणि ते नीगे : तें आगळेन मोलें वीके : मग ते जाये : ॥ २६ ॥

**केसवीं बटुरुवां श्रीप्रभु बाहीरि क्रीडा :** ॥ वीद्यार्थी गावांतु गेले होते : तवं लेंकरुवें केसवाचां देउळीं खेळतें होतीं : तवं गोसावीं देवळांतु बीजें केलें : आणि लेंकरुवीं लवकरि कवाड घातलें : बोबावों लागलीं : "आम्ही राउळांसि

भीतरि कोंडीलें : '' म्हणौनि बोबातें असेति : तवं वीद्यार्थी आले : तेणें पुसिलें "कां रे ! बोबातें असा (अहा) ?" "नां आम्हीं राउळातें भीतरि कोंडीलें :" तेणें म्हणीतलें " नां : मीं हाटवटीए होउनि आलां : तवं तेथ राउळ खेळु खेळत असति :" कवाड उघडुनी पाहाति : तवं भीतरि नांहींत : मग गाभारीं पाहीलें : तवं तेथही नांहींत : आणि तयांसि आश्चर्य वीस्मो जाला : आणि उगीचि राहीलीं :॥२७॥

**तेळीणीं-हाटीं खेळु** : ॥ रीधपुर तो पेठेंचा गांउं : तेळीणीं तेल वीकीत असति : तीया आराति नां : तयांचीं तान्हीं लेंकरुवें घरीं पाळणां असेति : एकीचीं जवळि असति : तीयें मेंकति : राउळ तेथ तयांसीं खेळू करीत असेति : तीया म्हणति " राउळो ! घरीं होउंनि आंमुचें लेंकरुं आणुनि देया कां ? मग मीं डो-भरि तेला तुमचीए माथां घालींन :" तवं एरि म्हणे " राउळो ! आंमुचें लेंकरुं पाळणां घालौनि या कां ? मग मीं तुमचीए माथां डो-भरि तेला घालींन :" ऐसें ऐकीचें नेउनि पाळणां घालीति : ऐकीचें आंणुनि देति : तीया डो-भरि तेल श्रीमुगुटावरि घालीति : तें वरीचावरि नेणों काइ होय : आंणि तयांसि वीस्मो होए : अपरोक्ष-ज्ञानीये वीसेख-ज्ञानीए ते वरीचावरि घेति : ऐसा तेयां आवघयां संबंधु देति : मग बीजें करीति : ॥ २८ ॥

**लांकांची भाकरि म्हणणें** : ॥ तेळीणीचें लेंकरुं लांकांची भाकरि खात होतें : तवं तेथ गोसांवीं बीजें केलें : तयाचीए हातींची भाकरि हीरतीली : ते गोसांवी खावों लागलें : तेळीणीं म्हणीतलें : " राउळो ! राउळो ! हे भाकरि तेलीयांची :" गोसांवीं म्हणीतलें " आवो ! मेली जाए : तेलीयाची नव्हे म्हणे : हे लांकांची भाकरि : " म्हणुनि श्रीमुखीं घांसु घेउनि मग बीजें केलें : ॥ २९ ॥

**श्राद्धाघरीं आरोगणें** : ॥ म्हातारी यकीचें धाकुटें ऐसें घर : आंत ब्राह्मण बैसले असेति : बाहीरि गोसांवी बैसले असेति : गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! सोंनयांचा भातु आंणि आंणि आंणि नां म्हणे : " " आंणीत असें राउळो ! आंणीत असें : " तवं ब्राह्मणीं कल्पीलें मग गोसावियांसि वाढिलें : राळेयांचा भातु वाढिला : तीया म्हणीतलें " राउळो ! मीं दुबळी : माते तांदुळ नांहीं : " " आवो ! मेली जाय : सोंनयांचा भातु म्हणे : " ऐसी यथोचीत आरोगणा केली : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ३० ॥

**देवता हातिवांसीं एणें** : ॥ एकादसीचां दीसीं साळेसि जागरण होत असे : मध्याने एकी रात्री गोसांवी देवाळेया कडौनि बीजें करीत होते : दोहीं-कडे देवता हातिवयांसीं श्रीमुर्तिचा प्रकासु पडे : घोडया जवळि उतरे उभे राहीले : तवं ब्राह्मणु एकु बाहीरि नीगाला : तवं तेणें देखिलें : आणि भीतरि गेला : आणि बोबाइला : " आगा ! आगा ! तुमचें काइसें जागरण : राउळांसि होत असे तें पाहावया या नां " ते आवघे पाहावया आले : तयामध्यें एकु नैयचि : मग अवघांचि तेथोनि दंडवत घातलें : आश्चर्य थोर जालें : मग गोसांवीं साळे-उतरे बीदी तया उतरे बीदी टेंकाळीया बीजें केलें : ॥ ३१ ॥

**हाटवटीये प्रकास दर्सन** : ॥ साळे-पुर्वे हाटवटीयेसि तीन्हाळे राहीले होते : तयांवरि गोसांवीं पहुडु स्वीकरीला होता : तवं श्रीमुर्तिपासौनि प्रकासु गगनपर्यंत वाढिनला : तो आवघीया गांवांवरि उजीएडु पडीला : आगि लागली म्हणौनि तराळ धांवीनलें : तवं आगि नेदखेति : पाहति : तवं राउळीं पहुडु स्वीकरीला असे : एरु एरातें म्हणे " आरे ! राउळीं पहुडु स्वीकरीला असे : " म्हणौनि दंडवत घातलें : तवं प्रकास उतरत उतरत श्रीमुर्तिमाजि सामावला : तया आवघेयां वीस्मो जाला : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ३२ ॥

**हटकेस्वरीं कंटक नीवृति** : ॥ एकु दी गोसावियां श्रीचरणीं कांटा मोडला होता : तेणें करुनि गोसांवी कुंटीत कुंटीत चालेति : फेडु नेदीति : माहाजनीं लेंकरुवातें म्हणीतलें " आरे ! राउळातें राखत असा हो : नीजैले असेति तैसेचि धरावे : " तैसेंचि गोसांवीं हटकेस्वरासि बीजें केलें : पहुडु स्वीकरीला असे : तवं चाटां देखिलें : आंणि तैसेचि दडपीलें : वारिकु बोलावीला : कांटा फेडीला : मग कुंटु राहिले : बरवे चालेति : ॥ ३३ ॥

**टेंकाळीं खालाळी अनुवादु** : ॥ गोसावियांसि वीचार-चीरेयावरि आसन होए : आंणि अन(वा)दु करीति : " आवो ! टेंकाळीए जावें : खालाळीए जावें : प्रजनां आळीए जावेचि म्हणे : " म्हणौनि दुडु-दुडु-करि धांव घेति : बीजें करीति : ॥ ३४ ॥

**श्रावणीए वस्त्र-पुजा स्वीकारु** : ॥ वरीखा दीसा केसव-नायकु

गोसावियासि पर्वणि करीति : पुणिवेचां दीसीं केसव–नाएकु आंडोरासि नीरोपु देति: " आरे ! आजि राउळातें घेउनि या हो : " " नां : हो कां : " तीएं गोसावियापासि एति : " राउळो ! आजि पर्वणि केसव–नाएकु करीत असति " म्हणौनि श्रीकरीं धरीलें : " चाल्य ब्राह्मण बैसले असेति : कुंड केलें असे : मांडव घातला असे : होम करीत असेति : " वेर्ळे लावुनि घेउनि आले : तवं केसव–नाएकु सौमे आले : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग आसन रचीलें : गोसांवी आसनीं बैसले : श्रीचरण प्रक्षाळीले : मग जाणिवेयांचा जोडा वोळगवीला टीळा लावीला : गंधा अक्षता लावीलीया : ओलि साउला वाइला : एर वस्त्र लवकरि काढिलें : केसव–नाएकें आंडोरातें म्हणीतलें : " आरे ! हें वस्त्र दगडवरि कुटकरुनि रोवा : " मग तीहीं कुटकरुनि रोवीलें ; मग गोसांवीं बीजें केलें : ॥३५॥

**सुतके स्नान** : ॥ गोसांवी सुतकेसि बीजें करीति : अर्ध वस्त्र नेसेति : अर्ध धुति : तें वाळवीति : मग स्नान करीति : मग धुतलें वस्त्र नेसेति : मग एरि धुति : तें वाळत घालीति : मग संध्या करीति : टीळा लावीति : मग बीजें करीति : ॥ ३६ ॥

**जेऊं मागणें** :॥ धेंढे (धेंडे) याचेया घरा–पसीमे ब्राह्मणाचें घर : तेथ गोसांवीं बीजें केलें : आणि स्त्रीयेचा पालउ धरीला : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो ! मेली जाए: जेऊं घालि : जेउ घालि ना म्हणे : आवो ! जेऊं घालि वो ! " तीया म्हणीतलें : " राउळो ! मज म्हणीयें करुं देया : मग मीं जेऊं घालीन :" ते रांजणापासि जाए : तीये सरीसे गोसांवी पालौ धरूनि बीजें करीति : घरा आंतु मागुतें बीजें करीति : आणि मागुतें म्हणति " जेऊं घालि वो ! : " तवं ते म्हणे " पारूखा : राउळो ! हे म्हणीयें करीन : मग वाढीन : " मागुती दारासि गेली : गोसांवीं पालौ धरुनि बीजें केलें : ते सर्पण घेउनि आली : सरीसें गोसांवीं पालौउ धरुनि बीजें केलें : " आतां जेउं घालि ओ " : तीया म्हणीतलें " राउळो ! झाडुं देया : मग वाढीन " : पालौ धरीलाचि असे : तीया घरा आंतु झाडीलें : मग थाळेयासि राख लावीली : बरवा चोखटु धुतला : वोडवणें ठेविलें : ठावो मांडीला : बैसों घातलें : " राउळो ! आतां पालउ सोडा : बैसा : मग वाढीन " : गोसांवीं पालौउ सोडीला : आसनीं बैसले :

तीया वाढिलें : एथोचीत आरोगणा केली : मग गोसावीं म्हणीतलें : " मेली जाए : आतां होये म्हणे : " मग तांबोळ दीधलें : मग गोसावीं बीजें केलें : ॥ ३७ ॥

**सुनां दुध वाढणें :** ॥ वीठलु जोइसी : तयातें दोघी सुनां : तयातें गाइ दुभेति . दुध अपार नांगे : तयाचें घर एमाइसांचेया घरा सेजेंचि : तया नांवं एल्हाइसें : सासु ते दुधेंसीं जेवी : आंणि सुनांसि ताक वाढी : आंणि तीया मनोर्थ करीति : तवं गोसावीं बीजें करीति : तीया रात्री जेउं बैसलीया : आळंदां दुध नीववीते असेति : तें दुध सुनांसि गाडुगेवरि वाढीति : तीया वरि पडौनि म्हणेति " राउळो ! राउळो ! सवळे ताकवणीं होआवें असें : " ऐसे मावेचे लटकें म्हणेति : भीतरि सुख होए : गोसावी म्हणति " मेली जाए : बोबाए नां : " म्हणौनि कोपु नटले : आंणि तीया उगीयाचि घेति : सासुत्रेसि ताक वाढीति : आंणि बीजें करीति : तवं सवुळेचे गुसळीति तवं ताक होए : आंणि लोणीं जेतुकें तेतुकेंचि होयें : ॥ ३८ ॥

**वींसांन घालणें :** ॥ एकु दी एकली एकटीक (एकट ते) लेंकरुवातें न्हाणुं बैसली : ते मनोर्थ करी : " राउळ येते कां तरि वींसांन घालींते " : तवं गोसांवी बीजें करीति : ते श्रीकरीं तांबीया घेति : रांजणींचें पांणीं वींसांन घालीति : मग म्हणे : " पुरे पुरे राउळो ! " मग ते लेंकरूं न्हांणीं : पाळणां घाली : नीजवी : मग गोसांवी बीजें करीति : ॥ ३९ ॥

**सकळ-ग्रहीं व्यापारु करणें :** ॥ एकाचेया घरासि गोसांवी बीजें करीति : तव एकी स्रीया म्हणीतलें : " राउळो ! पैलु पाटु आंणुनि देया कां ! " तयाचा पाटु आंणौनि देति : एकांचा तांबीया भरुनि देति : एकांचें मडकें धों लागेति : एकांचें मुसळ धरीति : एकासि जेऊं वाढीति : एकीसि जेऊं मागीति : एकीते म्हणेति : एकीते थापा हाणेति : तयाचेया बाजे सुपवर्तीयेवरि नीजति : ऐसा सकळ ग्रहीं व्यापारु करीति : मग गोसांवी बीजें करीति : ॥ ४० ॥

**मृत्यु सुचणें :** ॥ कोण्हाचीय घरीचें मरणहार असे : तयाचीया घरासि गोसांवी बीजें करीति : आंगणीं कीडडी करीति : तीयें म्हणेति " राउळो ! काइ असुभ देखत असा : तें नेणीजे : " तवं तयांचीए घरीचें एकाधें सरे : तयातें

गोसांवी समसानवरि बोळवीत जाति : कपाळमोचन होय तवं राहाति : मग सुतकेसि कां सींदकेसि सुचीलु स्नान करीति : मग जयाचे मरांत्रे असे मग तैसांचि वोलां वस्त्रीसीं बुथि घालुनि तयाचेया घरासि बीजें करीति : जाउनि एकी कोणीं बैसेति : तींयं म्हणेति : " राउळ ! काइ असुभ देखत असेति तें नेणीजे : " तवं दीसां दों तीं तयांचेंय घरीचें एकाधें सरे आणि गोसावी तैसेंचि करीति : ॥ ४१ ॥

**पींपळा प्रदक्षेणां करणें** : ॥ कळंकेस्वरा इसान्य कोणीं पींपळ : तेथ गोसांवी बीजें करीति : पींपळासि प्रदक्षेणा करीति : जेथ खांच कोप असे तेथ श्रीकरें स्पर्सीती : ऐसा पींपळासि संबंधु देति : मग गोसावी बीजें करीति :॥४२॥

**मांजरा अस्तीति** : ॥ मांजर एक दोंहीं देउळांचीय संदी बैसलें होतें : एकी वासना : कळंकेस्वरावरि बैसलें होतें : तें गोसांवीं द्दष्टि अवलोकीलें : आणि स्तीति जाली : तें तीन दीस स्तीति भोगीत बैसलेंचि होतें : मग तीसरां दीसीं गोसांवीं तेथ बीजें केलें : आणि द्दष्टि अवलोकीलें : मग म्हणीतलें : " जाए जाए जाए नां म्हणे : " आणि स्तीति भंगली : मग तें गेलें : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ४३ ॥ ✓

**सामान स्त्रीए वर्णभेदु** : ॥ अळजपुरिची सामांन अस्त्री रामयात्रे जात होती : ते रीधपुरी नगरेस्वरीं राहीली : आवघीं तीचीं सांवातीयें हाटा आंतु गेलीं : ते येकलीचि पालथी नीजैली होती : पाठीसि वर्णू नीगाला होता : तवं तेथ गोसांवीं बीजें केलं : तीचीए पाठीवरि श्रीचरणु ठेविला : आणि धुमकेनि हाणौनि वर्णू फोडिला : गोसांवीं रंदासि तोडले : तीचें दुख होतें तं नीरपौनि काढलें : मग तीया म्हणीतलें : " राउळ माए : राउळ बापु : राउळीं माझें दुख नीरसीलें : " मग गोसांवी बीजें केलें : तवं तीचीं सांघातीये आलीं : तींहीं पुसीलें " हांवो ! ऐसे काइ ? " तीया म्हणीतलें : " राउळीं येथ बीजें केलें होतें : माझा वर्णू फोडिला : दुख नीरपौनि काढलें : राउळ माय : राउळ बापु : राउळें मातें रीक्षीलें : " मग तीया म्हणीतलें : " तुम्हीं राम-यात्रेसि जा : मीं नैयें : " मग ते अजळपुरासि गेली : ॥ ४४ ॥

**तथा सामांन अस्त्रीयचें खाजें आरोगणें** : ॥ तेचि सामांन

अस्त्री अळजपुरीहुनी रांधवन हाटींचे पदार्थ रीधपुरासि घेउनि आली : तवं श्रीप्रभु गोसांवीं रामत्रीहीरां लक्षम(ण) वीहीरां धोत्र धुतलें : तया उतरे पींपळु : तया तळीं गोसांवीं बीजें करीतातिं : तवं ते आली : इदुरीचीय वाटे गोसावियासि मेटि जाली : दंडवत घातलें. मग वीनवीलें : गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : तेथाचि आरोगणा जाली : गुळुळा वीडा जाला : मग दोनि गुंडे दोन्हीं श्रीकरीं घेतले : मग म्हणीतलें : " मेली जाए जाए ना म्हणे : " पाठी लागले : तेथो-नीचि गेली : गावांतु रीगो नेदीतीाचे : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ४५ ॥

**मातांग-ग्रहीं खेळु** : ॥ गोसांवी माहारवडेयासि बीजें करीति : उतरडी उतरीति : मग म्हणेति " आवो! मेली जाय : येथ काइ असे ? " ते म्हणे " यथ काइ असैल राउळो ! का उतराल ? " तैसेंचि मातांगाचां घरीं करीति : कांहीं पदार्थू देखेति : तो चाखेति : आणि म्हणेति " आवो मेली जाए : गोड आहे म्हणे : " ऐसा अनुकारू करीति : मग गोसांवी बीजें करीति : ॥ ४६ ॥

**माहाजनीं नींबेधु करणें** : ॥ माहाजनीं म्हणीतलें : " राउळ मातांगां माहाराचा घरोंघरीं वीचरताति : आणि तैसेंचि दीक्षीतां ब्राह्मणांचां घरीं वीचरताति : ऐसें राउळीं भ्रष्टाभ्रष्ट केलें : तयांचीं घरें गांवांबाहीरि घाला : मग तेथ राउळ न वचेति : " म्हणौनि गांवांबाहीर घरें बांधवीलीं : तो माहारवडा मोडीला : तवं गोसांवी तेथही बीजें करीति : " आवो ! न यावें म्हणे : यावें म्हणे : आवो न यावेंचि म्हणे : " ऐसा घरोंघरीं खेळु करीति : ॥ ४७ ॥

**मातांग वीनवणीं स्वीकारू** : ॥ एकु दी मातांगीं वीनवीलें : " राउळो ! आम्हीं पाणियेंवीन मरते असो : तरि काइ करूं जी ? " राउळासि अनूकुंपा उपजली : मग गोसांवीं म्हणीतलें " मेला जाए नां म्हणे : " म्हणौनि तेथ बीजें केलें : " आवो ! येथ खांणावें म्हणे : न खणावें म्हणे : आवो येथ खांणावेंचि म्हणे : " म्हणौनि श्रीचरणींचेनि आंगठेनि दाखवीलें : तेथ तीहीं खांणितलें : तवं अमर्याद पांणीं लागलें : मग म्हणेति " राउळ माय : राउळ बापु : राउळाचेनि प्रसादें आम्हीं पांणीं पीत असों : " ॥ ४८ ॥

**खाटीकासि खेळु** : ॥ गोसांवी खाटीकांचेया घरांसि बीजें करीति :

पसारां बैसेति : तेहीं भाग केले असेति : सानां भाग असे तो थोरु करीति : थोरु असे तो सानां करीति : हाड असे तेथ मांस घालीति : मांस असे तेथ हाड घालीति : सरीसे वीभाग करीति : मग म्हणेति " मेला जाय : आतां होय म्हणे : " ऐसे दोन्हीं श्रीकर माखेति : तें उपाधीं देखिलें : ते हाटवटीएसि आले : तयाचां घरीं श्राद्ध : आणि तें तैसें देखीलें : मग म्हणीतलें : " जाआं घरीं नीरवाडि करूं : एऱ्हवीं राउळ ऐसेचि जाति : आणि रांजणीं श्रीकर धुति : " म्हणौनि नीगाले : घरासि आले : तवं राउळ रांजणीं श्रीकर धुती असेति ऐसें देखीलें : मग म्हणीतलें : " कोण ठावो-वरि राउळांते राखावें : राउळां-वींण काइ कव्हणी ठावो असे ?: " ऐसा गोसांवीं तयांचा वीकल्पु नासीला : ॥ ४९ ॥

**उपासन्यां घरीं खाजें आरोगणें** : ॥ एकु दी गोसांवी उपासनेयांचीया घरांसि बीजें केलें : तवं तें दोघें नीजेलीं असेति : तवं उपासनीं गोसावियांतें देखीलें : आणि म्हणीतलें " उठी उठि : राउळ आले : कांहीं खाजें घेउनि ए : " ते उठीली : ताट काढिलें : लाडुवां तीळुवायांची चुरि ताटीं घातली : आतु चारोळीया गोडंबीया साकर ऐसें घातलें : तें राउळांसि वोळगवीलें : आणि गोसांवीं म्हणीतलें : " मेला जाए : आतां होए म्हणे : " तेवीचि हास्य स्वीकरीति : तेवीचि आरोगणा करीति : मग तयां दोघां प्रसादु दीधला : मग गोसावियांसि गुळुळा जाला : वीडा जाला : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ५० ॥

**उपासन्यां घरीं पहुडु** : ॥ उपासने आणि उपासन्यांची ब्राह्मणि दोघे नीजैलीं असेति तवं गोसांवीं बीजें केलें : दोघामध्यें गोसांवीं पहुडु स्वीकरीला : आणि उपासनीं आपुलीए ब्राह्मणीतें म्हणीतलें : " उठि उठि : राउळीं पहुडु स्वीकरीला असे : तूं आणीक बाज घाली : " ते उठिली : आणिक बाज सुपवति घातली : तीएं दोघे तेथ निजैलीं : तवं गोसावीयांसि उपहुडु जाला : गळुळा केला : उदक स्वीकरीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : रातें आणी म्हणे : आवो दे दे दे नां म्हणे : " मग वीडा वोळगवीला : मग गोसावीं म्हणीतलें : " आतां होय म्हणे " म्हणौनि बीजें केलें : ॥ ५१ ॥

**सींपे-घरीं पहुडु** : ॥ गोसांवी सींपीयाचेया घरासि बीजें करीति : तीएं आपुलीं दांडें सोडीति : गोसावियां खालि आंथुरीति : एकें वरि पांगुरूवीति :

मग श्रीचरण प्रक्षाळीति : कऱ्हणीं खाजें वोळगवीति : वीडा वोळगवीति : मग गोसावी पहुड स्वीकरीति : ऐसीं जेतुलीं घरें सींपीयाचीं तेतुलेयां घरा बीजें करीति : तयांचीं वस्त्रें दुनलेंनि मोलें वीकेति : ऐसा लाभु होए : ॥ ५२ ॥

**वांणींयां-घरीं खाजें आरोगणें** : ॥ गोसावी वांणींयांचीयां घरासि बीजें करीति : तयाचां पसारां बैसेति : श्रीकरीं तागडी घेति : दु-सेरी : अढे सेरी : सेरू : पाउ सेरू : पासेरी : पालडां घालीति : केणें तुकीति : खारीका खोबरें : मीरीयं लवंगा : एळा पोफळें ऐसें एकत्र करीति : एरी ठांयींचें एरी ठांइं घालीति : ऐसा नावेकु खेळु करीति : मग ते वांणींए उदक आंणींति : श्रीकर प्रक्षाळीति : श्रीचरण प्रक्षाळीति : मग फळें खाजें वोळगवीति : गोसावी आरोगणा करीति : मग गुळुळा होए : वीडा देति : तयांचा थोर वीकरा होए : आंणि दुणा लाभु होये : ऐसीं जेतुलीं घरें वांणींयांचीं तेतुलेयां घरांसि गोसावी बीजें करीति : ॥ ५३ ॥

**उपासन्यां घरीं आसु खेळु** : ॥ उपासनीये आंणि उपासनीयांची ब्राह्मणि आसु मवीतें होतीं : तवं गोसांवीं बीजें केलें : गोसावियांतें यत देखिलें : तवं तयांची ब्राह्मणि आसु लपउं बैसली : तवं उपासनीं म्हणीतलें : " लपौ नको : " तीया म्हणीतलें : " राउळ देखति तरि सांडीति : " तवं गोसावी बीजें केलें : तींयें दोघें परतीं सरलीं : गोसावियांसि उकड आसन जालें : आसुसीं खेळु करूं लागले : तेवींचि अनूकार करीति : " हे वांकट : हे फुटक: हे तुकमट : हे खोलट : हे बरवट : हे कुडी : हे खरी : हे सोपांन : " ऐसा नावेक गोसावी खेळु केला : मग बीजें केलें : मग तीहीं आपुलीया आसु मेजीलीया : ॥ ५४ ॥

**देवाळां ब्राह्मणाचें अन्न आरोगणें**: ॥ खेडीचा ब्राह्मण तो हाटासि आला होता : सीदोरी घेउनि : तेणें म्हणीतलें : " राउळ येथ भ्रष्टाभ्रष्ट करीत असेति : तरि सीदोरी एथचि जेउं : मग गावांत जाओं : " म्हणौनि देवाळे-यासि गेला : ' येथे स्नान करूं ' म्हणौनि सीदोरी पींपळाचीए खांदीय बांधली : वरि ठेवीली : आपण स्नान करूं बैसला : तवं गोसांवीं बीजें केलें : सीदोरी कादीलि आरोगणा करीत असेति : तवं तेणें देखीलें : मग म्हणीतलें : " राउळ माए :

राउळ बापु : राउळ इस्वरु : राउळेंवींन काइ कव्हणी ठावो असे : " मग साउमा आला : श्रीचरणा लागला : तोचि प्रसादु तो जेवीला : मग गोसांवीं म्हणीतलें : " मेला जाए : आतां होए म्हणे : " मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ५५ ॥

**कर्मब्रह्मां मांनु देणें** : ॥ एकु दीं गोसावी परसयासि पन्हींवेनिहुनि बीजें केलें : परसयो सारिला : मग श्रीकरीं देंकुळ घेतलें : मग देवाळेयासि बीजें केलें : पाळीसि पुर्वे मृतिका सौच्य केला : मग आंचमन केलें : अघ-मर्खण केलें : यथावत् कर्म केलें : मग चींचे दक्षीणे कांनवडा कासवटा करुनि उभयांचि मुत्र केलें : तवं तेथ ब्राह्मण बैसले होते : तेहीं देखिलें : मग म्हणी-तलें : " पाहा पां हा गा एव्हढा वेळु कर्मासि मांनु दीधला : आतां ब्रह्मांसि मांनु देत असेति : ब्रह्म तें अतर्कीय : ब्रह्म तें नीर्विकल्प : ब्रह्म तें सकळ गुण-रहीत : ब्रह्म तें ऐसें : " ऐसें म्हणो लागले : मग गोसावी बीजें केलें : ॥ ५६ ॥

**मृत्य वछ (वत्स) जीववणें** : ॥ एकांचें वांसरूं सरलें : तें नेउनि खालाळीए–खालि घोडेयापासि घातलें : तवं तेथ गोसांवीं बीजें केलें : तीहीं गोसा-वियांतें म्हणीतलें : " जी जी ! आतां लेंकरुवें दुधें– वींन काइ करीति जी ! एकी गाए होती : तीचें वांसरूं सरलें : गोसावी तयापासि बीजें केलें : आणि हरळें सांतोडीलें : आणि जीयालें : घरासि हुंबरत गेलें : वांसरूं जीयालें म्हणौनि हरिखेलीं : तयांचें घर तें टेंकाळीएसि : पाखालेयाचेया घरा सेजेंचि : एकी वासना : वीळीचां गाए घरासि आली : तेहवाळि गोसांवीं बीजें केलें : जयाचें वांसरूं तेंहीं वीनवीलें : " राउळो ! वांसरूं मेलें : आतां ताकवणियावीन काइं करूं ? :" गोसांवीं वीनवणी स्वीकरीली : आंणि तैसेंचि बीजें केलें : आंणि पुसीं धरिलें : मग म्हणीतलें : " आवो उठि उठि उठि नां म्हणे : " तें उठिलें : घरासि गेलें : गाएतें पेवों लागलें : मग तीहीं म्हणीतलें : " राउळ माय : राउळ बापु : राउळ करीति तें काइ नव्हे ? " म्हणौनि आश्चर्य वीस्मो जाला : ॥ ५७ ॥

**उपडुनि कोहळी लावणें** : ॥ एकां ब्राह्मणाचीया घरावरि कोहळी होती : ते गोसावी उपडीली : (ते फरफरां नेत होते) : तवं तयाची लेंकि धांइ ते धांवीनली : " आहा राउळो ! फळतें फुलतें झाड कां उपडीलें ? " तवं गोसांवीं

तीतेंही पाइं धरीलें : तवं माए बोबाइली : " राउळो ! राउळो ! धाइतें सोडा : कोहळी नेया : " गोसांवीं दोन्हीं नेउनि पेवीं घातलीया : आपण बीजें केलें : मग तेही काढिली : तीचीया माया पुसिलें : " धाइ ! दुखवीलीसि ? " तीया म्हणीतलें : " नां नांहीं : राउळ माए : राउळ बापु : राउळ फरफरा काढीति तवं तवं मज सुखाचि होए : " मग तीसरां दीसीं गोसांवीं पेवांतुनि कोहळी काढीली : मग काडिया करूनि उकरीलें : मुळीया भुइ आंतु रोवीलीया : तीनी चुळ रांजणीचें पांणीं घातलें : तींहीं म्हणीतलें : " राउळो ! वाळलें सुकलें आतां काइ लागैल ? " तवं गोसांवीं बीजें केलें : सवळोचि पाहाति तवं फळीं घडीं मोडोनि आलीं : मग म्हणीतलें " पाहा वो ! पाहा वो ! राउळ माए : राउळ बापु : राउळ इस्वरू : राउळ करीति तें काइ नव्हे ! " तयांचें घर तें उपासन्यांचेया घरा उतरे सेजेंचि : मधीं गोदरी : ॥ ५८ ॥

**स्वान-भये नटणें** : ॥ उंच-मढा दक्षीणे खीडकीये बाहीरी गोसांवी खेळु करीत होते : तेथ आबैसे गेलीं : गोसावियातें वीनउंनि घेउनि एतें असेति : तवं आंतु वाटेसि सुनें उभें होतें : तें देखौनि गोसांवी भेओं लागले : " आवो ! आवो ! कैंकट कैंकट होए म्हणे : मेली जाए खाइल म्हणे : कैंकट होए म्हणे : " आबाइसीं म्हणीतलें : " आ रे सुनयां ! आमचे गोसांवी भीत असति : परतें जाय : " " आवो कैंकट खाइल म्हणे : न खाए म्हणे : कैंकट होए म्हणे : " तवं तें सुनें परतें गेलें : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ५९ ॥

**गाइ बुजवणें** : ॥ पुर्विली दारवठांचेया (दोहीं) घोडेया आड लपेति : बाहीरीली-कडुनि गाइ एति : आंणि होकरुनि उठीति : तीया गाइ बुजौनि पळेति : मग घोडेयावरि आरोहण करीति : श्रीकरें स्पर्सीति : ऐसा खेळु करीति : ॥६०॥

**रांजणु सांदणें** : ॥ वीस-नाएकें रांजणु घेतला होता : तो गोसांवीं फोडिला : तयाचीया स्त्रीया म्हणीतलें : " आहा राउळो ! नवा रांजणु कैसा फोडीला : आतां पांणियेवींण काइ करूं ? " मग गोसांवीं दोन्हीं कोरकें एकवट मेळवीलीं : पांणियें माती कालवीली : आंणि लींपीला : " राउळो ! घड होइल ?" मग गोसांवीं बीजें केलें : मग तो आंणीकी ठांइं फुटला : परि तेथ न फुटेचि : ॥ ६१ ॥

**दुजां मार्ग सांगणें :** ॥ बहीरवा–पसीमें वडा दक्षीणे : तळेयाचीये पाळीवरि गोसावी वेढे करीत होते • ( तवं ब्राह्मणु एकु आला : तेणें देउळवाडे-याचा मार्गु पुसिला ) " एजमान ! या देउळवाडेयासि वाट कोण जाइल ? " गोसांवीं म्हणीतलें : "मेला जाए : वरटा वरटा जाए नां म्हणे :" मग तो गेला : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ६२ ॥

**कोपु नटणें :** ॥ गोसावी जयावरि कोपेति तयातें म्हणेति " आवो ! मेला जाए : वोले दांडेवरि सीस लावावें म्हणे : वोले दांडेवरि मारावें म्हणे : वोनां घालावें म्हणे : " ॥ ६३ ॥

**तवंगावरि बीजें करणें :** ॥ सीमुंगा प्रसरांमापुढें तवंग केले होते : तयावरि गोसांवी बीजें करीति : नाचणीं नाचति असेति : तीया धोटेवरि सींपीति गोसावी म्हणेति : " आवो मेली जाए जाए नां म्हणे : " तवं एरा तवंगावरि बीजें करीति : तवं तीया धोटेवरि सींपीति : " आवो मेली जाए जाए नां म्हणे : " म्हणौनि कोपु नटेति : तवं मागुतें धोटेवरि सींपीति (धोटे सुटति) " आवो होय होय " म्हणौनि हास्य स्वीकरीति : मग गोसांवी बीजें करीति : ॥ ६४ ॥

**प्रसरांमासीं खेळु :** ॥ प्रसरामु तें थोर भोगस्थान : फुलांची पुजा बांधली होती : गोसांवीं भीतरि बीजें केलें : देवते दक्षींणे उकड आसन जालें : पुजे आंतु आडवा श्रीकरु घातला : मग म्हणीतलें : " आवो मेली जाए : एथ आहासि म्हणे " म्हणौनि श्रीकरें स्पर्सीति : परि एकही फुल खचेचि नां : एकी वासना : देवते पुर्वे उभे राहीले : मग वोनवौनि श्रीकरू घालुनि स्पर्सीलें : ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ ६५ ॥

**पडवा वोळगवणें :** ॥ दादोस तेलंग देसा गेले होते : तेथौनि दोनि वाटीया आंणि पडवा घेउनि आले : ते एकी वाटी आंमचेयां गोसावियासि वोळग-वीली : एकि आपणेंयांसि राखीली : पडवा रीधपुरासि घेउनि आले : तवं श्रीप्रभु गोसावियांसि पटिसाळेवरि रीगतां डावया हाता आसन असे : तेथ भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : लोहीवा पडवा आंणीला होता तो वोळगवीला : मग गेले : ॥ ६६ ॥

**केसव-नाएकाचां घरी आरोगणा करणें :॥** केसव-नाएकांचें यक घर आणि सेत सेजा गांवीं होते : तेथ गोसांवीं बीजें केलें : एथोचीत आरोगणा केली : मग गोसांवीं रीधपुरासि बीजें केलें : ॥ ६७ ॥

**कोठा झाडणें :॥** एकु दीं गोसावी केसव-नाएकाचा कोठा झाडीत होते : तवं तींहीं म्हणीतलें : " राउळो ! राउळो ! ऐसें काइ करीत असा ? राउळ काइ सुचीक देखत असेति तें नेणिजे : " तवं वेळीचा ( विळीचा ) गोवळु आला : तेणें म्हणीतलें " बैल चुकले : गेले : " तींहीं म्हणीतलें : " राउळीं मगां सुचीक देखीलें तें साच जालें :" ते बैल पांहों न वचतीचि : बैल चुकलेचि : ॥ ६८ ॥

**नेमाळ-पांडीया अवेवगत कथन :॥** नेमाळ-पांडीया तो अळजपुरीचा : तो धानुंबाइचा अतारू : तो रीधपुरासि गोसावियांचीया दरसना आला : तवं गोसावियासि भीतरि मांचियावरि आसन असे : तेथ तयासीं दर्सन जालें : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : पुढें ( पुढां ) बैसला : तवं गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय जाय ना म्हणे : नाक जाइल म्हणे : कान जातील म्हणे : डोळे जाती म्हणे : " नेमाळ-पांडीयें म्हणीतलें : " जी जी ! एहीं डोळां गोसावियांतें देखिलें : आतां मलेतें हो : " तवं धाडि आली : टेंकीचेनि रायें धरूनि नेला : डोळे काढिले : गोसावियांतें वीनवीता तरि वांचते : ॥ ६९ ॥

**यूथ्य-समइ स्त्री-अळंकार स्वीकारू :॥** एकी गावींचेयां आणि रीधपुरींचेया झगडा लागला होता : एकी वासना : खेडीचयां आणि रीधपुरींचेयां : ते गांउं घेयावेया आले : आवघेन लोकें पळवीलें : कोण्हीं पेवीं घातले : ऐसां आपुलाली सुचना केली : एकी स्त्रीया आपुलें भांगार फेडीलें : गोसावियांचीय वोंटीय घातलें : तीया म्हणीतलें : "राउळो ! हें आपणयापासि ठेवा :" म्हणौनि दीधलें : गोसांवीं घेउनि बीजें केलें : दोन्हीं आरणीं मीळालीया असेति : देवाळेया दक्षीणीली पाळी वावरा आंतु गोसांवीं दोहीं आरणीं-माजि बीजें केलें : आणि सेजा गांवींचे आले होते : तेहीं म्हणीतलें : " राउळ आले : आतां तुम्हां आम्हां सांडाइ : " इतुकेनि एर-एरां नीकें जालें : ते आपुलेया गावां गेले : एर आपुलेया घरा आले : मग ते बाइल सेजीयां साइलीयांतें पुसे : सांघों लागली :

" आवो ! मींया राउळांपासि मांगार दीधलें होतें : " तेहीं म्हणीतलें : " आवो राउळ वेडे : राउळ पींसे : एकाधीए अडीं घालीति : राउळां हातीं कैंसें दीधलें ? " ते म्हणे " राउळ ऐसें काइ करीती ? : आणि करीति तरि करीति : आणि काइ : तरि राउळाचि मज आंणीक देति : " तवं गोसांवीं बीजें केलें : " आवो मेली जाए घे घे नां म्हणे : " म्हणौनि वोटीएचे काढुनि दीधलें : " पाहा वो ! पाहा वो ! राउळ माय : राउळ बापु : राउळीं माझा बाळकाचा जीवप्रहो राखीला : ॥ ७० ॥

**परीखा नीमंत्रणीं आरोगणा करणें:** ॥ एकु दीं गोसांवीं देउळवाडेयासि बीजें केलें : परीखा नीमंत्रणीं आवघे सन्यासी भीतरि बैसले : मग अवघयां सन्यांसीयां वाढिलें : गोसावियांसि वाढिलें : तवं तीए समइं इतुके ऐसें अभाळ आलें होतें : आणि गोसावी गगनाची वास पाहीली : मग म्हणीतलें : " आवो मेला जाए : एय नां म्हणे : आवो एचि म्हणे : " तवं पांणीं आलें : तो अवघा मढु पांणियें भरला : पातळी उदकावरि तरंगों लागलीया : मग ते बाहीरि पटीसाळेवरि बैसले : गोसावियांवरि आणि गोसावियांसि वाढतीएवरि पांणीं नाहीं : गोसावी आरोगणा करीताचि होते : ते वाढीताचि असे : परि पांणीयांचा थेंबु न लगेचि : इतुकेनि अवघेयां संन्यांसीयां आश्चर्य जालें : मग दंडवत घातलें : गोसावियांचेनि उचीष्ट प्रसादें आंगें माखीलीं : स्तुति करीति : अनुतापु करीति : मग गोसांवीं बीजें केलें : मग तीहीं गोसावियांची पातळी सांडीति : तवं पातळीखालि पातळी नीगे : ऐसीया सात पातळीया नीगालीया ॥ ७१ ॥

**सुएर करवणें :** ॥ बाइल एकि एकटीक : एकली एकट : घरि वडील धाकुटें मांणुस नाहीं : ते कोणीं रीगाली : तीचें सुएर करीतें कोण्हीं नाहीं : तीया मनोरथु ऐसा केला : ' राउळ माए : राउळ बापु : राउळ एते तरि सुएर करीते : " तवं गोसांवीं बीजें केलें : तीचें सुयर गोसावी करीति : तीसि वाढिति : गोसावी तीयासि न्हाणीति : तीएचा दादुला बैसला असे : तरि तया आड पालौ वोडवीति : " मेला जाए म्हण : परता जाए नां म्हणे : " सीतकरीति : " आवो मेली जाय : आमडली म्हणे " तीची वेळणीं श्रीकरीं घेति :

ते आवघीयां उतरंडीसि लावीति : मग बीजें करीति : ऐसें बारा दीस केलें : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ७२ ॥

**मातांगा स्तीति :** ॥ गोसावी दाभ-त्रीहीरीचेनि मार्गे बीजें करीत असेति : तवं मातांगु एकु भेटला : तेणें साष्टांग दंडवत घातलें : आणि गोसांवीं तयाचीय पाठिवरि श्रीचरण ठेउनि बीजें केलें : तो तीन दीस स्तीति भोगीतु पडीलाचि होता : वरुनि गाइ म्हैसी वासरुवें जाति : तो तीसरा दीसीं उठीला : मग इस्वरत्वें वर्तो लागला : तीहीं लोकीं म्हणीतलें : " हा मातांगु : यनें अवघा गांओं वीटाळीला : " म्हणौनि राणीं पींपळेसीं बांधला : तवं अळजपुरीचा वेव्हारा रामांसि जात होता : तयासि स्वप्नीं आला : "आगा मीं रामुं : मातें राणीं पींपळेसीं बांधलें असे :" मग तो उदीयाचि गेला : तवं तो बांधला असे : मग सोडिला : घर सेत वीकत घेतलें : दोघी बाइला सुश्रके घातलीया : तयाची रामयात्रा तेथचि चरितार्थ जाली : मग कौतीकें रामुं पाहावेया गेला : ॥ ७३ ॥

**गुढया श्रीचरणा लावणें** : ॥ गोसावीं एकांकीं राज्य करीत होते : ते एतां जातां मार्गी गुढेनसीं क्षेळु करीति : श्रीचरण लावीति : आणि म्हणेति : " आवो हा आजि यथ असे म्हणे : हा असेचि म्हणे : " ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : मग गोसावी राज्यधर्म स्वीकरीलया उपरि दांडीए बैसेति : " आवो डोळो डोळो " म्हणेति : आणि भक्तिजनीं दांडी मेळवीली : मग दांडीयवरि बैसेति : आणि बीजें करीति : तो ठावो पावति : आणि तीए वेगळा श्रीचरणु काढीति : लोंबतु घालीति : मग हालतु वांकीचा श्रीचरणु गुढयासि लावीति : (बाहुल्यें आंगठाचि लावीती :) ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ ७४ ॥

**अधीकारीया भेटि** : ॥ गोसावी आप-त्रीहीरयाकडे खेळत असेति : आणि अधीकारीयातें यत देखीलें : आणि वडातळि बीजें केलें : वडाची पारंबी धरुनि गोसावी खेळु करीत असेति : तवं अधीकारीया दांडीए बैसोनि आला : पुढें राउत पाइक उभे राहीले : अधीकारिएं म्हणीतलें : " आरे ! चाला ना : का उभे राहीलेति ?" तीहीं म्हणीतलें : "आम्हा चालवे नां : पुढां राउळ खेळत असेति : ते आमंची गति-मति क्षाळली : " आणि अधीकार्ये दांडीए खालउती (खालौती) उडी घातली : आणि दंडवत घातलें : मग जवळि आला : श्रीचरणा लागला

मग वीनवीलें : गोसांवीं वीनवणी स्वीकरीली : मग तेथचि दुस घातलें : आसन रचीलें : पडदनीं ओळगवीली : मग मर्दना मादनें जालें : पुजावसरु जाला : आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा जाला : वस्त्र ओळगवीलें : दंडवत घातलें : श्रीचरणा लागला : मग तो आपुलेया गांवासि गेला : गोसांवीं रीध-पुरासि बीजें केलें : ॥ ७५ ॥

**प्रत(ति)बींबेसी क्षेळु** :॥ एकु दी गोसांवीं आप-वीहीरियासि बीजें केलें : आप-वीहरा सांळेवरि उकड आसन जालें : श्रीमुख प्रक्षाळीलें : श्रीकर प्रक्षाळीले : श्रीचरण प्रक्षाळीले : आणि भीतरि रूप देखीलें : आणि गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! हा एथ असे : बोलतु असे म्हणे : गोष्टी करीतु असे म्हणे : नटतु असे : ठाकतु असे म्हणे : " आणि श्रीचरणु घालीति : मागुते ठाकेति : मागुते पुढारे होति : आंतु पाहाति तवं भीतरि प्रतबींब देखेति : आणि हास्य स्वीक-रीति : ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ ७६ ॥

**घरमाळीयाचें उदक अन(न्न)आरोगणें** : ॥ घरमाळी अन(न्न) कोंपासि ठेवी : ते गोसावी काढीति : आरोगणा करीति : मग तो लपवी : तेथौनीहीं गोसावी काढीति : आणि आरोगणा करीति : मग तो पुरी : तेथौनीहीं उकरूनि काढीति : मग आरोगणा करीति : मग तेणें म्हणीतलें : " राउळेंवींण कव्हणीं ठाओ नाहीं : राउळ नेणेति ऐसा काइ कव्हणीं ठावो असे ? " मग तेणें ऐसा नेमु घेतला जें आधीं राउळासि आरोगणा देइन मग जेवीन : जवं गोसांवी बीजें करीति तवं आपण नेजवी : तवं गोसावी बीजें करीति : मग गोसावियांसि आरोगणा दे : मग तयासि प्रसादु होए : ऐसा तयाचा नेमु देहपरी-यंत सीधी गेला : ॥ ७७ ॥

**दर्भाळा महीका स्नान अनुवादु** : ॥ गोसांवीं दर्भाळेयासि बीजें केलें : तया पसीमे पाळीवरि आसन जालें : आंतु म्हैसी बैसलीया होतीया : एकीचा माथा चांद होतें : एकीचा नाहीं : मग गोसांवीं म्हणीतलें : " या पाठकासि टीळा जाला : या पाठकासि नाहीं :" जे बुडकळी दे : तीतें म्हणेति : "सचैल स्नान जालें : यासि नाहीं :" बुडकळी देति : तयातें म्हणेति : "हा पाठक

कंठस्नान करीतु असे : हा नीका : हा नीका नव्हे म्हणे : हा नष्ट म्हणे : ” ऐसा गोसावी अनुवादु करीति : मग बीजें करीति : ॥ ७८ ॥

**गोपाळा आंतु खेळु :** ॥ “ आवो ! हा पाठकु गोपाळु : आवो ! हा वीप्रु गोपाळु : आवो ! हा ब्रह्मचारी गोपाळु : आवो ! हा सुद्राचि होय म्हणे : ” मग गोसांवीं बीजें करुं आदरीलें : गोपाळीं म्हणीतलें : “ राउळो ! राउळो ! काला जेवा : मग जा : ” मग बरवा बरवा पदार्थु नीवडीला मग गोसावियांसि आरोगणा दीधली : मग आपण जेवीले : मग गोसांवीं बीजें केलें ॥ ७९ ॥

**उमाइसीं श्रीमुगुटु वीचुरणें :** ॥ गोसांवीं दाभ-वीहीरीसि बीजें करीति : तेथें उमाइसाचेया घरासि बीजें केलें : तया माची बैसो घातली : गोसांवी आसनीं उपविष्ट जाले : उमाइसें श्रीमुगुटु वीचरीति : उ पाहाति : ते गोसावियां श्रीकरीं देति : ठोंसा देति : तीया उ गोसावी टाकीति : का आंणीका केसांतु घालीति : एवी वासना : मागुतीया श्रीमुगुटीं घालीति : मग उमाइसें हात धुति : ताट करीति : गोसावियासि आरोगणा देति : मग गोसांवीं बीजें करीति : ॥ ८० ॥

**तीको-उपाध्या-जाए सर्प नीमीत्यें मृत्यु सुचणें :** ॥ गोसावियासि तीको-उपाध्याचीए पटिसाळेवरि आसन असे : मग गोसांवीं म्हणीतलें : “ आवो ऐसाचि एइल म्हणे : आणि ऐसाचि खाइल म्हणे : आवो मरेल म्हणे : न मरेल म्हणे : आवो मरेलाचि म्हणे : ” तवं सर्पु नीगाला तीकोपाध्याचीए स्त्रीएसि खादलें : ते सरली : गोसावी तीतें बोळवीत न वचतीचि: ते थोर खंतीची : म्हणौनि : ॥ ८१ ॥

**तीको-उपाध्या जावाइ श्राधीं आरोगणा स्वीकरणें :** ॥ तीकोपाध्यांची लेंकि सावीत्री : तीचीया वरैताचें श्राध करीति असेति : आवघया ब्राह्मणांसि क्षेणु दीधला : मग अवघे साक पाक नीपजवीले : ते माळवंचयावरि ठेवीले : कवाड घातलें : सावीत्रीतें दारोसि बैसवीलें : आणि आपण आंघोळी गेले : तीतें म्हणीतलें : “ राउळ एती तरि राउळासि पाक उचीष्ट करुं नेदावे हो : ” ऐसा नीरोपु दीधला : आपण गेले : तवं गोसांवीं बीजें केलें : तीतें

थापा हाणौनि परतें लोटीलें : कवाड उघडीलें : माळवंचेयावरि बीजें केलें : पाक काढीले : ते आवघे चाखिले : मग बीजें केलें : तवं तीको-उपाध्ये आले : तीया तें आवघें तीको—उपाध्यापुढें सांघितलें : " राउळ आले : माते थापा हाणीतलें : कवाड उघडीलें : माळवंचेयावरि वेंघले : पाक अवघे उचीष्ट केले : " मग तीहीं म्हणीतलें : " आतां तीर्था जाओं : मग तीर्थी श्राध करूं : एक (एथ) तरि राउळा हातीं करूं न व्हांउं : " मग ब्राह्मण खेनीले होते : ते बोलावीले : (ते जेववीले) आपण उपवासी पडीले : तवं रात्रीं पीतर स्वप्नीं आले : " आगा तूं उपवासी कां पडीलासि ? : राउळीं साक पाक काढीलें : तेणें पीता परपीता महपीता तीन्हीं तृप्त जाले : " मग तीकोपाध्ये उठीले : अवघे ब्राह्मणापासि सांघितलें : मग स्तुति करूं लागले : " राउळ माए : राउळ बापु : राउळ करीति ते काइ नव्हे ? " मग तेणें स्नान केलें : जेवीला : तयाचें चरीतार्थ जालें : ॥ ८२ ॥

**तीकोपाध्या मृत्यु सुचणें** : ॥ एकु दी गोसांवी तीकोपाध्याच्या आंगणीं कांठीयांची कीडडी केली : तीकटें केलें : तवं उपाध्यांचीया लेंकीं म्हणीतलें : " राउळो ! ऐसें काइ असुभ देखत असा ? " तवं तीकोपाध्यासि ज्वरू आला : ते सरले : गोसावी उंबरेयावरि पाटी(टु) थापटौनि बैसले : पुढें मांचळीं मांडीली : मग गोसांवीं म्हणीतलें : "मेली जाए : जेउं घालि घालि नां म्हणे : " तीया म्हणीतलें : " राउळो ! प्रेत काढुं देया : मग घालीन : " " आवो ! आंणि आंणि आंणि नां म्हणे : " तीया म्हणीतलें : " राउळो ! प्रेत काढुं देया : मेलयावरि कुरू कैसा खाल ? " प्रेत काढुं नेदीतीचि : एरीं म्हणीतलें " राउळ मागताति तरि घालीसि नां कां " मग सींकांचें दहीं काढीलें : भातु कालवीला : मांचळीयेवरि घातला : मग गोसावियांसि दहीं—भाताची आरोगणा जाली : मग गुळुळा जाला : मग काढुं दीधले : गोसांवीं बोळवीत बीजें केलें : कपाळ—मोचन होए तवं राहीले : मग सींदुकेसि सचील स्नान केलें : मग बीजें केलें : ॥ ८३ ॥

**रांमदेवां प्रेस्णे (प्रश्नें) कांनडी भालुगावां अनुवादु** : ॥ एकु दी रामदेवीं पुसीलें : " जी जी ! मज आम्हुंच गोसावी कवणे ठांइं भेटति ? "

गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेला जाए : कानडी-भालुगावांकडे :" तैसेंचि जरि नीगते तरि गोसावियांसि भेटी होति : ते तेथ राहीले : ॥ ८४ ॥

**भटां माहादाइसां भेटि :** ॥ एकु दी बीढारीं सर्पण नाहीं : तेइवाळि भट माहादाइसें सेनीं वेंचावया दाभ-वीहीरीकडे गेलीं : तवं गोसांवीं पांच-पींपळीयांकडे बीजें केलें : पींपळा नृत्य कोंणीं भटा माहादाइसासीं भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो ! चांगदेव राउळांचीं ! आवो जा जा दाभ-वीहीरी जा : दर्भेस्वरू पाहा :" "हो कां जी" म्हणौनि दाभ-वीहीरी गेलीं : दर्भेस्वरू पाहीला : मग आलीं : एक म्हणेति : भानखेडाहुनि भटातें घेउनी आलीं : ते भेटि जालीं : ॥ ८५ ॥

**चोरें नेत पटी कथन :** ॥ माहादाइसि पासवडीची पाटी वाळत घातली : ते कोणें नेणों नेली : तीएं पाहों लागलीं : गोसावियांसि रीगतां डावेया हातीं भीतींसीं आसन असे : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो ! मेली जाए : पाटी चोरें नेली म्हणे :" तवं माहादाइसीं म्हणीतलें "जी जी ! गोसांवीं नेवों कैसी दीधली ?" आणि गोसांवीं हास्य स्वीकरीलें ॥ ८६ ॥

**माहादाइसाची सेवा स्वीकारू :** ॥ गोसावियांसि उदर-वेथेची प्रवृत्ति जाली : "आवो ! एथ दुखताए म्हणे : आवो ! दुखताए म्हणे" मग माहादाइसीं दीवयावरि हातु सेकिला : आणि बोंबीएवरि ठेविला : "आवो ! एथाचि ओ एथाचि ओ : हाए" म्हणौनि स्वीकरीलें : मग माहादाइसीं म्हणितलें "गोसावियांसि सेकु मानतु असे : तरि सगडी करुं :" मग माहादाइसीं समडी केली : मग माहादाइसी पोतौडी सेकीति : आणि उदरावरि ठेवीति : आणि "हाए" म्हणौनि स्वीकरीति : आणि म्हणेति : "आवो एथाचि ओ ! एथाचि ओ !" म्हणौनि श्रीमुख पांगुरवीति : मागुतें उघडीति : उदक मागेति : तें माहादाइसें वोळगवीति : ऐसा सेकु केला : मग नीकें जालें : ॥ ८७ ॥

**माहादाइसाचें घीडरें आरोगणें :** ॥ एकु दीं माहादाइसीं गोसावियातें वीनवीलें : "जी जी ! मीं आजि गोसावियांसि घीडरें वोळगवीन जी ! गोसांवीं खेळावया बीजें न करावें जी !" गोसांवीं वीनवणी स्वीकरीली :

" आवो मेली जाए : धीडरें देइल म्हणे : " म्हणौनि हरीखु स्वीकरीला : खेळों बीजें करावें तें न करीतीचि : "आवो धीडरें देइल म्हणे : खावें : न खावें म्हणे :" मग माहादाइसीं धीडरें केलें : मग ताट केलें : आसन रचीलें : गोसांवी आसनीं उपवीष्ट जाले : मग माहादाइसीं धीडरें ओळगवीलें : वाटीए तुप घातलें : मग गोसांवीं धीडरें अवलोकीलें : आणि म्हणीतलें : " आवो हें धीडरें नव्हे म्हणे : हा आईता म्हणे : आवो धीडरें आणि आणि ना म्हणे : " म्हणौनि कोपु नटले : माहादाइसीं म्हणीतलें " जी जी ! आमतें गंगातीरीं धीडरें म्हणेति : तुमतें वराडीं आईता म्हणेति : " " आवो धीडरें आणि आणि नां म्हणे : " म्हणौनि कोपु नटले : माहादाइसें वीचारूं लागली : आणि स्फुरलें : मग दुधा आंतु सोजी घातली : ते कालवीली : भीडियासि तुपाचा बोंळा दीधला : वरि लोंगाकृत घातलें : एकी वासना : संकाकृत घातलें : वरि एळा मीरीया लवंगाची पुडी घातली : एकी मवा जालें : मग दुसरीएकडे उलथीलें आणि काढीलें : ताटीं ओळगवीलें आणि वीलक्षेण देखिलें : आणि म्हणीतलें : " ऐया माझा : आतां होए म्हणे : आवो गोड असे म्हणे " मग माहादाइसें हरीखैलीं आणिकें घाढीलीं : ऐसीं गोसांवीं आरोगणा स्वीकरीलि : ॥ ८८ ॥

**माहादाइसाचीं अमृत-फळें आरोगणें** : ॥ एकु दीं माहादाइसीं गोसावियांतें वीनवीलें "जी जी ! मीं आजि गोसावियांलागि अमृत-फळें देइंन जी : गोसांवीं खेळावया बीजें न करावें जी ! :" गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : मग गोसावीं बीजें न करीतीचि : आणि गोसांवीं हरीखु स्वीकरीला : मग म्हणीतलें " आवो ! अमृत-फळें देइल म्हणे : आवो अमृत-फळें खावीं म्हणे : न खावीं म्हणे : आवो खावीचि म्हणे : " तेव्हेळि गोसावियांसि मांचियावरि आसन जालें : मग माहादाइसीं अमृत-फळ केलें : मग ताट केलें : वाटी भरूनि तुपा ठेविली : ताटीं अमृत-फळें ओळगवीलीं : गोसांवीं ताटावरि बीजें केलें : आसनीं उपवीष्ट जाले : ताट कृपादृष्टी अवलोकीलें : आणि गोसांवी म्हणीतलें : " आवो मेली जाए : तावि तावि म्हणे : " मग माहदाइसीं म्हणीतलें "जी जी ! तुप तरि सघस्त असे जी ! कांबळा गाळीलें असे जी ! " " तावि तावि म्हणे : " म्हणौनि कोपु नटले : आणि माहादाइसीं भीयाली : वाटी धरू बैसली : आणि गोसावी " आवो ! काया काया भीतासि : आवो ए ए तावि " म्हणौनि गोसांवीं श्रीकरें दाखवीलें :

आणि माहादाइसा स्फुरलें : सगडी केली : नवें सराउं सगडेवरि ठेवीलें : वरि चोखट फाळोकें घातलें : तयावरि अमृत-फळें उन्हें करीति : आणि ताटी वोळगवीलें : मग गोसांवीं " अया माझा : आतां होए म्हणे : आवो बळुबुळा : आवो थुळथुळी : आवो गुळगुळी : आवो मेली जाए : गोडें अमृत म्हणे : आवो मेली जाए : गुळु आहे म्हणे : " ऐसी गोसावियांसि आरोगणा : ॥ ८९ ॥

**माहादाइसीं रंग-माळीका भरणें** : ॥ जया वाटा गोसांवी खेळावया बीजें करीति म्हणौनि माहादाइसें बीदी गोदरींया झाडेति : सडा घालेति : उतरीलीए दारवठेया आंतु : चौक रंग-माळिका भरीति : पुढें दाटा भरीति : दाटें पद्में रेखीति : तवं गोसांवीं बीजें केलें : खेळौनि बीजें करीति : रंग-माळिका चुकोनि श्रीचरणु ठेवीति : तवं पुढें दाटा रंग-माळिका असेति : मग माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी ! आतां जाइजो : आपुलेनि ऐश्वर्यें :" कदाचीत भट म्हणति : आणि गोसावी हास्य स्वीकरीति : मग श्रीचरण देति : बीजें करीति : ऐसें जवं माहादाइसें होती तवं प्रतीदीनीं करीति : ॥ ९० ॥

**टोंकणया घरीं मारणें** : ॥ गोसावी अनुकारूं करूं लागले : "आवो सनिवारीं न्हावें म्हणे : आवो बुधिवारीं न्हावें म्हणे :" ऐसे अनुकारु करूं लागले : ते आइकोनि माहादाइसीं वाटी-भरि तेला हातीं घेतली : न पुसत गोसावियांचा श्रीमुगुटीं तेल ओळगवीलें : आणि गोसांवीं कोपु नटले : ते वाटी श्रीचरणें हाणीतली : आणि गोसांवीं बीजें केलें : मागेचि माहादाइसें नीगाली : तवं दादोस माहाद्वारीं भेटले : दादोसीं म्हणीतलें " रुपै ! रुपै ! ओखटें करीत असा : जेणें श्रीप्रभुची प्रवृत्ति भंगे तें तें करीत असा : जेणें नरका जा तें तें करीत असा : एथ काइसया आहा ? नरका जावेया ? " माहादाइसीं म्हणीतलें " दादो ! तुम्हीं उगे असा हो : फाटका पाओं सो नका : गोसावी उदास जाले ते एक : आणि तुम्हीं कोपतां तें दुसरें :" आणि गोसांवीं तैसेचि टोंकणयां(चेया) आवारासि बीजें केलें : ओसरीएवरि रीगतां डावेया हाता (भीतीसीं) उकड आसन : तवं मागिला कडौनि माहादाइसें गेली : तीयें उर्जावेनि सीहाडेनीसी दीनवदनें उभीं राहीली असेति : गोसावियांचीए श्रीमुगुटींचें तेल नीतळों लागलें : तें श्रीकरें भीतीसी पुसीति : तवं माहादाइसें वीनवीलें : " जी जी ! आमचे गोसांवी

म्हणीतलें करीति : वीनती स्वीकरीति : सेवा करूं देति : जी जी ! तरि मीं पुसुं जी : ! " " आवो ए ये नां म्हणे : पुसि नां म्हणे : " माहादाइसें गेली : कासवटा दीधला : श्रीमुगुट चोपडुं लागलीं : तवं टोंकणयाची ब्राह्मणि सोनाइसें : तींयें वाटीभरि तेल घेउनि आली : मग जाडी घेउनि आलीं : तवं माहादाइसीं म्हणीतलें : " जी जी ! आसन रचुं दीजो जी ! : " मग माहादाइसें आसन रचीलें : मग सम–स्तळ आसन जालें : मग सोनाइसीं म्हणीतलें : " आइ ! डेराभरि पाणिया तापतु असे : आइ ! ती चोखनीं असे : " तें तेल माहादाइसीं श्रीमुगुटीं घातलें : डोळां घातलें : कानीं घातलें : मग गोसांवी एकु एकु श्रीकरु दोनि दोनि वेळ देति : एकु श्रीचरणु दोनि दोनि वेळ देति : तव माहादाइसीं सुखानंदु होए : मग गोसांवी म्हणीतलें " आवो मेली जाए : आतां होए म्हणे :" ऐसी मर्दना जाली : मग माहादाइसीं भट्टातें म्हणीतलें : " नागदेया ! जाए : तेया डेरेयाखाली जाळु घाली : " भट गेले : तेया डेरेयाखालि जाळु घालीत असेति : माहादाइसीं मर्दना दीधली : डेराभरि पांणीं सोनाइसीं ठेवीलें होतें : तेणें मादनें होत असे : भटातें म्हणीतलें : " नागदेया ! तो डेरा घेउनि ए हो " मग भट गेले : तवं तो डेरा काठासहीत तापला असे : भटाचेनि तो डेरा नाणवेचि : मग मागुते आले : "रुपै तो डेरा थोरु तापला असे : " माहादाइसीं म्हणीतलें " नागदेया तु गुडु ( गाडु ) ढाळि : मीं जाइन " मग माहादाइसें गेली : चुलीचा उबाळा काढीला : तो वीझवीला : चुंभाळि चीखलें माखीली : तळहातावरि घेउनि आली : तीए डेराचें पाणीं : ऐसे दोहीं डेरीयाचेनि पाणीयें गाडु ढाळीला : ऐसे मादनें जालें : मग माहादाइसीं पीवळाए पाजणीचा साउला ओळगवीला : मग सोनाइसाचीं लेंकरुवें जीति नां : ते मृत–वांझ : तयासि गोसावी पडदणी दीधली : गोसांवी म्हणीतलें : " आवो घे घे नां म्हणे " म्हणौनि डावीए श्रीचरणीचेनि आंगुठेनि तीएवरि घातली : मग माहादाइसें मागों बैसलीं : " पडदणीं दे ओ " तीया म्हणीतलें " हें काइ वो जालें : आमचां राउळीं मज पडदणी दीधली : मीं काइसेया देइंन : " तीयेसि तीयेचि दीसी गर्भसंभुति जाली : नवा मासा तो पुत्र जाला : तेथ गोसांवी बीजें केलें : नाळातें गोसावी म्हणाति "आवो नाळ होए म्हणे : आवो सापु होए म्हणे : आवो नाळु होयें म्हणे : " मग नाळ खांडीलें : मग गोसांवीं पेवावरि बीजें केलें : " आवो सात खांडीया वेचावीया म्हणे : पांच खांडीया वेचावीया म्हणे : रीधौरे जेववावें म्हणे : बेलौरे जेववावें

म्हणे चौ गाउ जेववावा : म्हणे नेजवात्रा म्हणे : आवो जेववावाचि म्हणे :" म्हणौनि पेव श्रीचरणें करुनि दाखवीलें : मग तीहीं बारसें केलें : रीधौरें बेलौरें जेववीलें : चौ गाउ जेववीला : आउघा लोकु जेवीला : परि सोनाइसें न जेवीतीचि : घरीचा म्हणीतलें : " आवो तु जेवासि नां कां ? " तीया म्हणीतलें : " राउळ एति : मग जेवीन : तयाचीए पांतीसि : " तीहीं म्हणीतलें : " आत्रो ! राउळ वेडे : राउळ पीसे : ते काइ एति ? तु जेवि : लेंकरुवासि दुध कडु होइल :" "नां नेजवी :" तवं गोसांवीं बीजें केलें : मग गोसावियांसि सीरा ताट केलें : आरोगणा सोनाइसा मुख्य करुनि एरे आवघीं गोसावियांचीए पांतीसि जेवीली : तो पुत्र सतायु जाला : तयासि जरु ताओ नाहीं : खोकला पडसा नाहीं : कोणे व्याधीचा उपद्रो नाहीं : मग गोसांवीं बीजें केलेयाउपरि आपुलीए अनुभवाचीया लीळा भगतीजनापुढे सांघति : ॥ ९१ ॥

**अल्प गुळु मोदक अनुवादु** ॥ : माहादाइसीं लाडु केले : ते नावेक वाळो घातले होते : ते ऊच-मढा पसीमे भानवसा पुढा घातले होते : तेथ वीळीचीये वेळे गोसांवीं बीजें केलें : मग गोसांवी म्हणेति : "आवो या लाडोवांसि गुळु पुरला : यासि न पुरेचि : आवो हा कठीणु जाला : हा मोकळा जाला : हा नीका नव्हे : " ऐसे म्हणौनि श्रीकरें स्परीसीलें : ऐसा खेळु केला : मग बीजें केलें : ॥ ९२ ॥

**चोर-नेत पटी अनुवादु** : ॥ आबैसें दाइंबा पैठणीहुनि आली : गोसांवीं श्रीप्रभोचेया ठाया पाठवीली होति : आबाइसीं पासवडीची पाटी वाळत घातली होती : गोसावियासि रीगतां डावेया हाता पटिसाळेवरि आसन असे : ते पाटी नेणों कोणें नेली : तवं आबाइसें पाहों लागलीं : ते नेदखतीचि : तवं गोसांवी म्हणीतलें : " आवो ! तुमची पाटी चोरें नेली : " आबैसीं म्हणीतलें जी जी ! नेवो कैसी दीधली ?" आणि गोसांवीं हास्य स्वीकरीलें : ॥ ९३ ॥

**दाइंबा मौन वीधि नीरोपणें** : ॥ मागां आमचा गोसांवीं म्हणीतलें होतें : ' मोजेया ! रीधपुर म्हणजे कासीं निवासु : तेथ काम क्रोध भोगु न एतीचि : हींसका नींदका गोष्टी करु न एतीचि : तेथ तुम्हीं मौनें असांवें हो ! " मग मौनें असेति : एकु दी बडलेया दक्षीणें गोसांवी उभे असेति :

तवं दाइंबा आले : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : ते तेथ मौनें असेति : तयांसि मुख-पाकु जाला : मग आबाइसें कांजी उकळी : ते गुळुळीया सांडीति : ते एकु दीं गुळुळीया सांडीऊीया : गोसावियांसि भीतरि राजमढा आंतु आसन असे : मर्दना देतें कोणी नांहीं : मग गोसांवीं म्हणीतलें " आवो ! तुं उपकरसी ? " दाइंबायें म्हणीतलें : " जी जी ! मी नुपकरें : " तवं आबाइसीं म्हणीतलें " जी जी ! हा बोलीला : " आणि तयाचा मुख-पाकु गेला : मग गोसावियांसि मर्दना देवों लागले : मग मादणें जालें : ॥ ९४ ॥

**ब्राह्मणा सुवर्ण-दान देणें** : ॥ एकु दीं गोसांवी नीकळंकाचा देउळीं खेळेति असेति : तवं ब्राह्मणु एकु आला : तेणें स्वस्ती-वचन केलें : मग म्हणीतलें " एजमाना ! कन्या उपवर जाली असे : वीहवावो करावया कांहीं नाहीं : तरि कांहीं द्रव्य होआवें : " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए " म्हणौन देउळा उतरे बीजें केलें : स्वर्णी खालि श्रीचरणीचेनि आंगुठेनि करुनि उकरीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो घे घे घे नां म्हणे " म्हणौनि दोणि आंजुळी तयाचिये ओटींय घातलीया : मग म्हणीतलें : " आवो मेला जाए जाए नां म्हणे : " म्हणौनि लोटुनि घातला : तो जावों लागला : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ९५ ॥

**गर्धवातें भुंक म्हणणें** : ॥ मढा बाहिरि नृत्य कोणी जगतींचा कमळेश्वरा दक्षीणे गाढव मेलें पडीलें होतें : तेथ गोसांवीं बीजें केलें : तयातें गोसांवीं श्रीकरें स्पर्शीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो उठि उठि : भुंक भुंक भुके नां म्हणे : " आणि तें उठीलें : भुंकत भुंकत गेलें : आणि गोसांवीं हास्य स्वीकरीलें : ॥ ९६ ॥

**गुळुदरसनि म्हाइं भटां भेटि** : ॥ म्हाइंभट सराळाहुनि भावैचां चतुर्दसीं आले : पाटांउ दुटी पांगुरले होते : ते एका ब्राह्मणासि दीघली : तयाची घोंगडी आपण घेतली : ते सतरा दीसां रीधपुरासि आले : ते वाटे सीराळां पासवडीची पाटी आठें दांमीं वीकीली : तेथ एका दांमीयांची पाटी घेतली: सातां दांमांचा गुळु घेतला : मग रीधपुरासि आले : तव श्रीप्रभु गोसावियांसि तीकोपाध्याचीए आवारीं अवस्थान असे : आंगणीं वेढे करीत असेति :

तेवींचि म्हणेति : " आवो मेला जाए : म्हांइंयां यइल म्हणे : गुळु आंणील म्हणे : गुळु खावा म्हणे : ना खावा म्हणे : आवों खावाचि म्हणे : " तैसेचि पटीसाळेवरि गोसावीं बीजें केलें : वोटेयावरि आसन जालें : आंणि श्रीदोंदाकडे अवलोकुं लागले : श्रीकरीचीया आंगुळीया करूनि रेघा काढीति : ऐसे अनुकार करूं लागले : तवं म्हांइंभट दक्षीणीलेनि दारवठेनि आले : दारवठेया आंतु रीगतां मांगु भेटला : तयातें म्हांइंभटीं पुसीलें : " श्रीप्रभु कवणीं ठांइं राज्य करीत असेति ? " मातांगें म्हणीतलें : " हें नव्हे : आतांचि एथ खेळत होते : " ऐसेंचि तीकोपाध्याचेया आवारासि बीजें केलें : तो गावां बहीरि नींगाला : म्हाइंभट गावांतु गेले : तो पाठिमोरा जाला : आंणि म्हाइंभटीं साष्टांग दंडवत घातलें : मग तीकोपाध्यांचेया आवारासि आले : श्रीप्रभु गोसावियांसि दर्सन जालें : गुळाची पांटी दरिसना केली : सोनेसळा फुटा ओळगवीला : मग दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसावीं म्हणीतलें : " मेला जाए : आतां होये म्हणे : " म्हणौनि श्रीकरीं गुळु घेतला : श्रीमुखीं घातला : खावों लागले : " आवो मेला जाए : गोड आहे म्हणे : " म्हणौनि दुसरेनि श्रीकरें भेली श्रीमुखीं घातली : आंणि आरोगुं लागले : ते श्रीमुखुनि ओघळु नीगेति : तें खाड माखे : दोंदावरि गळे : ऐसा गुळु आरोगीला : म्हाइंभटासि प्रसादु दीधला : तव आबाइसें जेवीतें होतीं : तीए लवकरि आंचवली : बाहीरि आली : " जी जी ! : पुरे कीजो : पोटु दुखैल : " म्हणौनि आबाइसीं दुरडी भीतरि नेली : मग उदक आणिलें : गोसावियांसि गुळुळा करूं घातला : श्रीदोंद प्रमार्जीति : मग आबाइसीं पुसिलें : " भटो ! कवणीं ठाउंनि एत असा ? : " म्हांइंभटीं म्हणीतलें : " मी सराला होउनि आलां : " मग आबाइसीं म्हणीतलें " आंमचे गोसावी कवनीं ठाइं राज्य करीत असेति ? " मग आबैसीं पाये धुतले : भीतरि ठाओ केला : " भटो ! या : भीतरि ठाओ केला असे : " मग म्हांइंभट जेवीले : आंचवले : मग म्हांइं-भटीं आबाइसासि दंडवत घातलें : " मज चुलीची राख-पुंजा सांडुं देयावा : " मग म्हांइंभट गोसावियांचें सेवा-दास्य करू लागले : ॥ ९७ ॥

**वांकीय-वेसी क्रीडा** : ॥ उदीयांचि गोसावी उठीति : दुडु-दुडु-करि धांव घेति : वांकीय वेसि पासि उभे राहाति : तवं ते घातली असे : श्रीकरें

भुआगळ उघडीति : वेसि लोटीति : तवं चाक करकरा वाजे : आणि वेसिमार्गे जाति : " आवो मेला जाए : बोबातें म्हणे : " म्हणौनि मागुती लोटीति : आणि चाक मागुतें वाजे : " आवो मेली जाए : नको नको बोबावों : " म्हणौनि श्रीचरणें हाणेंति : हास्य स्वीकरीति : वेसीचेया घोडेयासि खेळु करीति : खादु थापटीति : मग बीजें करीति : ॥ ९८ ॥

**नरसींग दरणेयां भेटि** : ॥ रांम दरणेयाचा पुत्र नरसींग दरणा : तो रीधपुरासि आला : तवं गोसांवी खडखांबला खेळतु असेति : तयाचें दुस रामंनाथापुर्वे दीधलें : तवं गोसावियांते तेणें देखीलें : मग तेणें पाइकाची चीरणी चीरिली : वेलें लाउनि रामनाथा इसान्ये भेटि जाली : दुधासि घेउनि गेला : तेथ दंडवत घातलें : श्रीचरणा लागला : मग ( गोसांवी ) तयाचीए कदीवांचा चीरा कादिला : एकी वासना : बांकुवा कादिला : आणि तयाकडे अनुकारू दाखवीला : तेणें श्रीचरणावरि डोइ ठेवीली : " जी जी ! एहीं श्रीकरीं होए तरि मी काइ पाहातें : " मग गोसांवी हास्य करूनि चीरा ठेवीला : मग पडदणीं दीधली : मर्दना मादणें जालें : बरवी पुजा केली : पाटांउ त्रीवडि वोळगवीली : एकी वासना : नांही : मग आरोगणा जाली : गुळुळा वीडा जाला : मग बीजें केलें : ॥ ९९ ॥

**कोळवीहीरीचा कांटा मोडणें** : ॥ एकु दीं गोसावियांसि ताट जालें : ताटीं उपवीष्ट जाले : आणि तैसेचि ताटावरुनि बीजें केलें : चरणचार्य धांव घेतली : मागीला कडुनि भगत-जनीं धांवं घेतली : कोळवीहीरीचेया वेसी दारा समीप बाबुळ होती : तेथ गोसांवीं बीजें केलें : तीचा कांटा श्रीकरें मोडीला : मग म्हणीतलें : "मेला जाए : हा तो नव्हे म्हणे : आवो होयचि म्हणे :" म्हणौनि मोडौनि टाकीला : " आणि परतले : मग गोसांवीं बीजें केलें : मग एउनि आरोगणा केली : ॥ १०० ॥

**अपान-वायो नीर्गमनीं कटी गाळि देणें** : ॥ गोसांवीं पुर्वीलेनि दारवठेनि बीजें केलें : परसरामां समींप इसान्ये आपान-वायो सरला : आणि गोसांवीं म्हणीतलें : " मरतुं मरतुं फेंडि : बोबातुसि कां :" म्हणौनि फेंडेवरि हाणीतलें : " आणि हास्य केलें : मग बीजें केलें : ॥ १०१ ॥

**वेद-परायण घटु भंगणें :** ॥ एकु दी नव-चंडीसि माहाजनीं उंचमढीं घटु मांडीला : रींगतां उजवे हातां पटिसाळेवरि दोहीं खांबांमधीं नव धान्यें पेरीलीं : फुलौरा बांधला : माळ लावीली : आंडोर एक राखण ठेवीलें : आपण नीगौनि गेले : तवं गोसांवीं वीहरणौनि बीजें केलें : तें देखौनि गोसांवी कोपु नटले : तयापासि बीजें केलें : श्रीचरणें हाणौनि घटु खालि पाडीला : मग फुलौरा : आवघे ऐसें वीध्वंसीलें : आणि लेंकरूं थापा हाणीतलें : तें बोंबात माहाजनापासि सांगावेया गेलें : मग माहाजन भगत-जनासि सवीया देत आले : " आमचे राउळ ऐसे नव्हेति : ए सीवर्नीयें आलीं : एहीं आमचे राउळ नासिले : (चाळवीले) : ऐसे माहाजन भगती-जनासि सवीया देति : ॥ १०२ ॥

**दामूतें वीनवणीं स्वीकारू :** ॥ एकु दी भट म्हाइंभट देउळवाडेयासि दामुतांपासि सांगावया गेले : भटीं म्हाइंभटीं दामुतांसि म्हणीतलें : " दामुतो ! गोसांवी तुमचया गावांसि बीजें करूं पाहात असेति : " दामुतें म्हणीतलें : " माझें दैव भाग्य : " मग दामुतें गोसावियांते नेयावया आला : दांडी डोळिकारु : राउत : पाइक : ऐसे गोसावियांतें आणावया नीगाला : गोसावियांसि सर्वांगीं चंदनाची भोरि : कस्तुरीचा आडा : वरि मोतींयाचा टीळा : वांकि : सांखळें : सोनेसळा : नेसले होते : मग आबाइसीं गोसावियांते वीनवीलें : " जी जी ! बीजें कीजो जी ! : माहाजन भगत-जनांसि सवीया देत असेति जी ! " गोसावी वीनती स्वीकरिली : मग भगत-जनीं वेलें लावीलें : गोसांवीं मागें पुढें पाहाति : चवकत बींबत मंद मंद श्रीचरण देति : गोसांवी म्हणाति : "आत्रो गांवचेरीं गांवचेरी म्हणे : " आबाइसीं म्हणीतलें : " जी जी ! नव्हेति जी ! दामुतें नेयावेया आला असे जी ! " भगत-जनें म्हणेति : " गोसांवी आतां कैसे दांडीए बैसति ! " भगत-जन भेवों लागले : तवं पाइरीयांखालि बाहीरि दामुतांसि भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग दांडीए वरि आसन जालें : पाग धरीली : दांडीये बैसतां दामुतें म्हणीतलें : "आरे आतां वाजांत्रें लावा :" मग डोळीकारीं म्हणीतलें : " बहुती धुरा देखीलीया : परि ऐसी धुर बैसों नणे :" मग वाजांत्रें लावीलीं : मग गोसांवीं देंउळवाडेयासि बीजें केलें : ॥ १०३ ॥

**देउळवाडेया बीजें करणें :** गोसावी मागें बीजें करीत असेति : दांडीएवरि आसन : वाजांत्रें लागलीं असेति : पुढें दामुतें हातीं वोडन-खांडे

घेउनि धांवतु असे : तळेया पसीमे : गोसांवीं म्हणीतलें : “ आवो मेला जाए : (घोडेया) बैस बैस बैसे नां म्हणे : ” म्हणौनि दांडी उभी केली : मग तो घोडेयावरि बैसला : मग बीजें केलें : माधांनीं गावांपुर्वे दांडीय खालि उतरौनि देवतेसि बीजें केलें : देवतेसि खेळु करूनि मग दांडीए बैसोनि बीजें केलें : ॥ १०४ ॥

**नगर-स्त्रीयां वोवाळणीं** : ॥ मग नगर श्रींगारीलें : वेसि-दारीं तोरण बांधलें : हाटवटीए बीदी गोदरीया मखरें केलीं : घरोवरीं गुढीया तोरणें पताका फरारे : तवं गोसांवीं बीजें केलें : वेसि-दारीं बाहीरि नदी-पुर्वे माहाजन साउमे गेले : बडाचीए दक्षीणीली पालवी माहाजना दर्सन जालें : वेसि-दारीं सामान-स्त्री वोवाळीलें : हाटवटीए नगर-स्त्री वोवाळीलें : मग देउळापुढें दामुर्ताचीया राणीयां वोवाळीलें : जगती आंत दारवठेया समीप ब्राह्मण-स्त्री वोवाळीलें : मग प्रतीमठीं अवस्तान सा-मास जालें : ॥ १०५ ॥

**प्रतिमठीं अवस्तान** : ॥ मग गोसावियासि रीगतां डावेया हाता पटीसाळेवरि आसन जालें : तेथ बहुतांचीया स्त्रीया वोवाळावया आलीया : मग आबाइसीं पाक नीहपति(नीष्पति)केली : मग गोसांवीयांसीं मर्दनां मादणें जालें : भीतरि पुजा-अवसरु जाला : आरोगणा जाली : समस्ता पांति जाली : ॥ १०६ ॥

**पेखणें अवलोकीतां नाचणीं चुकी सांगणें** : ॥ गोसावियासि नरसींहाचा चौकी आसन जालें : पेखणें होत असे : नाचणीं नाचतां ताल चुकली : ते कव्हणीचि नेणें : तें गोसांवीं जाणतीलें : मग म्हणीतलें : “ आवो मेली जाए : चुकली म्हणे : एथ चुकली : ” ते म्हणे “ जी जी ! चुकलीयें जी ! माझीए कळे प्रमाण कव्हणीचि नेणे जी! : तें गोसांवीं जाणीतलें जी ! माझेया दैवमाग्यासि उदो जाला : जें गोसांवीं माझीय कळेसि रूप केलें :” मग गेली :॥१०७॥

**दामुर्ते स्तुति करणें** : ॥ गोसावियासि रीगतां डावेया हाता पटिसाळेवरि आसन असें : एकी वासना : भीतरि : तवं दामुर्त आला : गोसांवियांसि दर्सन जालें : मग दंडवत घातलें : श्रीचरणा लागला : मग गोसावियांपुढें माडखुटी घालूनि बैसले : मग स्तुति करूं लागले : “ जी जी ! माझें दैवभाग्य जें गोसांवीं एथ बीजें केलें : आंजि माझें सुकृत फळासि आलें : ” ऐसी स्तुति केली : मग उगेचि बैसले : ॥ १०८ ॥

**तथा नारीएळें दामुतातें हाणणें : भट माइंभट संबोखु : ॥** मग गोसांवीं दामुतोसि पाठवणीं दीधली : परि तो उगाचि बैसला होता : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : जाए ना म्हणे : " एकु वेळ पाठवणीं दीधली : दोनि वेळ दीधली : तीसरेनी दीधली : परि तो न वचेचि : तवं भेटीसि नारीएळें आलीं होतीं : ते गोसावियां पुढें असेति : गोसांवी एकु नारीएळ श्रीकरीं घेतलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " मेला जाए : उठि उठि ना म्हणे :" म्हणौनि कोपु नटले : आणि नारीएळें दामुतातें हाणितलें : तो उठीला : घरासि गेला : भक्तिजनीं म्हणीतलें : " तेथ तरि ते केलें : आणि एथही ऐसे गोसांवी काइ करूं लागले ! " म्हणौनि भेवों लागले : मग गोसावियांसि मर्दना मादणें जालें : पुजा आरोगणा जाली : मग पहुडु जाला : मग भट म्हाइंभट पडीताळावया गेले : भट म्हाइंभट आले म्हणौनि दामुतें उठीला : बैसावया घातलें : मग बैसले : मग भटीं म्हणीतलें : " दामुतो ! तुमचें कपाळ कैसें असे ? " तीहीं म्हणीतलें " बरवें असे : हें नव्हे : राउळ आतांचि पडीताळावया आले होते : श्रीकरें कपाळ स्पर्सीलें : मग म्हणीतलें : ' आवो मेला जाए : दुखवला म्हणे : ' ते माझें दुख नीरपौनी गोसांवीं फेडिलें : ' आवो दुखवलासि म्हणे ' म्हणौनि श्रीकरें माथा स्पर्सीला : " मग भटा म्हाइंभटा थोर सुख जालें : मग भटीं म्हणीतलें " गोसावियांसि मर्दना मादणें जालें : पुजा आरोगणा पहुडु जाला : संदि पडीली : मग आम्हीं आलों : " मग दामुतें म्हणीतलें : "हा भटो! आंणीकी आवांचीकां धुरांचां ठांइं पाठवणीं दीधलेया अवसि बैसो न ये : ऐसे जरि तयाचां ठांइं तरि गोसावी पाठवणीं देतां मीं न वचें : एकु वेळु पाठवणीं दीधली : दोनि वेळ दीधली : तीसरेहीं दीधली : परि मीं न वचेंचि : मग गोसांवी सीक लावीली : माझी खोडी सांडवीली : " ॥ १०९ ॥

**कुमारी भानवसीं आरोगणा : ॥** नव-चंडीसि तीही कुमारी आंवंति-( लि )या होतीया : तेथ गोसांवीं बीजें केलें : तेथचे पाक चाखेति : ऐसा अवघाचि प्रसादु केला : मग एथोचित आरोगणा केली : मग गळदंडे बांधेति : कुकु संदरूतें लावीति : मग गोसांवी म्हणाति : " आवो मेली जाय : हे नोवरी होए म्हणे : आवो हे नोवरी होएचि म्हणे " म्हणौनि नावेकु खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ ११० ॥

**नरसींहाचे परीयळु चाखणें** : ॥ नरसींहासि बोनीयाचे सात परीयळ यति : गोसांवी सोंडीएवरि रीगतां उजवया हाता उभे राहाति : ते सातै परीएळ चाखेति : मग नरसींहासि जाति : मग एकु दी गोसावियातें चोरुनि नेले : मग तयासि रात्रीं नरसींह स्वप्नीं आला : "आजि राउळ परीयळ न चाखतीचि : म्हणौनि मज उपवासु पडीला :" ऐसें स्वप्न देखीलें : उदीयाचि परीएळ भरीलें : गोसावियापासि आंणीलें : मग गोसावियातें वीनवीलें : परि वीनवणी न स्वीकरीतीचि : न चखतीचि : ॥ १११ ॥

**नरसींहासि खेळु** : ॥ एकु दी गोसांवीं नरसींहापासि बीजें केलें : मग श्रीकरें स्पर्सीलें : मग नरसींहाचां तोंडीं आंगुळीया सुति : मग म्हणेति : "आवो खाइल म्हणे : न खाये म्हणे : आवो हांसैल : न हांसे म्हणे : आवो बोलइ(लै)ल म्हणे : न बोले म्हणे :" ऐसा गोसांवीं नाएकु खेळु केला : मग बीजें केलें :॥११२॥

**वाघीका सींगीका म्हणणें** : ॥ एकु दी गोसांवीं वाघीकेचीया देउळासि बीजें केलें : मग वाघीका श्रीकरें स्पर्सीली : गोसांवीं तीसि नांव ठेवीलें : "आवो हे वाघीका : हे सींगीका : कीं हे वाघीका :? आवो मेली जाए हे वाघीकाचि म्हणे :" ऐसा गोसांवीं खेळ केला : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ ११३ ॥

**कृतसौचीं सौच करणें** : ॥ एकु दी गोसावी परसयासि नदी-पसीमे बीजें केलें : मग परसयो साल्हानि मृत्तीका घेतली : मग थडीसि बीजें केलें : एथोचीत सौचु केला : मग ब्राह्मणीं म्हणीतलें : "आगा इतीके दीस सौचु केला तो वावों : आतां राउळे सौचु केला तो साच :" मग बीजें केलें : ॥ ११४ ॥

**केसव-नाएक वीठल-नाएक वीनती स्वीकारु** : ॥ मग कटकौनि केसव-नाएकां वीठल-नाएकासि नीरोपु पाठवीला : जें "रीधपुरीं राउळेवीण अरीष्टें उठीताति : एकासि ज्वरु येताति : एका खोकले लागताति : एका खतें खाडुकें होताति : एका कुष्टें लागताति : एका खरुजा लागताति : एके स्फोटेनि हुंबताति : एकें मरताति : ऐसा आवघा लोकु पीडा भुतला :" ऐसें केसव-नाएकें वीठल-नाएकें ऐकीलें : सांघौनि पाठवीलें : जें "गावीं मढ-मंडप देउळें असतां राउळासि बीढार कैसे नाहीं ? : राउळ आंणावे :

एक स्वतंत्र बीदार देयावें : गावीं ओरपें दरडे पडों लागले : खांणें पडों लागलीं : ज्वरु-तापु लागले : खरुजा लागलीया : माणसें मरताति : राउळेवीण आम्हासि अरीष्टें ऐसीं वीघ्नें पात्रताति : " मग माहाजन देउळवाडेयासि आले : प्रतिमठीं भेटि जाली : मग आड पडीले : मग गोसांवीं आंतु रीगति : बाहीरि नीगेति : हरीखैजेति : आंणि म्हणेति : " आतां जाइजैल म्हणे : न वचांजैल म्हणे : आवो आतां जाइलचि म्हणे : " म्हांइंभटीं म्हणीतलें : " आम्हासि मढु मढुलीया वीकत देयाल ? : आमचीए सतेचा करावा " " नां : हो कां : " मग साटि आसु चौथरीया म्हांइंभटीं दीधलीया : म्हांइंभटीं तांबेयाचें पत्र केलें : मग तेथ गोसांवीं बीजें केलें : ॥ ११५ ॥

**दारवठा नीबंध** : ॥ मग चाऱ्ही दारवठे घातले : मग खीडकीयाहुनि रीगेति : नीगेति : व्यापारु करीति : तैसेचि गोसावी मागिला कडौनि खीड-कीया बीजें केलें : आंणि रीधपुरीचीये वाटे धांव घेतली : मागीला कडौनि भटीं धांव घेतली : नदि पैलाडि वडा समीप उतरले : भट आड पडीले : "जी ! जी ! गोसांवीं रीधपुरासि न वचावें जी ! " " आवो हरी मां : उठि उठि म्हणे : " म्हणौनि गोसांवीं वीनवणी स्वीकरीली : मग बीजें केलें : ॥ ११६ ॥

**दामुर्ते वीनवणी स्वीकारू** : ॥ मग दामुतें गोसांवियांतें वीनवीलें : " दवणेयाचें पर्व करांवें : मग गोसांवीं बीजें करावें जी! : " गोसांवीं वीनवणी स्वीकरीली : मग परवाचां दीसीं दामुर्ते गोसांवियांतें भगत-जना सहीत आवा-रासि घेउनि गेला : मग गोसावियांसि पडदणीं दीधली : मग मर्दना मादणें जालें : दवनां वाइला : मग वस्त्र वोळगवीलें : बरवी पुजा केली : आवघीया भक्तीजनां वस्त्रें वाइलीं : मग आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा वोळग-वीला : तेथचि पहुडु जाला : मग उपहुडु जाला : पुर्वीली सीरा उतरामुख घोडवडि : घोडवडी पसीमीला सीरा अडु होता : तो अवलोकीला : ॥ ११७ ॥

**कुमारी भानवसी आरोगणा** : ॥ नव-चंडीसि कुमारी आवंतलीया होतीया : तेथ गोसांवीं बीजें केलें : तेथचे पाक चाखेति : मग म्हणेति : "आवो मेली जाए : हें गोड असेति : हें नाहीं : हें आलोनी : हें खारट : हें तीखट :

हें मधुर : हें मधुरांबील : हे होए म्हणे : '' म्हणौनि आरोगणा करीति : मग एथोचित आरोगणा : मग कुमारी जेवीलीया : ॥ ११८ ॥

**कमळा-रांणीएची वीनवणीं स्वीकारू :** ॥ मग गोसावियासि उपहुडु जाला : अडा पसीमे उभे असेति : तवं कमळा रांणीं आली : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागली : म्हणीतलें : "जी जी ! आजि गोसांवीं राहात्रें जी !: एकु दीसीं गोसावियांचां ठाइं पर्व करीन : आजि पुनिवेसि न वचावें जी !" मग गोसांवी म्हणीतलें : " आवो मेली जाए : एथ घालि घालि घालि नां म्हणे : " तीया म्हणीतलें : जी ! जी ! गोसावी म्हणताति : तरी घालीन जी !" आंणि गोसांवी हास्य केलें : वीनवणीं स्वीकरीली : मग तीया बरवी पुजा-द्रव्यें आंणीलीं : उत्तम चोखट पदार्थ आंणीले : गोसांवियांसि बरवी पुजा केली : मग आरोगणा जाली : मग गोसांवीं पाडीवेयाचा दीसीं रीधपुरासि बीजें केलें : ॥ ११९ ॥

**वोवरां अवस्थान ॥ (सर्पभये निमित्यें राजमठीं अवस्थान :॥)** मग म्हाइंभटीं मढु वीकत घेतला : परि गोसावियांसि असावेयाची प्रवृति नाहीं : मग वोवरां अवस्थान जालें : मग एकु दी फुलाचेनि परीमळें तेथ सर्पु नीगाला : तो भगत-जनीं देखिला : मग धरावया चीपा केलीया : भगत-जनीं म्हणीतलें : " धरतां श्रीमुर्तिवरि पडैल : " म्हणौनि माचाचि चहु माचवा धरीला : उचलुनि बाहीरि काढीला : गोसांवीं म्हणीतलें " आवो मेला जाए : चांग बोला : " म्हणौनि राजमढीं घातला : तेथ अवस्थान जालें : मग तो सर्पु भगत-जनीं बाहिरि घातला : ॥ १२० ॥

**पाहालें म्हणणें :** ॥ एकु दीसीं गोसांवीं माचेयावरि पहुडले असेति : मग पस्यात पाहारीं गोसावियांसि उपहुडु जाला : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! पहालें वो पाहालें : " आबाइसीं म्हणीतलें : " जी ! जी ! देव कोंकीरासि पाहालें जी ! : " तवं माहादाइसीं उमाइसीं म्हणीतलें " हें काइ ओ जालें : यांचयाचि वांटेयां देवो आला आंणि काइ ? : एहींचि सेवा दास्य करावें : आंणि आम्हीं काइ न करावें ?: " म्हणौनि करूं रीगालीया : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! आवो ! खोडी काइ मेली ? : " आबाइसीं म्हणीतलें :

" जी जी ! न मरे जी ! : देवे देओ दीधला : तो रूपैया उमैया हीरतला : " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो ए ए ए नां म्हणे : माहादी फेंदी दमेंयाची दर्भी : " मग आवाइसेंचि करूं लागलीं : ॥ १२१ ॥

**आबाइसां वस्त्र घेववणें** : ॥ माहादाइसीं गोसावियासि वस्त्र घेतलें होतें : तें जुनें जालें : तें वस्त्र एकु दी पुजा-अवस्वराचीए वेळे आबाइसें नेसलीं होतीं : तें देखौनि माहादाइसीं म्हणीतलें : " हें काइ वो जालें : आंमचें वस्त्र यें काइसया नेसली ? हें आंमचेया गोसावियांचेया श्रीचरणा बुडि घालावया होइल : नांहीं तरि जातयां पाटयां मुसळां गवसनीयां होति : पोतेरीं होतील : " मग तें वस्त्र आबाइसीं फेडीलें : मग गोसावियांसि पुजावसरु जाला : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो ! चांदा जावें म्हणे : पाटणा जावें म्हणे : पुसदा जावें म्हणे : काजळीचें वस्त्र नेसावें म्हणे : पोफळिचें घेयावें म्हणे : सातां आसुचें घ्यावें म्हणे : पांचां आसुचें घ्यावें म्हणे : आसुचि दोनि घेयावीं म्हणे : " तें वस्त्र सवंगें होती मग म्हाइंभट गोदरीय गेले : दों आसुंचीं दोनि वस्त्रें लोहवीं : कुंकु (ऐ)सी घेतली : आंणुनि गोसावियापुढें ठेवीलीं : मग गोसांवीं ऐसा सेओ धरीला : मग म्हणीतलें : " आवो ! नेस नेस म्हणे : " आबाइसीं म्हणीतलें : " जी जी ! मीं वस्त्र काइ करींन ? : मज गोसांवीचि पांगुरण आंणि गोसांवीचि आंथरुण : " गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! नेस नेस नां म्हणे :" मग आबाइसें नेसलीं : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो खोडी वरु-माए होए म्हणे : " मग भटीं म्हणीतलें : " लोण नांहीं जें चींचेसीं खाइजे : परि तुम्हीं ऐसें म्हणाल : आपुलीए मायेसि वस्त्र घेतलें : आंणि वस्त्र तरि आबाइसांसि श्रीप्रभु घेतलें : आंणि आबाइसांसि श्रीप्रभुचीं सेवा कीं " ऐसी भटीं गोसावियाची महीमा नीरूपीली : मग म्हाइंभटीं माहादाइसीं उमाइसीं थोर दुख केलें : ॥ १२२ ॥

**आबाइसां साकर वाढणें** : ॥ एकु दी मढा आंतु आबैसें खाबैसीं बैसोनि जेवीतें होतीं : गोसांवी माचेयावरि पहुडले असेति : इसान्य कोंणीं साकरेचा डेरा भरला होता : श्रीप्रभु गोसांवी माचेयावरुनि उठीले : डेरेयापासि बीजें केलें : पसाभरि साकर काढीली : आंणि आबाइसांचीय थाळां घातली : आंणि आबाइसें बोबाइली : " म्हाइंभटो ! धावां धावां : " गोसांवीं म्हणीतलें : आवो

मेली जाए : काह्यां काह्यां बोबातीसि? : खाय खाय : गोड असे म्हणे : " तवं म्हाइंभट आले : तवं गोसांवीं नेणों कोणसे (माचेयावरि) बैसले असेति : मग म्हाइंभट उगेचि राहीले : ॥ १२३ ॥

**मोगरसुल वोउ(वौ)सांवें म्हणणें** : ॥ एकु दी गोसांवीं आबाइसातें म्हणीतलें : " आवो मेली जाए : मोगरसुल वोउसावें : " ऐसा अनुकार करूं लागले : तें म्हाइंभटासि कळेना : मग म्हाइंभटीं म्हणीतलें : " आबाइ ! मोगरसुल म्हणीजे काइ ? " आबाइसीं म्हणीतलें : " म्हाइंमटो ! गोसांवी रायाचे वोउसें : " म्हाइंभटीं म्हणीतलें : " काइ लागे ? " आबाइसीं म्हणीतलें : " कुंभारासि चीर–चोळी : कुंभारासि पासवडी घालीजे : एकी वासना : पासवडीया आवा पांगुरवीजे : " मग तेतुकेंहीं म्हाइंमटीं केलें : मठासि आवा आणवीला : मग लुटवीला : एकी वासना : तेथाचि लुटवीला : जें दुसरें मडकें ने तयातें गोसांवीं म्हणेति : " आवो मेला जाए : हा चोरु चोरु : तुमचें दुसरें नेतु असे : " आणि तें सांडी : आणि गोसांवीं हास्य स्वीकरीति : ऐसा आवघा आवा माहाजना वाणीयां वेव्हारीयां : दुबळीया समर्था करवीं लुटवीला : परि एक एक भांडें : दुसरेयासि अनोज्ञा नाहीं : ॥ १२४ ॥

**भावै दोवे सींपवणें** : ॥ भावैचां दीसीं गोसांवीं आबाइसातें म्हणीतलें : " आवो मेली जाए जाए : भावै सींपावी म्हणे : न सींपा म्हणे : आवो सींपावीचि म्हणे : लोटी घेयावींया म्हणे : हळादि घाटि करावी म्हणे : उंडा पारु बांधावा म्हणे : मांडा मांडौसेयावा म्हणे : वडे मांडे रांधावे म्हणे : " मग आबाइसीं लोटी घेतलीया : हळादि घाटि केली : उंडे वडे ( मांडे ) रांधिले : मग घेउनि नीगालीं : तवं गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : कांबळेयाचें वैरणें घे घे घे नां म्हणे :" मग आबाइसीं कांबळेयाचें (वैरणें) घेतलें : मग गेलीं : मांडो केला : उंडा पारु बांधिला : मांडा माडउसेइला : हळादि घाटी भावै सींपीली : लोटी फोडीलीया : मग आबाइसीं म्हणीतलें " म्हाइंमटो ! लोटीचा हारा परता ठेवा : मग राहाटावया होती : " मग गोसांवीं म्हणीतलें " आवो मेली जाए : आवघीया फोडी म्हणे :" मग आवघीया फोडीलीया : मग गोसांवीं म्हणीतलें " आवो ! एथ ओ एथ ओ ! दोवै सींप सींपे नां म्हणे :" तें आबाइसासि उमटोचि

नां : मग साधातें पुसिलें " एल्हो ! दोवै म्हणीजे काइ ?" मग साधीं म्हणीतलें " दोवै म्हणीजे हरीयाळी : " मग आबैसें हरीयाळी सींपो बैसली : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : हें नव्हे म्हणे : पांढरी पांढरी सींप :" मग आबाइसीं हळदि घाटि पांढरी हरीयाळी सींपीली : मग मढासि बीजें केलें :॥१२५॥

**आबैसातें पडीताळणें** : ॥ आबाइसाचा वडील पुत्र सारंगपाणिभट ते सरले : तयाचेनि दुखें पोटींची खांच जळताचि असे : तयासि दोहीं देवांचें सन्येधांन ( सन्निधान ) : पर तेथ खांच वीझेचि नां : तीयें एकु दी ओटेयावरि नीजैलीं होती : तेथ गोसांवीं बीजें केलें : मग गोसांवीं म्हणीतलें " आवो मेली जाए : खांच जळते म्हणे :" म्हणौनि श्रीकरू दीधला : स्पर्शीलें : " आवो जळतें म्हणे : न जळे म्हणे : आवो आतां न जळेचि म्हणे :" आबाइसीं म्हणीतलें : " जी जी! आतां न जळे जी ! " ते लागौनि ते खांच जळों राहीली : दुख नीरपौनि गेलें : ॥ १२६ ॥

**खोडी नामं करणें** : ॥ आबाइसाचा एकु हात मोडला होता : मग एकु दी वोटेयावरि आबाइसें नीजैलीं होतीं : तेथ गोसांवीं बीजें केलें : मोडला हातु गोसांवीं श्रीकरें धरीला : खेळों लागले : " आवो! खोडी होए म्हणे : आवो! हातु मोडला म्हणे : आवो ! हा हातु मोडावा म्हणे : न मोडावा म्हणे :" आबाइसीं म्हणीतलें : " जी जी ! न मोडावा जी! : गोसावियाचेया सेवा दास्या उपेगा जातु असे जी !: " गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : न मोडेचि म्हणे : " मग उगेचि राहीले : ॥ १२७ ॥

**आबाइसा प्रतीक्ष ( प्रेक्षित ) भर्टी उदक ओळगवणें** : ॥ एकु दी आबाइसें जेउं बैसलीं होतीं : गोसांवीं माचेयावरि पहुडु स्वीकरीला होता : मग उपहुड जाला : मग उदक मागीतलें : आबाइसें म्हणीतलें : " जाए हो नागदेया ! गोसावियांसि उदक वोळगवी " : " हो कां " म्हणौनि उदक घेतलें : तवं गोसावियांची आगाध श्रीमूर्ति दृष्टि चुंपे नां : मग खांबा आडौनि उदकाचे वाटे वोळगो बैसला : तवं गोसावी न स्वीकरीतीचि : मग आबाइसें म्हणीतलें : " जी जी! स्वीकरीजो जी !:" मग गोसांवीं उदक स्वीकरीलें : ॥१२८॥

**पाठि घासणें** : ॥ एकि वाइल एकलि एकटीक : ते न्हावों बैसे : ते

म्हणे : "राउळ येते तरि माझी पाठि घासते : तवं गोसावी बीजें करीति : तीची पाठि घासेति : पाठि घासों सरे : आणि धुमकेनि पाठिवरि हाणिति : " मेली जाए : पुरे न म्हणे : " मग ते पुरे म्हणे : मग गोसांवीं बीजें करीति :॥१२९॥

**जाणाळाचें उदक-पान :** ॥ जाणाळाचें पांणीं ते हळु : तेथौनि माहादाइसें उदीयाचि कावडि भरूनि आणीति : ते गोसावियांचीय सेवेसि उपयोगा जाए : ऐसें प्रतिदीनीं करीति : तव भक्तजनीं म्हणीतलें : 'तें दुरि :' म्हणौनि माइंभटीं आवघे गावींचीं उदकें तुकिलीं : तवं करड वीहीराचेया ( करंडवाचें ) उदका परीस जाणाळाचें हळु तुकलें : तें गुरुवें ( गुरें ) पांणीं डव्हळीति : म्हणौनि पाहातीय रात्रीं जाति : ते तांब्र कळस भरूनि कावडि आंणीति : मग जाणाळाचें उदक राहीलें : ॥ १३० ॥

**सर्प-द(द)ष्ट माहादाइ रक्षणें** :॥ एकु दी माहादाइसें पाहारा रात्रीं उठीलीं : तांब कळस घेतले : मग गेलीं : तांब कळस भरीले : कावडीसि घातले : घेउनि नीगालीं : तवं पांन लागलें : तैसीचि कावडि घेउनि आलीं : रायांगणीं उतरीली : आणि मुर्छना एउनि पडीलीं : ते समइं गोसावियासि माचेयावरि आसन : तवं आबाइसें बोबाइलीं : " जी जी ! देवकी दासि रुपें सर्पे खादली जी ! : " तैसेंचि गोसांवीं रायांगणासि बीजें केलें : दृष्टि अवलोकीली : वीख नीरपौनि कादलें : मग उठीले : गोसावियासि दंडवत घातलें : श्रीचरणा लागलीं : मग गोसावीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : माहादी सापें खादली म्हणे : की माहादीया सापु खादला म्हणे ? : " ॥ १३१ ॥

**उमाइसां सीक्षापण** : ॥ एकु दी गोसावी उतरडी रींगों गेले : चुलि खवखवीत इंगळ भरीली होती : तवं गोसावियाचा फुटा चुलि आंतु पडिला : तो उमाइसीं वरिचावरि धरीला : आबाइसीं म्हणीतलें : " तुवां काइसेया धरीला वो ? गोसावियांचीया दासी थोडीया धरीतीया असेति ?" मग उगीचि राहीली :॥१३२॥

**तथा उमाइसातें संबोखु :** ॥ एकु दी उमाइसें तांदुळ सडीते होतीं : गोसांवी तयाचीय माथां कांठपरा फोडिला : आणि उमाइसें रडों लागलीं : उमाइसीं म्हणीतलें " एहीं कां मातें मरिलें ? मींयां याचें काइ केलें ? : मी याचे

नासी नां : फोडी नां " म्हणौनि रडों लागलीं : आबैसीं म्हणीतलें : " उमै ! उगी अस : तुझेया करमाचा गोसांवीं नासु केला : " तवं गोसांवीं बीजें केलें : श्रीकरें स्पर्सीलें : मग म्हणीतलें : " आवो ! तुं एथ दुखवलीसि म्हणे : आवो ! उगी उगी उगीं राहे म्हणे :" आबाइसीं म्हणीतलें : " उमै ! तुतें गोसांवी बुझा-वितातिं : दंडवतु करि : " उमाइसीं म्हणीतलें : " हें काइ ओ जालें : मारतेंचि मारिलें : आंणि मींचि दंडवत करी नां : मीयां काइ याची वाटी चोरिली ? " मग गोसावियासि उमाइसीं दंडवत घातलें : बीजें केलें : ॥ १३३ ॥

**वाजेया खीच-पुरिया नवासि म्हणणें :** ॥ एकु दीसीं गोसावियांसि मुत्र गुंतलें होतें : सातत्रे(ळ) उंबरा ओलांडीला : आंडोरा करवीं खडे घालवीले : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! नवसि नवसि ना म्हणे : " आबाइसीं म्हणी-तलें " काइ नवसु जी ? " " आवो ! वाजेया खीचि-पुरिया नवसि : " मग आबाइसीं म्हणीतलें : " वाजेया ! आमचेयां गोसावियांसि मुत्र हो : मग तुज खीच-पुरिया सुइन : " मग गोसावियासि मुत्र जालें : आबैसीं खीच-पुरीया केलीया : एकी वासना : मढीचि करवीले : एकी वासना : गोसांवीं तेथ बीजें केलें : तेथचि मुत्र संखा जाली : मग गोसावियासि तेचि आरोगणा भाक्तिजना पांति जाली : मग गोसावियासि गुळुळा वीडा जाला : मग मढासि बीजें केलें : ॥ १३४ ॥

**संतान बीज कुरु पांडवा :** ॥ एकु दी म्हाइंभट गीता वाखाणीत होते : आपणाचि पदें करीति : आणि आपणाचि अर्थ करीति : आपणाचि सका करीति : आपणचि परीहारु सुति : ' संतान बीज कुरु पांडवा : ' हें पद करीत असेति : तव गोसांवीं बीजें केलें : म्हाइभटीं म्हणीतलें " संतान बीज कुरु पांडवा : " तवं गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेळा जाए : ' नीसंतान बीज कुरु पांडवा : " मग माचेयावरि आसन जाऊें : ॥ १३५ ॥

**ब्राह्मणां कांडि सांगणें :** ॥ ब्राह्मणु एकु कांडि म्हणतु होता : ' धनंजया धनंजया ' तवं गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! मेळा जाए : ' नागु-जया नागुजया ' " : हे फांकि गोसांवीं तयासि सांगीतली : आणि गोसांवीं बीजें केलें : ॥ १३६ ॥

**रुंडमुंड इत्यादि पांडु** ( पाठु ) : ॥ एकु दी " आवो मेला जाए : रुंड मुंड : खापरा खांड : माती मीळे म्हणे : न मीळे म्हणे : " मग गोसावी कोपति : ते वेळि ऐसीया सवीया देति : ॥ १३७ ॥

**मृत्य सोभागें बोलावणें** : ॥ सोभागें सरलीं : भटीं म्हणीतलें : " नीक्षेपु करूं : " दाइंबायें म्हणीतलें : "दहन करूं : मींया गोसावियासि पुढारु केला असे : " मग मढावरि बोळघवुनि रडों लागले : ' माझेया सोभागा ! माझेया सोबलेया ! : माझेया सोभागाचेया गाडुगेया ! :' भटीं म्हणीतलें : "दहन करीसी तरि आम्हीं काढुं न लगो" : दाइंबाएं म्हणीतलें : " नको काढु : मीं गांवींचे ब्राह्मण बोलावीन : मग काढवीन :" मग दाइंबा गेले : ब्राह्मणातें म्हणीतलें : "माझी माए सरली : ते भट म्हणेति : नीक्षपु करूं : मीं म्हणे : दहन करुं : तरि चाला ना :" मग ब्राह्मण आले : कीडडी केली : मग गोसांवीं माचेयावरुनि उठिले : श्रीमुखिचें तांबोळ प्रतेजीलें : पाटाउवांची खोल बुंथि घातली : आबैसीं म्हणीतलें : "तांबोळ ठेंचुनि तोंडीं घाला" : मग तांबोळ ठेचुनि तोंडीं घातलें : मग कीडडीएवरि घातलीं गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : मेलीचि तांबोळ खाते म्हणे : " मग गोसांवी बोळवीत नीगाळे : मग आवघे भक्तीजन नीगाले : तवं दाइंबायें बाहे आफळीली : " हा होयें मीं भोजा : गोसांवीं म्हणीतलें होतें : जें आपुचा बापा भाउवा वोउसैल ( वोजैल ) : तें हें करील : तें गोसांवीं साच केलें : " मग उथान पींडु दीधला : धार दीधली : पाइंतां करा फोडीला : कपाळ–मोचन होय तवं गोसांवी राहीले : मग कपाळ–मोचन जालें : पाटाउं दुटींसीं सचील स्नान केलें : मग ओलेनि धोंतरेसीं मढासि बीजें केलें : ॥ १३८ ॥

**ब्राह्मणा भोजन देणें** : ॥ गोसावियांसि रीगतां डावेया हाता आसन असे : तवं ब्राह्मणु एकु आला : तेणें म्हणीतलें : " एजमांना ! भोजन देयावें : " गोसावीं म्हणीतलें : " आवो मेला जाए जाए : मानवसा जाए नां म्हणे : " मग तो मानवसा गेला : आबाइसीं बैसों घातलें : पाए धुतले : टीळा दीधला ताट केलें : जेविला : तांबोळ दीधलें : गोसावियांपासि आला : मग म्हणीतलें : " स्वस्ति चीरंजीवीत एजमानासि भलें हो : " आणि गोसांवीं थापा हाणीतला : " हें काइ एजमांना ! भोजन देउनि मारिता कां ? : " मग भक्तीजनीं म्हणीतलें " आरे हे राउळ : " मग तो दंडवत करुनि नीगाला : ॥ १३९ ॥

**अस्रो-वेखें माहात्मेयां वीपलाणें** : ॥ नागा राउळांची ब्राह्मणि (बहीणि) ते दादुलेयाचे आवगौनि आली : ते भक्तीजनीं देखीली : आणि तीया भगत-जनातें पुसिलें : " राउळांसि कैसा अवसरू असे ? " भक्तीजनीं म्हणितलें :" ना राउळांसि अवसरु नाहीं : पहुडु स्वीकरीला असे : " तीया म्हणीतलें " आम्हासि (कैसा) अवसरु नाहीं! : " म्हणौनि दाटुनि नीगाली : आणि गोसांवीं उपहुडु स्वीकरीला : कोपु नटले : " आवो मेली जाए : बोडीकारी बोसारी बोचकवडी बोचकवडी होए म्हणे : आवो मेली जाए : फेडि फेडि फेडि ना म्हणे" मग फेडुनि आली : मग गोसांवीं म्हणीतलें : " एया माझा : आतां होए म्हणे : " ॥ १४० ॥

**गीत वीपलाणें** : ॥ एकु माहात्मा आणि माहात्मीं सारिंगा घेउनि आली : आणि दांडी टींबकारीली : गीत गांओं लागली : तो माहात्मा आनें रागें गाए : आणि ते माहात्मीं आनें रागें गाए : आणि सारिंगीना आणीकु रागु : ऐसें गांओं लागली : मग गोसांवीं म्हणीतलें : " मर तू बोडी मोसारी " आणि तीयें उगीची राहीली : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ १४१ ॥

**माळीय जांबु आरोहणें** : ॥ एकु दी गोसावी आणि गांवींची आंडोरें खेळत खेळत माळीये जांबु खालि गेले : मग गोसांवीं श्रीकरें जांबु स्परीसीला : आणि वरि आरोहण केलें : तो अवघां खांदो-खांदीं संबंधु दीधला : कोवळीं जांबुळें श्रीमुखीं घातळीं : आणि गोसांवी म्हणेति : " आवो गोड आहे म्हणे : नाहीं म्हणे : " म्हणौनि चावि थुंकि करीति : मग गोसांवीं बीजें करीति :॥१४२॥

**प्रसरांमयाते क्रीडा** : ॥ आदीत्यवाराचां दीसीं परसरामांपुढें यात्रा भरे : तीयें यात्रे आंतु गोसांवी बीजें करीति : आवघेया लोकांसि संबंधु देति : दहीं दुध तुपें : माळि हादु गाडे हादु : पानें पोफळें ऐसे तयाचे सकळै पदार्थ चाखेति : तयांसि दुना लाभु होए : ॥ १४३ ॥

**गोपाळ जुंझ अवलोकणें** : ॥ वेळीचीया पाहारां एका गोपाळीं साउलीयाचीया दोंडीया : बांधलीया : एक कांबळीयाचीया दोंडी बांधेति : एक श्रीखंडाचीया : उटी घेति : एक नील खडेयांचीया उटी घेति : हातीं खुबयांचीया

डांगा घेति : आणि खळा रींगौनि भवरी देति : आणि तेव्हीचि म्हणेति : "धाडकीयां पोरां दुधु घालीन :" एराची नांवें नेघेति : मग खळेया आंतु तयांमधीं गोसांवी बीजें करीति : मग गोसांवी म्हणेति : "मेला जाए : हा होए म्हणे : हा नव्हे म्हणे :" श्रीकरीं डांग घेति : श्रीमुगुटा भवतीं भवंडीति : एकांचीयां कासा धरीति : ऐसा नावेकु गोसांवीं खेळु केला : ॥ १४४ ॥

**स्त्रीवेखें माहात्मा वीपलांणें** : ॥ एकु दीं माहात्मा एकु बाइलेचें आवगौनि आला : तेणें भटातें पुसिलें : "राउळासि अवस्वरु कैसा असे ?" "नां राउळासि आरोगणा होत असे :" आणि तैसाचि आंतु रींगाला : तवं गोसांवीं बाहीरि बीजें केलें : मग गोसावीं म्हणीतलें "आवो ! मेला जाए जाए : बोडीकारु मोसारी : पंचकवडीया : आवो ! मेला जाए जाए : फेडि फेडि ना म्हणे :" मग तो वेखू फेडीला : दादुलीयाचा वेखु धरीला : मग गोसांवीं म्हणीतलें : "इया माझा : आतां होए म्हणे :" मग तो गेला : ॥ १४५ ॥

**एकाइ संचरीत पोळी का अंतर** : ॥ एकु दीं एकाइसीं भटातें म्हणीतलें : "नागदेया ! गोसावियांसि माझा उपहारु करावा :" भटीं म्हणीतलें : "तें जालें नां तैसेंचि :" मग आबाइसातें म्हणीतलें "आबै ! माझा उपहारु गोसावियांसि करावा :" आबाइसीं म्हणीतलें : "हें म्हाइंभट जाणेति :" मग म्हाइंभटातें म्हणीतलें : "म्हाइंभटो ! गोसावियांसि माझा उपहारु करावा :" म्हाइंभटीं म्हणीतलें : "तें भट जाणेति :" मग देमाइसा-करवीं दोनि सोजीचीया पोळीया करवीलीया : मग चौकें ताटीं वोळगवीलीया : (तयांतु घातलीया : एकी खाली एकी वरी ऐसिया संचिरीलीया :) मग गोसांवीं ताटापासि बीजें केलें : आसनीं उपविष्ट जाले : मग ताट अवलोकीलें : आणि दोन्हीं पोळीया नीवडुनि काढीलीया : उपरतौनि पाहीलीया : "आवो ! मेली जाय : या त्या नव्हेति म्हणे :" म्हणौनि बाहीरि टाकीलीया : एकी वासना : जगतीं बाहीरि टाकीलीया : आबाइसीं म्हणीतलें : "हें काइ वो ! काइ केलें ?" म्हणौनि आवधीं देमाइसातें पुंसों लागलीं : मग देमाइसीं म्हणीतलें : (सांघितलें :) मग आंणीकी पोळीया करीजेति : तवं गोसांवीं ताटावरि बैसलेचि होते : मग पोळीया केलीया : ताटीं वोळगवीलीया : तीया गोसांवीं ऐसीया पाहीलीया : मग

गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : या होती म्हणे : " मग आरोगणा केली : गुळुळा वीडा जाला : ॥ १४६ ॥

**कठीण आंगारीका पीठें उपहासु** : ॥ ( एकु दीसीं ) कणींक मोवारे नां : तीया पोळीया नीब्ररा कठीना जालीया : मग गोसावियांसि ताट केलें : गोसांवी आसनीं उपवीष्ट जाले : मग पोळीया श्रीकरीं घेतलीया : ऐसीया पाहीलीया : आणि गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : पेंडी खंड [ पेंड ] खंड : आवो ! पीठें पीठें होए म्हणे : " यावरि गोसांवी उगेचि आसनीं बैसले : आबाइसीं म्हणीतलें : " आणींकीए वेळे बरवीया करीति जी ! दासी मारावीया : पीटावीया जी ! गोसावी नेफेडावीया जी ! : आतां आरोगणा कीजो जी ! :" मग गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : मग आरोगणा केली : गुळुळा वीडा जाला :॥१४७॥

**सुक साक दर्भ उपाहासु** : ॥ एक म्हणेति सुकली भाजी : एकी वासना : गवत : गोसावियासि आरोगणा होत असे : तवं भाजी आंतु गवत नीगालें : तें गोसावी श्रीकरीचीया माझारि धरीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो दर्भ दर्भ " म्हणौनि गोसांवीं प्रणामु ( प्रमाणु ) धरीले : आणि उगेचि बैसले : मग आबाइसीं म्हणीतलें " जी जी ! आतां सांडीजो जी ! : आणींकी वेळे चोखट नीसींती जी : दासी मारावीया पीटावीया जी !: आतां आरोगणा करावी जी ! : " मग आंगुळीएचें गवत फेडिलें : सांडीलें : मग गोसांवीं आरोगणा केली : मग गुळुळा वीडा जाला : ॥ १४८ ॥

**पेंडाळु मागणें** : ।। गोसावियांचीया दर्सनासि पेंडाळु आलें होतें : गोसावियांसि उदर-व्यथेची प्रवृति : गोरडें ( गोडरें ) म्हणौनि आबाइसें कांहीं आरोगु नेदीति : ते पेंडाळु आबाइसीं मोदळां लपवीलें होते : मग गोसावियांसि ताट केलें : मग आसनीं उपवीष्ट जाले : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : पेंडाळु घालि नां म्हणे : " आबाइसीं म्हणीतलें : " पेंडाळु वेचलें जी ! आतां नाहींति जी ! ." गोसांवीं म्हणीतलें " आवो मेली जाए : मोदळां आहाति म्हणे : " मग आबाइसीं वाढीलें : मग गोसांवीं आरोगणा केली : ॥ १४९ ॥

**नवसीयासीं ठेंटरीं मागणें** : ॥ एकु दी एकी बाइला म्हणीतलें :

" माझा जोंधळा बरवा पीकावा : रासि घरासि यात्री : मग मीं तयाची राउळा-लागि ठेंटरीं करीन : " तवं तीचा जोंधळा बरवा पीकला : रासि घरासि आली : परि करु वीसरली : आणि गोसांवीं एकु दी बाहीरिं बीजें करीत होते : तवं ते बाइल पैलाकडौनि यत होतिः ते वीचार-चीरयावरि समीप कोणटयापासि भेटि जाली : आणि गोसांवीं पालवा पीळा घेतला : मग म्हणीतलें : " आवो मेली जाए : नवसीयांची थेटरी दे नां म्हणे : " तीया म्हणीतलें : " देइन राउळो ! वीसरलीयें राउळो !" मग तीया ठेंटरीं केलीं : मढासि घेउनि आली : मग गोसा-वियांसि आरोगणा जाली : एकी वासना : दुसरां दीसीं उमाइसीं जोन्हळे सडीलें : मग दळुनि ठेंठरीं केलीं : मग गोसावियांसि ( आरोगणा ) ठेंठरीं आरोगणा केली : मग एरीं दीसीं ताट केलें : गोसांवीं आसनीं उपवीष्ट जाले : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : ठेठरें घालि घालि नां म्हणे : " तीया म्हणीतलें : " जी जी ! ठेठरें नांहीं जी ! : " " आवो आहाति आहाति म्हणे : " दोनि यके उरली असेति : तें ताटीं वोळगवीली : मग गोसांवीं आरोगणा केली : एकी वासना : तीचा घरींहुनि भक्तीजनीं आणिलें : ॥ १५० ॥

**रजकी दत तुरी मागणें** :॥ सोंळीया तुरी होतीया : (तिया आबा-इसीं परटीणींसि सुदलीया ) मग गोसावियांसि ताट केलें : मग आसनीं उपवीष्ट जाले : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : तुरी घालि नां म्हणे : आवो तुरी आंणि : तुरी आंणि ना म्हणे : " मग केसव-नाएकाचीय घरूनि तुरी आंणीलीया : मग ताटीं वोळगवीलीया : गोसांवीं ऐसीया अवलोकीलीया : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाए : तीयाचि आंणि नां : म्हणे :" मग आबा-इसीं परटीणींचीये घरुनि (तियाचि) तुरी आणीलीया : मग ऐसीया अवलोकीलीया : मग गोसांवीं म्हणीतलें : "ऐया माझा : आतां होए म्हणे" मग आरोगणा गुळुळा वीडा जाला : ॥ १५२ ॥

**दीवाळीये वोवाळीतां पुहचाळि म्हणणें** :॥ पाडिवेयाचां दीसीं गोसावियांसि माचेयावरि आसन : नगर-स्त्रीया तळीया उचलीति : मढाति येति : गोसावियांसि वोवाळीति : म्हांइंभट थाळां चोळी घालीति : ( न पुरे तीसि लेख

घालीति ) एकीतें ओवाळीतां गोसांवीं म्हणीतलें : “ आवो पुश्वाळि पुश्वाळे होए म्हणे : ” ते लाजीली : पळाली : मग म्हांइंभटीं तीचें लेख घरासि पाठवीलें : ॥ १५२ ॥

**पेंधी सुंदरि नारि म्हणणें :** ॥ पेंधी ते एका ब्राह्मणाची स्त्री : ते पांढरा धोंगडा नेसली होती : मुड-बाहीयांची चोळी : आवया ऐसी डोइ : वेंखडैले दात : हातीं कथीलाचे दोरे : पाइ कासेयांचे पोल्हरें : हातीं टीकेची मुदि : मसि ऐसी काळी : ते पाणीयासि गेली होती : ते घागरि घेउनि आली : तवं सेजीं म्हणीतलें : “ आवो ! तु राउळातें वोवाळुं गेली होतीसि ? ” तीया म्हणीतलें : “ नां नाहीं : ” “ आवो जासीं नां : राउळ चोळी देताति : का चोळीचे लेख देताति :” आणि ते हरीखैली : घागरि ठेवीली : घरा आंतु गेली : दीवेयाचेनि तेलें डोइ सरीसीं केली : रांधणाचे काजळ डोळा भरीलें : कुंकुमाचा कपाळभरि थेबडु लावीला : थाळां टौळे उजळौनि ठेवीलें : मुठीभरि जोन्हळे घातले : मग नीगाली : मग गोसावियासि माचेयावरि तैसेचि आसन असे : तवं ते भंवतें आवघे भक्तिजन बैसले असेति : तवं पेंधी आली : हांसत हांसत ते भक्तिजनीं देखीली : आंणि म्हणीतलें “जी : जी ! पेंधी सुंदरि नारि एकी येते जी! :” तवं आली : आवघे भक्तीजन एकीकडे ओसरले : गोसावियांपुढें उभी राहीली : गोसावियातें वोवाळीलें : मग म्हणीतलें : “ राउळो(रो) ! चोळी(री) देया : का चोळी(री)यचे लेख देया :” म्हणौनि वोवाळुं लागली : मग गोसावीं अवलोकीली : आंणि गोसांवीं म्हांइंभटाची वास पाहीली : मग म्हणीतलें “ आवो मेली जाए : दोन्ही घालि घालि नां म्हणे” माइंभटीं चोळी आंणि सा दाम घातले : मग ते गेली : ॥ १५३ ॥

**पाडीवां भ्रीडी त्याग देणें :** ॥ पाडीवयाचा दीसीं गोसावियासि साळेपुढीला घोडेयावरि आसन असे : पाडीवयाचा दीवसीं भ्रीडीचा अवस्वरु आइकीला : डोइये मोरवीसांची वेंठी : पीलीचें नेसला होता : माथां दौडी : आंगीं नीळवर्ण उटि : हातीं चीपोळी : दौडीचें वाजवीतु : ऐसा अवस्वरु गोसांवीं आइकीला : “ उंच वोसरी सामाइसें गुसळी : सोनेयांची सरी मांदेयां ” ऐसा गीतु आइकीला : तयासि म्हाइंभटीं वोलि पसायासि दीधली : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ १५४ ॥

**नेसवनीकारी वेवस्ता-कथन** : ॥ गोसांवीं म्हणीतलें : " रांडे बाइले पाटु तरि आधीं पांढरें ( साउलें ) देयावें : मग मार्जीठें देयावें : आधीं दोनि पोळीया वाढावींया : मग चारि वाढावींया : आधीं तेल ठोंबरा वाढावा : मग तुप तांदुळ वाढावें : सांडीयसि तरि आधीं मार्जीठें साउलें नेसावया दयावें : आधीं चारि पोळीया वाढावींया : मग दोनि वाढावींया : आधीं तुप तांदुळ वाढावें : मग तेल ठोंबरा वाढावा : सेजारीं बाज घालावी : एरवीं आगि लागैल : मग नांदो अथवा न नंदो : परि पाटु दामु रोकडा :" मग म्हाइंभटीं माहाजनांतें पुसीले : तेहीं आवघे तैसोचि सांघीतलें : ॥ १५५ ॥

**लेंकी जावाइ एतें म्ह(ण)णें** : ॥ एकु दी गोसांवी रायांगणीं वेढे करीत असेति : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : ( लेंकि जावाइ ) एइल म्हणे : नैये म्हणे : आवो येइलाचि म्हणे : लेंकि उटावी म्हणे : (न्हाणावी म्हणे) चीर चोळी घेयावी म्हणे : ( बरवें जेउं घालावें म्हणे : जावाइयासि पासवडी घेयावी म्हणे )" तवं सात्रळापुरीची एकि(एका) ब्राह्मणाची सुन : तीसि माय बापु नाहीं : भावु बहीणि नाहीं : तीसि थोरु सासुरेवासु करीति : एकु दी तीचेनि भ्रातारें मारीली : आणि सत्री दीधली : " जाय नीदैवाचे नीदैवे ! " ते रोसें नीगाली : ;तीचेनि वरैतें पुसिलें : " तुं कें नीगालीसि ? :" तीया म्हणीतलें : " मीं आपुलेया माहीयरा जाति असे :" " कें असे तुझें माहीयर ? " तीयां म्हणीतलें : " हें नव्हे रीधपुरी असे : " तेणें म्हणीतलें : " तेथ कोण असे ? " " ना राउळ आहाति :" म्हणौनि नीगाली : तीयें मागें तोहि नीगाला : म्हाइंभटीं म्हणीतलें : " आजि गोसावियांची लेंकि कवणी पां यइल ? " तवं ते आली : गोसांवीं लेंकीसि खेंव दीधलें : ते गोसावियाचा गळा धरुनि रडुं(डों) लागली : ( मग जावाइयें खेंव दीधलें : ) मग आबाइसीं तीसि उटीलें : न्हाणीलें : जेउं घातलें : पांच दीस होती : मग म्हाइंभटीं चीरचोळी घेतली : जावाइयासि पासवडी घेतली : मग ते गेली : मग एकु दीसीं दुरडीभरि धीडरीं (धिरडी) वेढी(वाढे)भरि तुप घेउनि आली : गोसावियांपुढें ठेवीलीं : गोसावियांसि माचेयावरि आसन असे : गोसांवीं धीडरीं मोडीति : आणि वेढी (वेढैये) आंतु चुमळीति : आरोगीति : मग आबैसीं दुरडी परती काढीली : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : गोड आहे म्हणे :

आवो काह्या नेतासि ? " आबाइसीं म्हणीतलें : जी जी ! आतां पुरे कीजो जी ! " मग श्रीकरें श्रीमुख प्रक्षाळीति : मग गुळुळा वीडा जाला : ते आपुलेंया गावांसि आली : (गेलीं) ॥ १५६ ॥

**वेस-पंडीता कन्या अमळक आरोगणें** : ॥ एकु दीं वेस-पंडीताची ब्राह्मणि आंणि कन्यां गोसांवियांचीया दर्सना आलीं : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागली : सवें लेंकि : तीचां तोंडीं आंवळा होता : तो गोसांवीं देखिला : गोसांवी म्हणीतलें : " आवो ! दे दे नां म्हणें : आवो ! आंवळा देदे नां म्हणे : आवो ! आंवळा दे दे नां म्हणे :" तीचीया मायां म्हणीतलें : " आवो राउळ काइ मागताति : तें दे वो :" मग तीया गालिचा आंवळा काढिला : ते नागवी होती : तीया टीरींसि पुसौनि दीधला : तो गोसांवीं आरोगिला :॥ १५७ ॥

**रांजणीं श्रीमूख अवळोकणें** : ॥ एकु दी गोसांवीं तीकोपाध्यांचेया रांजणापासि बीजें केलें : रांजणु पांणियें(यां) भरला होता : तो गोसांवीं दृष्टि अवलोकीला : आंणि प्रतबींब देखीलें : आंणि हास्य करुनि मग म्हणीतलें : " आवो मेला जाय : तुं एथ आहासि म्हणे : " म्हणौनि वीनाटीया दाखवीति : साउलीं पडे तवं तवं हास्य करीति : मग नावेकु खेळु केला : मग बीजें केलें : ॥ ॥ १५८ ॥

**तथा आंडोरां सरीसें पोहणें** : ॥ गांवींचीं आंडोरें गोसांवी बारवेसि बीजें करीति : आंडोरें नेसतीं पागोटीं थडीएसि ठेवीति : आंणि पांणीयांआंतु रीगेति : गोसांवीं जें नेसलें असेति : तेणेंसीचि रीगेति : मग पव्हति : आपुलीय कासे आंडोरांतें लावीति : आंणि गोसावी बुडी देति : आंणि तीयें बुचकळेति : आंणि बोबाति : 'राउळो ! बुडालों : बुडालों :' आंणि गोसांवीं हास्य स्वीकरीति : आंडोराचीय कासे लागीति : आंणि मारु स्वीकरीति : आंणि आंडोर बुडे : नाकीं तोंडीं पांणीं रीगे : आंणि गोसांवी हास्य स्वीकरीति : ऐसा नावेकु खेळु केला : मग बीजें केलें : ॥ १५९ ॥

**वर्णीजार पेठें क्रीडा** : ॥ प्रसरामा इसान्ये वडा समीप : वनींजार-याची पेठ : तेथ वनींजारे उभे मार्गि उतरेति : तीव्हाळे घालीति : तेथ गोसावी

बीजें करीति : तीन्हाळेयावरि बीजें करीति : "हे दसकी : हे पन्हरकी : हे बारकी : हे सांनीं : हे थोर : हे फाटक : हे तुटक : " ऐसा अवघा तीन्हाळेयावरि खेळु करीति : मग मढासि बीजें करीति : ॥ १६० ॥

**करंड-मळा हेडाउवांसीं खेळु :** ॥ रायनींचा तो करंड-मळा : तेथ मळेया उतरे खेड मार्गि समीप : तेथ हेडाउ उतरेति : घोडेयाचे लांहासे देति : तवं गोसांवी तेथ बीजें करीति : मग म्हणति : "हा घोडा नीळा पांचासेयाचा : हा गांगा : हा कुमैतु : हा बोरु : हा सरंगा : हा अस्व जातिचा : हा गजु : हा खरु : आवो मेली जाय : या तीनीचि जाती : चौथी नांहीं म्हणे :" म्हणौनि श्रीकरें स्परीसीति : तव हेडाउ एति : दंडवत करीति : मग वीनवीति : "राउळो ! यथ आरोगणा करावी : " गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाय : आणि आणि नां म्हणे : " मग ते रोटी तुप आंणीति : आरोगणा करीति : मग मढासि बीजें करीति : ॥ १६१ ॥

**केसव-नाएक-माता श्रीचरणीं तुळसि वाणें :** ॥ साळे उतरे खातें : तेथ गोसावियांसि आसन होय : केसव-नाएकाची माता गोसावियांचे श्रीचरण प्रक्षाळी : मग श्रीचरणा तुळसी वाति : मग दंडवत करीति : चरणोदक मीतरि घेति : मग जेवीति : कदाचीत दांडियवरि आरोहण असेति तरि दांडी उभी करीति : श्रीचरणा तुळसी वाति : ऐसा तयांसि नेमु : ॥ १६२ ॥

**वेस(इश्वर) नायकु मातेसि उचीष्ट प्रसाद दान :** ॥ वेस-(ईश्वर) नायकाचीय मातेसि गोसावियाचीया प्रसादेंवीन जेवण नांहीं : तें मढासि येति : गोसावियांसि दंडवत करीति : मग श्रीचरणा तुळसी वाति : मग प्रसादु घेति : मग जेवीति : एकु दीसीं आबैसें प्रसादु देतें होतीं : तीहीं म्हणीतलें : "मीं ऐसा प्रसादु नेघें : मज राउळ देती तेहवाळि घेइन : " मग गोसावियांसि आरोगणा होए : मग गोसांवीं आपुलेनि श्रीकरें प्रसादु दीधला : मग ते गेली : जेवीली : मग गोसावियांसि गुळुळा वीडा जाला : एकी वासना : वेसीपंडीताची माता मढासि आली : दंडवत घातलें : मग तीहींचि उपहारु केला : श्रीचरण प्रक्षाळीले : मग श्रीचरणा तुळसी वाइलीया : मग राउळासि आरोगणा जाली : मग गोसांवीं तयासि उचीष्ट प्रसादु दीधला : तो तीहीं मीतरि घेतला : मग

तया दीसांपासौनि तयासि प्रसादेंवीण जेवण नांहीं : ॥ १६३ ॥

**केसव-नायकु वीनती स्वीकारू** : ॥ केसव-नायकें वीहीरि खाणीतली : पर पांणीं न लगेचि : मग गोसांवीं बीजें केलें : मग केसव-नायकें गोसावियांतें म्हणीतलें : " राउळो ! मीयां वीहीरि खाणीतली : परि पाणीं न लगेचि : तरि काइं करूं जी ? " मग गोसावी उजीवेंनि श्रीचरणें करुनि भुमि हांणीतली : मग म्हणीतलें : " आवो मेला जाय : एथ खांण खांण खांण नां म्हणे : " मग तेथ खांणीतलें : आंणि जळांत पांणीं लागलें : मग गोसांवीं मढासि बीजें केलें : ॥ १६४ ॥

**केसव-वींहीरी उद्यापनीं पातली आरोगणा** : ॥ केसव-नाएकें वीहीरि खाणितली : खनींची वीहीरि चीरेबद्ध केली : पर सींसवेंठि बांधली नांहीं : तवं तेथ गोसांवीं बीजें केलें : दक्षीणीली दारवठां उभे राहीले : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : उद्यापन करि करि नां म्हणे : " केसव-नाएकें म्हणीतलें : " राउळ सींस वेंठि न बधींतां उद्यापन करवीताति : तरि कांहीं सुचीक देखताति : मग केसव-नायकें मांडउ घातला : मग मांडवीं गोसांवीं पातळी(सि) आरोगणा केली : चौतरेयावरि लंवोधरापुढें उतरामुख आसन : तवं केसव-नायकासि ज्वरु आला : तैसेचि ते सरले : ॥ १६५ ॥

**वामांचा उपहांरू स्वीकारू** : ॥ एकु दी गोसांवी दाभ-वीहीरांचेनि मार्गें बीजें करीताति : तवं पैळाकडौनि वामन-नायक येत असेति : ते वाटेसि गोसावियांसि भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग वामनें वीनवीलें : " जी जी ! आरोगणें बीजें करावें जी ! " गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय जाय : घालि : घालि : घालि नां म्हणे : तळखंड येथाचि घालि म्हणे :" वामें तेथाचि उपहारु आंणिला : पासवडीचा वोवरा केला : मग श्रीचरण प्रक्षाळीले : टीळा गंधाक्षेता केलीया : मग तेथचि आरोगणा जाली : ( एकी वासना : ते गावांतु होते : ते सींदोरीचा दधी भातु आरोगणा जाली :) मग मढासि बीजें केलें ॥ १६६ ॥

**पोमाइ कन्हेरीचें उदकपांन स्वीकारू** : ॥ पोमाइसें तीयें वांकी-

एचीं : बावना पळाचें ताट आंणीलें : भीक्षा करावेया रीधपुरासि आली : तयासि वांकीयचीं वृत्ति होती : मग भटीं म्हणीतलें : " पोमाइसें ! तुम्हीं भीक्षा कराल तरि तुमची वृत्ति जाइल : आंणि साटि आसु एति : तीया गोसावियांचीया उपयोगा जाती : " मग पोमाइसीं म्हणीतलें : " तरि काइ करुं भटो ?" : भटीं म्हणीतलें : "तुम्हीं भीक्षुकांचीं भीक्षुकें होआ : हातीं झोळी घेउनि माहाद्वारीचां दारवंठा उभी राहा : भीक्षुकें भीक्षा करुनि येति : तेथ भीक्षा सबदु करा : तीयें आपुलीए झोळीची भीक्षा घालीति :" मग तीयें प्रतदीनी तैसेंचि करीति : एक एका भक्त-जनां एकएक उलींग दीधलें होतें : तयासि कन्हेरीचें उलींग : तयासि दांडीए सर्वे धांवत्रे नां : देह स्थुळ : ओघाळेय पुर्वे रामनाथां दक्षीणें पींपळु : तया पींपळा खालि हातीं सागळ : ओटीय रुपवाटे ऐसीं बैसेति : दांडी एतां देखेति : साउमें जाति रुपवाटां उदक घालीति : मग गोसावियांसि वोळगवीति : मग बीजें करीति : तयांचीय वृत्तीचीया साटि आसु एति : तीया गोसावियांचीया सेवा दास्या उपयोगा जाति : ॥ १६७ ॥

**टेंकाळीं उतरता भट थापा हांणणें** : ॥ लोकांचे परीवे वाहाति : एकी वासना : बुरुंगाळि बरुगाळि पांणी येत होतें : तो चीखलु जाला होता : ते नीसरडें जालें होतें : तवं गोसांवी भटाचा हातु धरुनि उतरत होते : उतरले आंणि हातु सोडीला : आंणि भटातें थापा हाणितलें : भटीं म्हणीतलें : " जी ! जी ! आतां कां हांणिजे नां : अन्नघडु ठाओ उतरलेती कीं " आंणि हास्य केलें : मग मढासि बीजें केलें : ॥ १६८ ॥

**मोळीय वीहीरी पोहणें** : ॥ एकु दी गोसांवी मोळीय वीहीरीसि बीजें केलें : श्रीचरण धुत असेति : श्रीचरण धुतां श्रीमुर्ति कलली : ते उदकांतु पडीली : ते श्रीमुर्ति उदकांतु जाय : वरिये आंणि भट म्हाइंभट भंवते भंवति : परि आंतु रीगवेनां : ऐसें नावेक उदकांतु बीजें केलें : मग वरि येउनि बाहीरि बीजें केलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : खोडी असतां तरि घालीति म्हणे : " मग मढासि बीजें केलें : आबाइसापुढें सांघों लागले : " आवो मेली जाय : ऐसेंचि गेलें : आंणि ऐसेंचि पडीलें : तु असतीसि ( असती तरि घालितीसि ) म्हणे : " आबाइसीं म्हाइंभटातें पुसीलें : " म्हाइंभटो ! गोसावीं

काइ म्हणताति ? " माइंभटीं म्हणीतलें : " गोसांवीं आंमचा परु स्वार्थु सांघताति :" मग म्हांइंभटीं आबाइसां पुढें आवघें सांगीतलें : "तें आम्हीं न घलुचि : तुम्हीं असतींति : तरि घालींतींति : ऐसें म्हणत असेति : " आबाइसीं म्हणीतलें : " हें काइ भटो ! वोखटें जालें होतें : पाणियें दीवा पाजळला होता : गोसावी बीजें करीते तरि काइ करीतों ?" म्हणौनि दुख करूं लागलीं : गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! उगी उगी : काह्या दुख करीतासि ? :" मग आबाइसें उगीचि राहीलीं : ॥ १६९ ॥

**माइंभट श्रीचरण धुतां (धूत श्रीचरण म्हाइंभट) थापा हांणणें :** ॥ बारवेचीये दक्षीणीली पाळीं बंदेस्वरापुढें तवंगावरी गोसावियांसि आसन आलें : गोसावियांचे श्रीचरण मातिया भरले होते : म्हांइंभटीं एकी बाइलेची घागरि मागितलि : भरुनि आंणीली : मग श्रीचरण धुतले : धों सरलें : आंणि माइंभटातें थापा हांणीतलें : म्हांइंभटीं म्हणीतलें : "जी ! आतां कां हांणिजे नां ?: श्रीचरण तवं चोखट जाले " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो आवो मेला जाय : " म्हणौनि हास्य केलें : मग बीजें केलें : ॥ १७० ॥

**धांनोचा घाटा आरोगणें :** ॥ धांनोचा भाउ आपे : तो असकतु होता : तयाचें पथ्य काठवटीसि घाटा नीवतु होता : तेथ गोसांवीं बीजें केलें : तो घाटा आरोगीताति : तवं आपेनि देखीलें : तो बोबाइला : " धांनो ! धांनो ! धांवं धांव : राउळें घाटा खादला : मींयां म्हणीतलें होतें कीं राउळ येती ते घाटा खाती : " तीया म्हणीतलें : " कां रे ! बोबातीसि : राउळासि आरोगूं दे : मग मीं आंणीक तुज वाढीन " मग गोसांवीं आरोगुन बीजें केलें : मग तयासि आंणीक वाढिलें : ॥ १७१ ॥

**कांदे मोलदार्णी म्हांइंभटां चीपलांणें :** ॥ माळीनि टोपलें भरुनि मोहाळु वीकीति होती : एकी वासना : पोथीया : गोसांवीं तीएपासि बीजें केलें : ते मोहाळु सोलु सोलु दे : एकी वासना : पोथीया सोलु सोलु दे : आंणि गोसावी आरोगीति : तेवींचि संभ्रहेंणु म्हणे : " राउळो ! माझी सासु कोपेल : आतां पुरे कीजो राउळो !" तेवींचि सोलु सोलु देतीचि असे : ऐसें अवघे टोपलेंहीभरि मोहाळु आरोगुं सरले : मग म्हांइंभटीं तीसि पुसिलें : " हां वो ! तुझे मोहाळु

काइ लाहाति ? : एकी वासना : पोथीया :" तीया म्हणीतलें " दाम्रु एकु लाहाति :" म्हाइंभट दाम्रु एकु देओं बैसले : तवं तीया म्हणीतलें : " आवो बापु ! गोडी-सइलेया ? : देव तुतें जाणत असे : धर्नें आथीला असेति ( असासि : ) आमचा राउळीं मोहाळु आरोगीले : तुं दाम्रुं काइसया देतासि ? " मग म्हाइंभट उगेचि राहीले : ॥ १७२ ॥

**गाडांचा गुळु वीखुरणें** : ॥ सेजा गांवीचा गुळु गाडा-भरूनि वीका-वया आणिला होता : तयापासि गोसावीं बीजें केलें : गुळा(सी) श्रीकरु घातला : आणि तीहीं नेणतां श्रीकरु धरीला : आणि गोसावी कोपु नटले : श्रीकरें धरुनि उचलुनि यरीवाहीं गाडा घातला : आणि श्रीचरणवरि गुळ वींधुंसीला : मातीसि आणि गुळासि एक केलें : तो पैस जाउनि उभा राहीला : मग माहाजनापासि गान्हाणे-नसी गेला : गान्हाणें दीधलें : मग माहाजनीं म्हणीतलें : " आणीकांचीं गान्हाणीं राउळापासि एति : मा राउळांचीं गान्हाणीं कवणापासि जातील ? राउळांचा गावों : राउळ समर्थ : घेवों देतेति कां तरि तुम्हा दुना लाभु होता : आझुनि तरि जा : राउळातें वीनवा : " मग ते गेले : गोसावियातें वीनवीलें : आवघा गुळु सावडीला : पाखुडीला : मग वीकीला : तयासि दुना लाभु जाला : ॥ १७३ ॥

**उदास्य स्वीकारूं** : ॥ वेवदें : एकी वासना : चारठाणें : साधें गुंफेचें आंगण झाडीते होतीं : तवं रीधपुरीहुनि एकें आलीं : तयातें साधीं पुसीलें : " आम्रुचें राउळ नीकेंनि राज्य करीत असेति ? " तीहीं म्हणीतलें : " नां राउळीं उ(औ)दास्य स्वीकरीलें असे : अकरा उपास पडीले : भगतुजनीं इउलालीं तोंडें केलीं असेति : " ( तैसीचि साधें पालत्रेसींचि नीगाली : वीळवरि चालति ) वीळीचा राहाति : ऐसीं थुं-गावासि आलीं : वाट चुकलीं : पात्रों अवट-ळला : चालवे नां : मग एका ब्राह्मणाचया घरासि गेली : बाइलेतें म्हणीतलें : " आलीये ! मीं : यथ राहों ? : " तीया म्हणीतलें : " यथ कोठें राहाल ? " ते उगीचि आधातुरा सेउ करुनि तयाची ओसरीय नीजैली : तवं तीचा भ्रतु बाहीरीलीकडुनि आला : तेणें बाइलेतें पुसीलें : " यें कवणें नीजैलि असेति ? " तिया म्हणीतलें " यें ब्रह्मणें ? आइसें : वारित-वरितां नीजैली असेति : " तेणें पुसिलें : " आइ ! तुम्ही कवनीकडुनि यते असा ? " " आलेया ! मीं

गंगातीरीहुनि यत असे " " आइ! जाणें कोठें ? " " नां : रीधौरा : राउळाचेंया ठाया : " मग तो घरांतु गेला : तांबीया भरुनि उन्हवणीं घेउनि आला : साधांचे पाय धुतले : दुध भातु जेउं घातला : मुठु आंथुरावेया दीधला : "आइ! यथ नीजा " म्हणीतलें : संवळेसीचि उठीली : कुंपीचा वीखोरा घेतला : 'गोवींदु वो ! गोवींदु वो ! ' म्हणौनि वाटे बैसली : मग म्हणीतलें : "आज गोसावियाचें चरणोदक तें उदक : गोसावियाचा उचीष्ट प्रसादु तें अन(न्न) :" ऐसा नेमुं घेतला : तवं ब्राह्मणु एकु घोडेया बैसोनि आला : तेणें पुसीलें " आइ ! तुम्हीं कें जात असा ? " " नां रीधौरा : राउळाचेया ठाया " " तरि बैसलीति कां ? " "आलेया! पावों अवटळला : चालवे नां " " आइ ! या घोडेयावरि बैसा : " आपण उतरला : तयातें घोडेयावरि बैसवीलें : माहाद्वारीचां दारवठां आणुनि उतरीलें : " एल्हो आली : एल्हो आली : " म्हणौनि अवघीं धांवतें आलीं : क्षेमालींगनें दीधलीं : " एल्हो ! तोंड कोमाइलें : आधीं पांणीं पी : " साधीं म्हणीतलें : " नां मींयां परीछेदु केला असे : चरणोदक वांचौनि नेघें : " आबैसें गोसावियांपासि गेली : " जी जी ! एल्हो दासि आली असे : ते तान्हैली असे जी ! ते ऐसे म्हणतु(ती) असे जी : ' गोसावियांचें चरणोदक तें उदक : " गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : आंणि आंणि आंणि कडीत आंणि नां म्हणे :" आबैसीं गंगाळभरि पांणीं आंणीलें : तयामध्यें दोनि श्रीचरण घातले : मग आबाइसीं ( दंडवत केलें ) श्रीचरण धुतले : मग साधासीं चरणोदक दीधलें : मग साधीं तृप्त सि) परीयंत घेतलें : मग आवघया भगत–जनांसि दीधलें : मग आबैसीं पुसीलें : " एल्हो ! भुकैलीसि : " साधीं म्हणीतलें : " नां आइ ! गोसावियाचा उचीष्ट प्रसादु तें मज अंन(न्न) " गोसावियांसि माचेयावरि आसन असे : मग आबैसें गेलीं : मग आबैसीं म्हणीतलें : " जी जी ! एल्हो दासि भुकैली असे जी ! : ते ऐसे म्हणत असे : 'गोसावियाचा उचीष्ट प्रसादु तें मज अण :' " गोसांवीं म्हणीतलें " आवो मेली जाय : घालि घालि तळखंड :" प्रतदींनीं जैसी गोसावियासि आरोगणा होये तैसीचि जाली : मग तयासि प्रसादु जेवण जालें : मग आवघेयां भक्तजनां जेवण ( प्रसादु जाला ) जालें : मग ते दीसीं आबैसी इतुका ऐसा ताकु भातु घेतला : जरि नेघतीं तरि तेंव्हळीसीचे ( गोसावी ) उठीते : उ(औ)दास्य परीहरीतें : मग उ (औ) दास्य परीहरलें : मग साधें गेलीं : दंडवते घातले : गोसांवीं तयासि क्षेमालींगन दीधलें : मग गोसांवीं म्हणी·

तलें : " आवो ! तु आलीसि म्हणे : " ॥ १७४ ॥

**साधां दाढ-प्रसादु दांन** : ॥ गोसावियांसि माचेयावरि आसन असे : गोसावियांची दाढ हालत होती : मग गोसांवीं श्रीमुखीं आंगुळि घातली : आणि दाढ काढीली : जवळि साधें बैसलीं होतीं : गोसांवीं म्हणीतलें " आवो मेली जाय : घे घे घे नां म्हणे :" म्हणौनि साधासीं दीधली : ॥ १७५ ॥

**साधां नख-प्रसाद दांन** : ॥ एकु दी गोसावियांसि माचेयावरि आसन असे : गोसांवीं डावीय श्रीकरीचें नख उजवेनि श्रीकरें मोडीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाय : घे घे घे नां म्हणे :" म्हणौनि साधासीं दीधलें : ते साधीं पाटावाचा चीरकुटीं गुंडुनि बांधलें : मग गळां बांधलें : ॥ १७६ ॥

**साधां फोडि-प्रसाद दांन** : ॥ माहाद्वारीचें कवाड लांपट : मग तें धरावयाचें साधांसि उलीग : गोसांवी म्हणेति : " आवो डोळो डोळो " ऐसे म्हणेति : आणि दांडी नीगे : तवं साधें कवाड टींबकारीति : ( धरिती ) : आणि गोसांवीं श्रीमुखीचें तांबोळ तयावरि फुकुनि घालीति : प्रसादु आवघीं भक्तजनें घेति : एकु दीसीं साधीं ऐसा मनोर्थु केला : " मी पापीनि प्रसादा चुकत असें : आवघे भगतजन प्रसादु घेत असेति : " तो मनोर्थु जाणौनि गोसांवी एकी फोडि गालीं धरीली होती : मग माहाद्वारासि गोसांवीं बीजें केलें : आणि श्रीकरें करुनि मुखीची फोडि काढीली : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : " म्हणौनि साधासीं दीधली : एकी वासना : उजवीय श्रीकरीची आंगुठा धरीली होती : ते दीधली : ॥ १७७ ॥

**तथा आहीता म्हणणें** : ॥ आर्धीलां दीसीं माहा-उपहारु जाला होता : तें तुप बहुत वाढीलें होतें : ते साधासि जेववेचि नां : तें उरलें होतें : तें साधें उदीयांचि जेवींतें होतीं : ते स्याळे दीस : तें थाळां थीजलें होतें : उंच-मढाचां वाव्य कोंणीं बैसौनि जेवींतें होतीं : तवं तेथ गोसावीं बीजें केलें : गोसांवीं म्हणीतलें " आवो आवो मेली जाय : आहीता होय म्हणे : " साधीं म्हणीतलें : "आहीता नव्हे जी ! : हें तुप : " गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : फेडि फेडि फेडि नां म्हणे : लुलुसी होइल म्हणे : " मग आबैसीं तुप फेडिलें : थोडेंचि वाढीलें : ते जेवीली : एकी वासना : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए :

फोडि फोडि फोडि नां म्हणे : ( मोडसी होइल म्हणे : ) " मग आबैसीं फेडीली : थोडेंचि राखीलें : मग साधें जेवीली : ॥ १७८ ॥

**वोवीया गायणीं साधें वीपलाणें** : ॥ एकु दी साधें कांडीतें होतीं : गोसावियातें गावों लागलीं : एकी ओवी गाइली : ' गोवींदु आइ : गोवींदु बाइ : गोवींदु माझी बाळवेसी :' यावरि गोसावीं म्हणीतलें : " मर तुं मर तुं"॥१७९॥

**साधां सीक्षापणें** : ॥ आबैसीं साधें राखण ठेवीली होती : गोसांवी येति तरि पाक परीछेदु करीति : नासीति : प्रसादु करीति : म्हणौनि साधें राखण ठेवीलीं : तवं गोसांवीं बीजें केलें : प्रसादु करुं लागले : तव साधें बोबाइलीं : " आबै ! धांवां धांवां गोसांवीं प्रसादु करीताति : " गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : काह्या बोबातीसि ? : " म्हणौनि पाठि घेतली : तीयें पळों बैसलीं : तयांचें आंग स्थुळ : पळवे नां : तीयें बेळां अडकली : पसीमीली खीड-कीएसि आडदांडीएसि अडकली : तयाचें आंग उघडें होतें : तें पुढीलें आंगीं गोसांवीं श्रीकरें धरीलें : आणि तेवीचि अनुकार करुं लागले : " आवो ! इळीया कापावें म्हणे : तळींवं करावें म्हणे : सांबारें करावें म्हणे : खांडीवं करावें म्हणे : राइतें करावें म्हणे : बेलसरी घालावें म्हणे : " तवं साधें बोबावों लागलीं : " आबै ! धांवां धांवां : " आबाइसें आलीं : आणि गोसांवीं सोडीलीं : आबैसीं म्हणीतलें : " इस्वरीं काइ अवेवस्था असे ? : ऐसें काइ आवडत असे ? : " मग तै लागौनि भटीं बाइयासीं कांचोळीया सीवीलीया : ॥ १८० ॥

**तथा स्नान-प्रसंगीं साधें भेडवणें** : ॥ एकु दी साधें खीडकीय बाहीरि पसीमे : नागीवी आंघोळि करीतें होतीं : एकी वासना : दोहीं मढाचीए संधीसि : तें गोसावीं देखीलें : आणि चुलीचें भीतें घेउनि पाठीं लागले : " आवो मेली जाय: धांदल धांदल म्हणे : " तवं साधें बोबाइलीं "आबै ! धांवां धांवां :" तवं आबैसें धांवतें आलीं : श्रीकरांचें भीतें घेतलें : आबाइसीं म्हणीतलें : " हें काइ वो जालें ब्राह्मणांचिया रांडांसि ? : पडदणीं घेऊनि कां आंघोळि न करावी ? राउळीं काइ अवेवस्था असे ? ऐसें काइ आवडत असे ? : " मग तै लागौनि पडदणीं घेउनि आंघोळि करीति : ॥ १८१ ॥

**साधातें नासिक नासु वीपलाणें** : ॥ एकु दी गोसांवीं साधातें

म्हणीतलें : “ आवो मेली जाए : नासीक जाइल म्हणे : न वचे म्हणे : ” आंणि साधें भीयालीं : ते दाइंबापासि सांघों लागलीं : “ दाइं दादो ! गोसांवी आजि ऐसे म्हणताति : मेली जाए नासीक जाइल म्हणे : ” दाइंबायें म्हणीतलें “ जाइलचि आंणि काइ : ब्रह्म–वाचा काइ अन्यथा होइल ? ” आंणि आगळीचि भीयालीं : तैसीचि गेलीं : यकांचीय घरीं विळुवरि : काकुलती एकी कोनटा मुरकुंडि घातली : रात्री आली : आबैसीं पुसीलें : “ एल्हो ! तुं आजि कोठे होतीसि ? ” मग आबाइसातें सांघों लागलीं : “ गोसांवीं मातें ऐसें म्हणीतलें : जें नाक ( नासिक ) जाइल : तें मीयां दायदादोपुढां सांघीतलें : दाइ-दादोयें ऐसेंचि म्हणीतलें : ‘ जाइल आंणि काइ ? ब्रह्मवाचा काइ अन्यथा होईल ?’ तें मी एकाचीए घरीं लपालीय होतीय : ” आबैसीं म्हणीतलें : “ गोसावी तुतें हांसत होते कीं : उठि भुकैलीसि : आंघोळि करीं : जेवीं : ” मग आंघोळि केली : जेवीली : भय नीवर्तलें : ॥ १८२ ॥

**साधें अळजपुरीचा काळा वसो म्हणणें** : ॥ एकु दीं गोसावीं साधेंतें म्हणातलें : “ आवो ! अळजपुरीचा काळा वसो होय म्हणे : आवो ! होयाचि म्हणे : ” ॥ १८३ ॥

**साधांतें मातांगाचें चींडारु म्हणणें** : ॥ गोसावियांसि माचेयावरि आसन असे : तवं साधें आलीं : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागलीं : गोसांवीं म्हणीतलें : “ आवो ! मातांगाचें चींडारु : आवो ! मातांगाचें चींडारु होयाचि म्हणे : ” एकी वासना : दाभवीहीरीचे मार्गी वामाचेया वावरेया–समीप हें स्थान : ॥ १८४ ॥

**साधां केसकळाप देणें** : ॥ गोसावियासि माचेयावरि आसन असे : तवं आबाइसें श्रीमुगुट वींचरीतें असेति : तवं साधें आलीं : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागलीं : जवळि बैसलीं : तवं आबैसीं श्रीमुगुटु वींचुरीला : वीरिगुंठी घातली : केसकळाप नीगाले : ते गोसांवीं श्रीकरीं घेतले : आंणि साधासि दीधले : गोसांवीं म्हणीतलें : “ आवो मेली जाय : घे घे घे नां म्हणे : ” मग साधीं घेतलें : मग ते पातळा लुगड्याचीया गांठीं बांधलें : तें बाहीवंटां बांधलें : ॥ १८५ ॥

**आउसा भेटि उदो म्हणणें** : ॥ एकु दी गोसावियासि माचेयावरि आसन असे : तवं आउसें गंगातीराहुनि आली : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागली : गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाय : जोगीणि जोगीणि होए म्हणे : आवो ! उदो उदो म्हण : उदो म्हणे ना म्हणे : " आउसीं म्हणीतलें : "जी जी स्वामी जगन्नाथा ! एथ हेचि म्हणीजे : आणि तेथहीं हेंचि म्हणीजे : तरि आपण काइ तयाची होइजे ? " मग आउसीं म्हणीतलें : " जी जी ! चक्रस्वामींवीन गंगातीर तांबा जळतु देखीजतु असे जी !" गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाए : होय होय म्हणे : " ॥ १८६ ॥

**आउसा-करवीं रंगपुजा करवणें** : ॥ एकु दी आउसीं गोसावियातें म्हणीतलें : " जी जी ! स्वामी जगन्नाथा ! मीं गोसावियांचा ठाइं रंगपुजा करीन जी : " गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : करि करि करि ना म्हणे : " मग गोसावियांसि मर्दना मादणें जालें : मग रंग मेळवीले : काळे पींवळे हीरवे लोहीवे ऐसे रंग मेळवीले : मग चौकु भरीला : आसन रचीलें : गोसांवी आसनीं उपवीष्ट जाले : पुजा केली : खींचु केला : पांतिया केलीया : साक(ग)वतीया : दांवे : मुठीयें : मुदा : गोसावियातें ओवाळुं वोवाळुं भक्तिजनांसि देति : गोसांवी पाहाति : चाखेति : आउसें म्हणेति : " चक्रस्वामींसि उदो : तेवीचि गुंडम स्वामीसि उदो : " ऐसा पुजा-अवस्वरु जाला : मग आरोगणा जाली :॥ १८७ ॥

**उचीष्ट आउ सीक्षापणें** : ॥ एकु दी आउसीं पेंवनें रांधीलें : अरधें आपण खादलें : अरधें गोसावियालागि ठेवीलें : तें गोड जालें म्हणौनि डावेनि हातें जेवीत जेवीत आउसीं (वाढुं) आंणींक घेतलें : जेवीलीं आंचवलीं : मग गोसावियांचीय आरोगणेंचीय वेळें पात्रीं घालुनि घेउनि आलीं : गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाय : उसीटें उसीटें होय म्हणे :" आउसीं म्हणीतलें : " जी जी : उसीटें नव्हे जी : गोड जालें म्हणौनि डावेनि हातें वाढुं घेतलें जी ! " मग गोसावियांसि आरोगणा जाली : ॥ १८८ ॥

**आउसां आग्रहें कांनवला मागणें** : ॥ आउसें गोसावियांकारणें कांनवला आंणीति : तें एकु दी म्हाइंभटीं वारीलें : "आउ ! तुम्हीं गोसावियांकारणें कांनवला नाणांवा : गोसांवी पांठीं काहीं आरोगण न करीति : " तीहीं म्हणीतलें

"हैरे! आतां तुं जाय रे! आतां हा नाणी रे!" गोसावियासि मर्दना होत होती: गोसांवी दाराकडे पाहातांति: आणि म्हणेति: "आवो मेली जाय: जोगींणि नैए" मादर्णे होत होतें: गोसांवीं म्हणीतलें: "आवो मेली जाय: जोगींणि नैय:" मग ताट केलें: आरोगणा होत समइं म्हणीतलें: "आवो मेली जाए" ऐसें त्रीसुधी गोसांवीं म्हणीतलें: आणि उगेचि बैसले: आबैसीं म्हणीतलें: "म्हाइंभटो! आउ कांनवला नांणी: म्हणौनि गोसांवी आरोगणा न करीति": मग म्हाइंभट गेले: तीहीं म्हणीतलें: "आउ! गोसांवी आरोगण न करीति: तुम्ही कांनवला घेउनि चाला" आउसीं म्हणीतलें: "जाए रे! मीं आतां न ए रे!" मग म्हाइंभट आड पडीले: मग तीयें कांनवला घेऊनि आलीं: गोसांवीं म्हणीतलें: "आवो मेली जाए: जोगींणि आली?" "आलीय जी:" मग आउसीं गोसांवियासि कांनवला वोळगवीला: मग आरोगणा जाली: ॥ १८९ ॥

**तथा पेवनें मागणें**: ॥ गोसावियासि ताट जालें: मग गोसांवीं आसनीं उपवीष्ट जाले: मग गोसांवीं म्हणीतलें: "आवो मेली जाए: जोगींणि ये नां म्हणे: पेवनें आंणील म्हणे:" तवं आउसें पेवनें कांनवले घेउनि आलीं: ताटीं वोळगवीलें: मग आरोगणा जाली: ऐसें सा मास आग्रहें तयाचां पात्रीं आरोगणा: ॥ १९० ॥

**वृश्चिक-वधीं आउ सीक्षापणें**: ॥ एकु दी गोसांवीं आउसाचीय गुंफेसि बीजें केलें: तवं गुंफे-आंतु वींचु नीगाला: तो आउसीं मारीला: तो नांगीय धरुनि टाकावया नीगालीं: तवं गोसांवीं देखीलें: मग गोसांवीं म्हणीतलें: "आवो मेली जाय: जोगींणि जोगींणि होय म्हणे: आवो जोगींयातें ऐसेंचि म्हणीजे: (म्हणे)? आवो मेली जाय: कांह्मा मारिलें?" आउसीं म्हणीतलें: "जी जी स्वामी जगन्नाथा! खाइल जी!" गोसांवीं म्हणीतलें: "आवो मेली जाय: तुवां यातें खादलें म्हणे: हें तुतें खाइल म्हणे:" तैसेंचि गोसांवीं बीजें केलें: ॥ १९१ ॥

**आउ सुंयन (सुइणि) नांम करणें**: ॥ एकु दी आउसें रंगीत साउलें नेसौनि मढासि आली: तीय बरवी दीसतें होतीं: मग गोसांवीं म्हणीतलें: "आवो मेली जाय: सुंइणि सुंइणि होय म्हणे: आवो मेली जाय: फेडि

फेडि नां म्हणे : " मग आउसें म्हणीतलें : " नी जी ! फेडीन जी ! आजि लागौनि परि मीनलेहीं न नेसें जी ! " मग आउसीं तें साउलें फेडीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया माझा : आतां होय म्हणे : " मग श्रीचरणा लागलीं : ॥ १९२ ॥

**कोथळोबा भेटि** : ॥ भट वांकी : दीघी : धुगांउ : देउळवाडा ऐसें अपजौं जाति : तेवी(थ)चि वीजन : तेवी(थ)चि भीक्षा : तेवी(थ)चि स्मरण : आंणि म्हांइंभट तळेगांउ : वांठवडा : कौंडण्यांपुर मागेति : आंणि नांनिवटावरि जोडीति : इतुकें धन गोसांवियांचीए सेवेसि उपयोगा जाय : एकु दी भट वांकी-यासि गेले : तेथ सीधनाथाचां देउळीं वीजनीं बैसले होते : कोथबोळा ( ते ) सीध-नाथाचे कठीय होउनि वर्तेति असेति : तवं ते आले : तेहीं चौकीं वस्त्रें ठेवीलीं : मग कोपीनु केला : घागरि घेतली : नैसि गेले : घागरि भरुनि आंणीली : सेन आंणीलें : मग कोणकोणटें चौक झाडीला : मग सडा घातला : रंग-माळिका भरीलीया : मग वस्त्रें घेउनि नैसि गेले : आंघोळि केली : तांब कळसु भरुनि पांणीं आंणीलें : मग लींगापासि गेले : पागाकरुनि नाक तोंड बांधलें : स्वासास्वास लींगावरि जाति म्हणौनि : मग स्तर्पन केलें : पुजा बांधली : मग दंडवत घातलें : मग लींगासि प्रदक्षणा केली : मग नीगाले : नीगतां भटीं म्हणीतलें : " ऐसें दास्य जरि साचोकारेया इश्वराचें होय कां तरि आंन यक होए : " तवं कोथळोबायें म्हणीतलें : " साचोकारा इस्वरु एकु असे ? " भटीं म्हणीतलें " हो असें : " तवं तेहीं म्हणीतलें : ( " कवणें ठाइं असे ? " ) : तवं भटीं म्हणीतलें : " हें नव्हे रीधौरीं : श्रीगुंडमराउळ असेति : " तेहीं म्हणीतलें : " मातें घेउनि कां चाला नां ? " " नां : हो कां : " तैसेचि भट नीगाले : ते रीधपुरासि आले : तवं गोसावियासि माचेयावरि आसन : तयासि भेटि जाली : कोथळोबायें नींबु दरीसनां केलें : तैसेंचि गोसावियांसि अनुसरलें : राहीले :॥१९३

**कोथळा नांम करणें** : ॥ एकु दी गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! कोथळा कोथळा होय म्हणे : " कोथळाबा ते आंगें स्थुळ होते : मोटे-धाटे : मग कोथळोबायें म्हणीतलें : "मज-करवीं गोसांवीं सयम्बु करवीताति : मग असती-परि वीहीत असेति : " म्हांइंभटीं म्हणीतलें : " तुम्हीं दैवाचे भाग्याचे : अबोलणीं

श्रीमुर्ति जरि असती-परि वीद्दीत असेति तरि तुजपरता कोन्ही सदैउ असे ? "
॥ १९४ ॥

**कोथळोबातें सीस लावावें म्हणणें** :॥ एकु दी कोथळोबातें गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाए : वोले दांडिवरि सीस लावावें म्हणें : वोणां घालावें म्हणें : सात खांडीया सांटवावीया म्हणे : पांच खांडीया सांटवावीया म्हणे : भीक माग माग : मीळे न मीळे : एरव्हीं चारी यकलांक घालावे :" मग कोथळोबायें म्हणीतलें : " म्हाइंभटो ! गोसांवी ( मज ) मरों सांगताति : " म्हाइंभटीं म्हणीतलें : " तुं सदैउ : दैवाचा : भाग्याचा ! " ॥ १९५ ॥

**मर्दनासमैं-उचलली श्रीमुर्ति सोडवणें** :॥ एकु दी आबैसीं मर्दना देवों आदरीली : तवं गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : कोथळा काइ कोथळा ? " तवं आबैसीं कोथळोबातें म्हणीतलें : " तुम्हीं मर्दनां देयावी : ऐसा गोसावियांसि मनोर्थु असे : " तैसेंचि कोथळोबा आडांतु रीगाले : हात पाय धुतलें : आंघोळि करुनि आले : गोसांवियांसि पाट-गादीएवरि आसन : मग चीकसां घेतला [ श्रीमुर्तीसि लावीला : ] मर्दनां देति : श्रीमुर्ति उटीति : तेल लावीति : पाय मर्दनां देति : लागु देति : लागु देउनि श्रीमुर्ति उचलीति : आणि गोसांवी म्हणेति : " आवो सोडि सोडि सोडि नां म्हणे : " मग ते पाट-गादीएवरि बैसवीति : आणि ( गोसांवी ) हास्य स्वीकरीति : मग मर्दनां होय : ॥ १९६ ॥

**तांदुळ सडीतां कोथळोबातें सीक्षापणें** : ॥ एकु दी म्हाइंभटाची स्त्री देमाइसें आणि कोथळोबा पायावरि पाओं घालुनि तांदुळ सडीतें होतीं : तवं बाहीरुनि म्हाइंभट आले : तेहीं देखीलें : आणि जीवीं वीकल्प भावीला : जे 'देहां ऐसें होए आणि रात्रीं तैसें होए : ' ऐसें मनीं भावीलें : तव गोसांवीं तेथ बीजें केलें : आणि कोथळोबातें गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : पायांवरुनि पाओं फेडि फेडि फेडि नां म्हणे : " मग पायांवरुनि पाओं काढीला : ॥ १९७ ॥

**तथा परीहारु देणें** : ॥ मग तीयें दीउनि कोथळोबा तीळु तीळु झीजेति : ऐसे रोडैले : अण न खाति : उदक न पीयति : ऐसें काळवंडइलें : तें

देखौनि गोसांवी अनुकारु करूं लागले : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : कोथळा तैसा नव्हे म्हणे : " भटीं म्हणीतलें : " म्हाइंभटो : गोसांवी कोथळोबाचा परीहारु देत असेति : " म्हाइंभटीं म्हणीतलें "नेणेंचि जी ! नेणेंचि जी!" म्हणौनि गोसांवियांसि दंडवत घातलें : (श्रीचरणा लागले :) गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेला जाय : कोथळेयासि घालि म्हणे : " मग म्हाइंभटीं कोथळेयासि दंडवत घातलें : मग तयाचें वोखटें नीरपौनि फेडीलें : ॥ १९८॥

**सेणपुंजी थापा हाणणें** : ॥ एकु दी साळेपुढें आंगणीं (अग्नि) कोणीं भुसारे उतरले होते : तेथ बैलांचीया दावणीं दीधलीया होतीया : तेथ सेणपुंजीया सेणें टोपलें भरीलें : उचलुं बैसलीं : तवं नुचले : मग भवंतें पाहीलें : तवं गोसांवीं तेथ बीजें केलें : तीया म्हणीतलें : " राउळो ! राउळो ! वाओं लागा कां : " मग गोसांवीं उचलौनि तीचीया डोइयें ठेवीलें : आणि तोंडावरि थापा हाणितलें : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ १९९ ॥

**मास-उपवासीणीं ग्रहीं सुकेळें आरोगणा** : ॥ मैळ-भटाची स्त्री ( बहिणि ) तीय नांव एल्हाइसें ( राणाइसें ): ते मास-उपवासीं बैसली होती : एकु दी तयाचेया घरासि गोसांवीं बीजें केलें : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : उठि उठि उठि नां म्हणे : " मग ते उठीली : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागली : बाजेवरि गोसांवीं पहुडु स्वीकरीला : मग उपहुडु जाला : मग राणाइसि वाटीय तुप घातलें : दाहा सुकेळें वोळगवीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " एया भाझा : आतां होय म्हणे : आवो ! आणि आणि आणि नां म्हणे :" मग गोसांवीं आरोगणा केली : गुळुळा केला : मढासि बीजें केलें : ॥२००॥

**मैळ-भटाचा उपहारु स्वीकारु** : ॥ एकु दी गोसांवियांसि वीचारचीरेयावरि आसन असे : गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! नानौरी जावें म्हणें : सोनौरी जावें म्हणें :" ऐसें अनुकार करूं लागले : तवं मैळभट आले : गोसांवियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागलें : मग आरोगणेसि वीनवीलें : गोसांवीं वीनवणी स्वीकरीली : मग म्हणीतलें : " आवो चाल चाल म्हणे : आवो ! घालि घालि घाली नां म्हणे : " तैसेंचि गोसांवीं बीजें केलें : मैळभटाचें घर आणि पाखालेचें घर : यकें आडेनि : तेथ घरासि बीजें केलें : आसन जालें : श्रीचरण प्रक्षाळीले :

मग तुळसी वाइलीया : मग तुप भातु : वडेयाचें आंबट : ऐसी आरोगणा जाली : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : गोड गोड : आंणिक घाली म्हणे : " मग आंणीक आंब वाढीलें : मग मांडे आंणि चवळेयाचें वरण : तुप : सेवटीं दुध-भाताची आरोगणा जाली : ऐसी यथोचीत आरोगणा केली : मग गुगुळा वीडा षोळगवीला : मग गोसांवीं मढासि बीजे केलें : ॥ २०१ ॥

**मातुळींग दरीसनीं माहादेवोबा भेटि :** ॥ एकु दी गोसांवीं रायां-गणीं वेढे करीत असेति : तवं माहादेवोबा आले : महाद्वारा आंतु पाइरीया आंतु खालि हातां दों भेटि जालि : मातुळींग दरीसन केलें : मग दंडवत घातले : श्रीचरणा लागले : मग भटां म्हाइंभटा क्षेमाळींगण जालें : ॥ २०२ ॥

**गंगातीर कापडी यक नांहीं म्हणणें :** ॥ आकोंसे तींय आबाइ-साचीं बहीणि : कटहींहुनि रामांसि म्हणौनि नीगाली : तीयें रीधपुरासि आली : एकाचीय घरीं बीढार केलें : माहादेवो पाठकांची स्त्री बीढार राखावया राहीलीं : तीयें आवघीं गोसावियांचीया दरीसना आलीं : गोसावियासि रायांगणीं दरीसन जालें : दंडवत घातलें : श्रीचरणा लागलीं : मग गोसांवीं तयातें मवीति : " एक दोनि चारि : एक नांहीं म्हणें " : म गुतें मवीति : " यक दोनि च्यारि : आवो गंगातीर यक कापडी नांहीं म्हणे : " तवं भटीं पुसीलें : " तुमचें बीढारीं कवणीं राहीलें असे : ? " आकोसीं म्हणीतलें : " माहादेयाची ब्राह्मणि राहीलीय असे :" भटीं म्हणीतलें : " तुम्हांसि पैन्हा बीढार काइसे ? यथाचि आंणा : " गोसांवियांसि ऐसी तुमची आठवण असे " " हो कां " मग तेथाचे बीढार आणिलें : तवं गोसांवियांसि माचेयावरि आसन जालें : तवं माहादेयाची ब्राह्मणि आली : तीसि दरीसन जालें : दंडवत घातलें : श्रीचरणा लागली : आंणि गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! तुं आलीसि ? " " जी ! जी ! आलीए जी : " म्हणौनि मागुतें दंडवत केलें : ॥ २०३ ॥

**हा तो नव्हे म्हणणें :** ॥ एकु दी गोसांवीं माहादेओयाचा हातु धरुनि दीढु वेढा केला : माहादेबोबा गोसांवियांची वाट पाहाति : आंणि भीति : दृष्टि चेपे नां : मग माहादेओबाय म्हणीतलें : " तीपुरारि भटो ! धांवां धांवां : " तवं गोसांवी तयाची वास पाहीली : मग म्हणीतलें : " आवो मेला जाए : हा

तो नव्हे म्हणे : " म्हणौनि सोडीला : मग तीपुरारि भटाचा हातु धरीला : मग वेढे केले : ॥ २०४ ॥

**कृष्ण गोरा अनुवादु** :॥ एकु दी गोसांवी खेळावया बीजें केलें : माहादेवोबा आणि लखुदेओबा दांडीय सर्वे धावीनले : ते भागले : ते गोसावियांचीया दरीसना न येतीचि : मग गोसांवी म्हणीतलें : " आवो मेली जाय : काळीचा काळा न एचि म्हणे : " गांगाइसाचे लखुदेओबा ते काळे होते : "आवो मेली जाय : गोरीचा गोरा न येचि म्हणे : " आकोसाचे माहादेवोबा ते गोरे : ते यरि दीसीं गोसावीयाचीया दरीसना आले : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : तवं भटीं म्हणीतलें : " माहादेया! कालि दरीसना न एसीचि ते काइ : ? " नागदेया! दांडीय सर्वे धावतां पाय भागले : म्हणौनि नै यंचि : भटीं म्हणीतलें : " ऐसे नव्हे कीं : यथ आसीजे तवं गोसावियांचीया दरीसना येइजे हो : ! " मग ते प्रतदीनीं गोसावियांचीया दरीसना येति : ॥ २०५ ॥

**नारंगें मागणें** :॥ आकोसीं कटकीहुनि नारंगें आणीलीं होतीं : तीयें सरलीं : मग गोसावी मागों लागले : गोसांवी म्हणीतलें : " आवो मेली जाय : नारंगें दे म्हणे : " आबाइसीं म्हणीतलें : " जी जी ! नारंगें वेंचलीं जी : आतां नाहीं जी ! " " आवो मेली जाय : दे दे दे नां म्हणे : " म्हणौनि आग्रहो घेतला : मेंहकरीहुनि दों आसुचीं नारंगें आ(णि)लीं [ होतीं ] : तवं गोसावियांची प्रवृति भंगली : मग तीयें नारंगें वीकुनि दोनि आसु गोसावियांचीया सेवादास्या उपयोगा गेलीया : ॥ २०६ ॥

**जावांइ नांम करणें** :॥ आकोसें राम-यात्रे गांवींहुनि नीगेति : सासुरासि जनु बोळवीत देति : मग रीधपुरासि येति : आकोसा सांगातें तयाचा जनु आला होता : तयासि आकोसीं आणि भटीं म्हणीतलें : " गावीं ऐसें सांगावें : आको रामासि गेली होती : गोसांवी इस्वरू म्हणुनि सन्यधानीं राहीली होती : " मग तयातें उटीलें न्हाणीलें : बखें रांधीलें : सांवेल म्हणौनि तयाचें तोंड धरीति : आवेसें तयासि ठाओं करीति : ठानेत्रे पाजळीति : जावाइयासि कीजे ऐसें केलें : तवं एकु दी गोसांवी तेथ बीजें केलें : तयातें श्रीकरें डोइय धरीलें : मग गोसांवी म्हणीतलें : " आवो जावाइ जावाइ होय म्हणें : " ऐसें गोसावी तयासि नांव ठेवीलें : तो जेवीला : ॥ २०७ ॥

**तस्कर नेत बळद कथन :** ॥ एकु दी तयाचा बैलु चुकला : तेणें चहुकडे पाहिलें : तव नेदखेचि : मग तेणें म्हणीतलें : " आतां राउळापासि जाओं : राउळ जरि बैलु सांघती तरि होती परमेस्वर : आणि कांइ ? " मग तो आला : दंडवत केलें : मग म्हणीतलें " राउळो ! आम्हंचा बैलु चुकला : तो दिसे नां जी ! : " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए जाए : माहार-वाडेयामागें बैसला आहे म्हणे : " मग तो गेला : तवं बैसला असे : मग तेणें म्हणीतलें : " होती इस्वरु : " ॥ २०८ ॥

**मादनें समदृष्टि नीवारणें :** ॥ एकु दी गोसावियासि मर्दनां जाली : मादनें होत असे : झिरमीट झिरमीट ऐसें पांणीं यत असे : मग गोसांवीं श्रीकरें श्रीमुखें वरतीया दृष्टी अवलोकीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : राहे राहे : राहे नां म्हणे : " आणि राहीला : मग मादनें जालें : वस्त्रें फेडीलीं : तवं नीखा:रानि गेले : उन( न्ह ) पडीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया : आतां माझा होय म्हणे : " मग नावेक वोतपळी घेतली : मग बीजें केलें : ॥ २०९ ॥

**वीहरन-समै वृष्टि नीवारणें :** ॥ एकु दी गोसांवी वीहरनांसि बीजें करीत होते : तवं पाउस आला : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : राहे राहे म्हणे : " म्हणौनि श्रीकरें श्रीमुखें वारीलें : आणि पाउस राहीला : मग गोसांवीं वीहरणांसि बीजें केलें : ॥ २१० ॥

**तां( तीम )बत जाणें झरत यणें म्हणणें :** ॥ एकु दी गोसांवीं वीहरणांसि बीजें करीत होते : गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! डोळो डोळो " म्हणौनि दांडी नीगाली : " आवो ! तींबतां जावें झरतां यावें म्हणे : " मग आवघी भक्तिजनें दांडीयसवें नीगालीं : तवं पाउस आला : आवघे भक्तिजन वोले जाले : आवघयां भक्तिजनांचीं वस्त्रें दांडीयवरि घातलीं : मग दांडी रांम-नाथीं राहीली : मग मढीहुनि वस्त्रांचें दींड आंणीलें : तीयें नेसले : वोलीं वस्त्रें मढासि यका हातीं पाठवीलीं : मग गोसांवीं हाटवटीहुनि बीजें केलें : आवघा लोकु म्हणे : " राउळ आपुलीं वस्त्रें तींबु नेदीतांचि : " ऐसें आवघया लोकांसि आश्चर्य वीस्मो जाला : मग मढासि बीजें केलें : एकी वासना : केसव–नायकें

उपाहारालागिं वीनवीलें होतें : तेथ गोसांवीं बीजें केलें : तेथ पुजावस्वरु जाला : भगतजनासहीत आरोगणा जाली : मग गोसांवीं मठासि बीजें केलें : ॥ २११ ॥

**आबाइसां भेटि** : ॥ आंमचां गोसावियांसि गणपतिमठीं अवस्थान : तें आंमचां गोसावीं गणपति मठाहुनि आबाइसांतें रीधपुरासि पाठवीलें : श्रीप्रभुचेया सेवा दास्या लागिं (लागोनि) : तीय रीधपुरासि आली : गोसावियांसि तांकोपाध्या-चीये आवारीं अवस्थान असे : तेथ गोसावियांसि भेटि जाली : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाए : तुं आलीसि ? " " जी जी ! श्रीचक्रधररायें तुम्हापासि पाठवीलें : " मग गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागली : मग श्रीप्रभु गोसावियाचें सेवा दास्य करूं लागली : ॥ २१२ ॥

**लक्ष्मींद्रभटा भेटि** : ॥ भट दास्या कारणें वांकी : दीघी : देउळवाडा आपजवीति : तरि एकु दी भट देउळवाडेया गेले होते : नरसींहाचां देउळीं भट एकीं कोणटां बैसले होते : तेथ लक्ष्मींद्रभट पुराण सांघत होते : ते पुराण सांघतां लक्ष्मींद्रभटीं रसु अभीनवीला : मग आवेसौनि म्हणीतलें : " जीवु आहे : परि देओ नाहीं : " तवं भटीं म्हणीतलें : " देओ आहे : परि जीवु नाहीं : " लक्ष्मींद्रभटीं म्हणीतलें : " हा नव्हे जीवु : " म्हणौनि वक्षस्थळावरि हातु ठेवीला : भटीं म्हणीतलें : " हा नव्हे देओ : रीधपुरीं राज्य करीत असेति : " म्हणौनि रीधपुराकडे हातु उभीला : आणि तैसे लक्ष्मींद्रभट उठीले : आणि भटही उठीले : श्रीप्रभुचीया दरीसना आले : श्रीप्रभुसि भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग लक्ष्मींद्रभट अनुसरले : मग गोसावियांचीया सन्यधांनीं असों लागले : तवं लक्ष्मींद्र-बासाचीया [ स्त्रीया ] ( ब्राह्मणी ) आइकीलें : जें त्यागु केला : मग तीयां म्हणीतलें : " त्यागु तवंचि कीं : जवं मातें नेदखेति आतां कैसें ने येति पा ! आतां मी घेउनि यइन : " म्हणौनि गोता कुटुंबासि पैज घेउनि नीगाली : सर्व श्रृंघारु केला : एकु [ ठाकुर ] (ब्राह्मणु) सवें घेतला : आपण घोडेया बैसलीं : ऐसीं मढासि आलीं : माहाद्वारीं उभी राहीलीं : मग भीतरि आलीं : मग म्हणीतलें : " ऐसें काइ केलें ? " लक्ष्मींद्रभटीं म्हणीतलें : "आम्हीं आपुलें आत्महीत केलें : " तयाचेया स्त्रीयां म्हणीतलें : " हा पैलु आंणिला असे : मांजठीय पासवडीचा : प्रबटीं भुजाचा : तरि यांची घरवात करूं ?" तवं लक्ष्मींद्रभटीं म्हणीतलें : "बरवें होय : आंणां : मां मीं सेघु भरीन : " ऐसें म्हणी-

तलें : आणि " नागवलींये वो नागवलींये वो ! " म्हणौनि बोंब दीधली : धडकरि रायांगणीं घातलें : धाए मोकलौनि पायावरि डोइ ठेवुनि रडों लागलीं : मग म्हाइंभटीं संबोखीलीं : न्हांणीलीं जेवीलीं : मग म्हाइंभटीं चोळी साउलें घेतलें : सींगणापुरासि गेलीं : ॥ २१३ ॥

**एकु दी वीनती प्रजन्यु बोलावणें** : ॥ एकी वरीखीं पाउसु गेला : तें थोर अवरीखणें पडीलें : भक्तिजनें भीक्षे जाति : लोकु पहीलें भीक्षा घालीति : मग भीक्षा कादली : हळु हळु थोर कार्पीण्य जालें : मग लोकु गजबजीला : मग माहाजनीं भगतजनातें म्हणीतलें : " पाणीं तरि न एचि : दुकोळु पडीला : तरि आपुलीया राउळातें वीनवा कां : " मग एकु दीसीं गोसावियासि माचेयावरि आसन असे : मग आबाइसीं गोसावियांतें म्हणीतलें : " जी जी ! पाउस यावा जी ! : भीक्षुकांसि भीक्षा नाहीं : दुकोळु पडीला : भीक्षुकें थोर पीडताति जी !" मग वीनवणीं स्वीकरीली : माचेयावरुनि उठीले : बाहीरि बीजें केलें : चैत्रु वैसाकु तपती ऐसे तपत होते : आणि मग गगनाची वास पाहीली : तवं बोटा इतुकें आभाळाचें ठीक होतें : आणि गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : य य ना म्हणे : " तवं आभाळ पसरलें : वोळलें : आणि वरीखलें : आवघी पृथ्वी सनाथ केली : सुकाळु जाला : मग माहाजनीं म्हणीतलें : " राउळ माय : राउळ बापु : राउळ समर्थ : राउळें आंम्हुचीं लेंकरुवें बाळें राखीलीं : "॥२१४॥

**माप भेदु करणें** : ॥ गोसांवीं हाटवटी—आंतु बीजें करीति : मापें माप उभानीति : जें उणें नांगें तें गणेसाचा माथां फोडीति : खरें तें राखेति : तवं माट ब्रह्मांओ करीति : " जी जी ! राउळें कुडीं मापें फोडावीं जी! : खरीं राखावीं जी ! राउळ माय : राउळ बापु : राउळ दुबळेयाचे सारथी : पापीयासि सीक लावावी जी : राउळ समर्थ : राउळीं कुडें न समाय जी ! : " ॥ २१५ ॥

**बदीरीखा फळें वीखुरणें** : ॥ हीरोरीचीया माळीणी बोरें विकावया रीधपुरासि येति : तीया एकु दी बोरें घेउनि आलीया : गोसांवीं तेथ बीजें केलें : आणि बोरांसि श्रीकरु घातला : तवं माळीणीं वरीचावरि धरीला : आणि गोसांवी कोपु नटौनि मग म्हणीतलें : " आवो मेली जाय जाय : " म्हणौनि पाटी येरीवांही घातली : आणि श्रीचरणवरि वीध्वंसीली : मग गोसांवीं एका तबकयाची

दांडी काढीली : आणि तीएचि पाठि घेतली : ते गान्हाणेनसी माहाजनापासि आली : माहाजनीं म्हणीतलें : " राउळ समर्थु : राउळाचा गावों : आणीकाचीं गान्हाणीं राउळांपासि सांघावों : मा राउळांचें गान्हाणें कवणापासि सांगावें ! : आवो तू घेवो देतीसि का तरि तुज दुणा लाभु होता : आम्हुनि तरि सावडुनि वीकी : जाय : " मग ते गेलीं : मग तीयां सावडीलीं : राउळासि बरवीं नीवडौनि ठेवीलीं : मग येरें वीकीली : तीसि दुना लाभु जाला : तवं गोसावीं तेथ बीजें केलें : तीयां गोसावियातें वीनवीलें : मग बोरें वोळगवीलीं : मग गोसावीं म्हणीतलें : "एया माझा : आतां होय म्हणे :" मग बोरें आरोगीलीं मग बीजें केलें:॥२१६॥

**ठाकुर-राणी मुक्ताफळ वीपलाणें** : ॥ एकु दी ठाकुरा यकाचीया राणीया गोसावियाचीया दरीसना आलीया : तीया सर्व शृंघारेंसि आलीया होतीया : नाकीं मोतीय होतीं : मग गोसावीं म्हणीतलें : " आवो मेली जाय सेंबुड होय म्हणे : आवो उळीचा कांदा उळीचा कांदा होय म्हणे " मग तीया लाजीलीया : मग मोतींयें फेडुनि हातीं घेतलीं : मग दंडवत घातले : श्रीचरणा लागलीया : मग गेलीया : ॥ २१७ ॥

**मधुकाकडी मागणें** : ॥ एकु दी गोसावीं म्हणीतलें " आवो मेली जाय : मधुकाकडी दे नां म्हणे : आवो मधुकाकडी दे दे दे नां म्हणे : " ऐसा आग्रहो घेतला : मग हीरौरीचेया माळीयासि स्वप्न जालें : तवं तो मधुकाकडीया घेउनि आला : गोसावियासि वोळगवीलीया : मग गोसावीं म्हणीतलें : " एया माझा आतां होय म्हणे : " मग आरोगण जाली : ॥ २१८ ॥

**वोंबीया मागणें** : ॥ एकु दी गोसावीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : वोंबीया दे दे नां म्हणे : " म्हाइंभटीं म्हणीतलें : " आजि चैत्रु वैसाखु आजि अवकाळ : वोंबीया कैंचीया ?" भटीं म्हणीतलें : "नसतीया तरि गोसावीं न मगते कीं : " मग तळां गहुं देराला होता : तेथौनि घेउनि आले : भाजीलीया : मग गोसावियांसि वोळगवीलीया : मग गोसावीं म्हणीतलें : " एया माझा आतां होय म्हण " मग वोंबीया आरोगीलीया : ॥ २१९ ॥

**तथा आंबे मागणें** : ॥ एकु दी गोसावीं म्हणीतलें : " आवो ! आंबे दे म्हणे : आवो आंबे दे दे दे नां म्हणे : " म्हाइंभटीं म्हणीतलें : "आवकाळीया

दीसां आंबे कैंचे ? " भटीं म्हणीतलें : " नाहींतें काइ ? गोसांवीं मागत असेति : आह्मांति म्हणौनि गोसावी मागताति कीं ! " भाद्रपदु मासु : श्रावणा आंबा आला होता : रायाकारणें वर्स्रे गुंडु गुंडु राखीलें होतें : बुदासि कांटीया लावीलीया होतीया : राखणाइत प्रीदा प्रीदी राखत होते : भट म्हाइंभट : कोथळोबा : वाळुकोबा : ऐसे आळजपुरासि गेले : म्हाइंभटीं आसु आंबा मागितला : परि ते नेदीतीचि : मग भटीं रीगावा नीगावा पाहीला : " आतां काइ करुं पां ? " भटीं म्हणीतलें : " नां नीजेति तेहवळि रात्रीं चोरुनि काढुं : " तैसीचि भीक्षा केली : नदीसि भोजन केलें : मग मध्यान्ह एकी रात्रीं आले : चोरवेळ नीरुती भट जाणेति : मग भटीं हळ्ळाची कांटी उपडीली : मग वाळुकोदयाचेया खांदावरि पाउ देउनि कोथळोबा आंबेयावरि वेंघले : शतभरि आंबे तोडीले : एकी वासना : लोथभरि तोडीले : लोथ बांधली : मग नीगाले : ते आडराने यता वाळकोबाचा पांइ घसु भरला : मग आले : गोसांवियांसि आंबे वोळगवीले : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया माझा आतां होय म्हणे : " म्हणौनि आरोगीलें : मग तीहीं म्हणीतलें : " जी जी ! : वाळुकोदयाचा पांइ घसु भरीला : " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो बांध बांध तांबोळ बांध : " मग श्रीमुखीचा ( उगाळु ) ( तांबोळ ) बांधला : दुख हरलें : नीकें जालें : एकी वासना : आंबे मांचों घातले : मग आबैसीं मांडे केले : आंबे पीळीले : मग गोसावियासि ताट केलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया माझा आतां होय म्हणे : " मग आरोगण जाली : ॥ २२० ॥

**आळकवसा मागणें** : ॥ एकु दी गोसांवियासि ताट केलें : आसनीं उपवीष्ट जाले : गोसांवीं म्हणीतलें : "आवो आळकवसा घालि म्हणे : घालि नां म्हणे :" म्हणौनि श्रीकरु आखुडीला : उगीचि बैसले : मग आबैसीं म्हणीतलें : "म्हाइंभटो! आळकवसा मणीजे काइ ? " म्हाइंभटीं म्हणीतलें : ' नां तरवंटेयातें म्हणीजे : " मग आ(व)काळवर्णीय पडीली होतीं : तो मढामार्गे तरवंटा नीगाला होता : एकी वासना : मढावरि : मग दीवीया सूनि पोत सूनि पाहीला : तवं नीगाला होता मग आणीला : मग उकडीला : पीळीला : मग हींगें फोडणीया रांधीला : मग ताटीं वोळगवीला : मग गोसांवीं म्हणीतलें : "ऐया माझा आतां होय म्हणे :" मग आरोगणा जाली : गुळुळा वीडा जाला : ॥ २२१ ॥

**तथा वांगे मागणें :** ॥ एकु दीसीं गोसावियांसि ताट केलें : मग आसनीं उपवीष्ट जाले : मग गोसावीं म्हणीतलें : " आवो वांगें वाढि : आवो वांगें वाढि म्हणे : " भटीं म्हणीतलें : " या दीसां वांगें कैचे : ? जरि नसतें तरि गोसावीं न मगते कीं : " तवं म्हाइंभटीं म्हणीतलें : " मीं भीक्षे गेला होतां : तवं तोंडोळेयाचीय गोवींदु भटाचीय पानवेयवरि वांगें देखीलें होतें : " मग तेथ गेले : वांगें घेउनि आले : हींगें मीरीयें सांबारें रांधीलें : मग ताटीं वोळगवीलें : मग गोसावीं म्हणीतलें : " ऐया माझा : आतां होय म्हणे :" मग आरोगणा : गुळुळा वीडा जाला : ॥ २२२ ॥

**गोवींद भटाची पुजा स्वीकारु :** ॥ प्रतदीनीं गोवींद-भट दोनि माळा करीति : मग गोसावियांसि वोळगवीति : ऐसा तयासि नेमु : ॥ २२३ ॥

**वीव्हावो स्वीकारु :** ॥ एकु दी भक्तिजनें भीक्षेसि गेलीं होतीं : तवं तेलीण वोहरासि बासींगें नेत होतीं : तीतें माहादाइसीं म्हणीतलें : "आवो तेलीणी ! मेहरी एक बासींग आंमचेयां गोसावियांसि दे : " मग तीया आंणीक बरवें केलें : आंणुनि गोसावियांचीय श्रीमुगुटीं बांधलें : मग गोसावीं श्रीमुगुट हालवीति : आंणि दोन्हीं तोंगलें हालवीति : " आवो मेली जाय : कांकण बांध म्हणे : डाउ बांधावा म्हणे : हळदी उटावें म्हणे : तुरें वाजवावें म्हणे : तुपें पऱ्हीवे वाहावावे म्हणे : बौनें करावें म्हणे : मांडौ घालावा म्हणे : " तुरें वाजों लागलीं : वडे मांडे केले : भातु वेळीला : वळिवट वेळिलें : तुपाचे सांगड आंणीले : मग इस्वरनायकें म्हणीतीलें : " गोसावियांसि वीव्हायांची प्रवृत्ति जरि होइल तरि मीं आपुली कन्या देइन :" मग भगतजनीं गोसावियांतें वीनवीलें : "जी जी ! इस्वरनायक आपुली कन्या देत असेति : तरि गोसावीं स्वीकरावी जी ! " आंणि गोसावी कोपु नटले : मग म्हणीतलें : " आवो मेला जाए : ना म्हणे " मग उगेचि राहीले : मग तुपाचे सांगड उलवीले : आवघेयां लोका जेवणावळि केली : मग माहादाइसीं धवळ गाइले : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय गाए गाए म्हणे : " माहादाइसीं म्हणीतलें : " काइ गाओं जी ? " गोसांवीं म्हणीतलें : " आवो कृष्ण रुक्मीणि गाय म्हणे : तुरया थाट गाय म्हणे :" आंणि माहादाइसांसि स्फुर्ति जाली : इतुकेन रुक्मीणि-स्वयंवर गाओंचि लागली : " नीरुता लागला जीवीं :" हें कडीवें गाइलें : आंणि गोसांवीं म्हणीतलें : "आवो होवो होवो : नीरुता लागला

जीवी : " मग आबैसीं म्हणीतलें : " जी जी उठीजो जी ! व्याळी कीजो : " गोसांवीं म्हणीतलें : " आवो हें जेवीलें म्हणे : " आबैसीं म्हणीतलें : " कवणीं ठांइं जेवीलें जि " गोसांवीं म्हणीतलें : " आवो हें जेवीलें म्हणे : आवो हें रुकुमीणीचा राउळीं : " " जी ! तें द्वापर : आणि हें कळियुग कीं ! " आणि गोसांवीं हास्य केलें : मग आबैसीं ताट केलें : गोसांवीं आसनीं उपविष्ट जाले : मग मांडे पुरीया : घारीया : वडे : उंबरें : ऐसे आवघें उलथ उलथुं अवलोकिलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " (आवो मेली जाय : ) भाकरि नांहीं म्हणे : आबाइसीं म्हणीतलें " जी जी : वऱ्हाडीं भाकरि कैसी जी ? " मग च्यान्ही दीस गोसावीं रुकुमीणि ऐवर आइकीलें : चौथा दीसीं साडे जाले : मग प्रवृत्ति भंगली : ऐसा वऱ्हाडीकेसि आवघा गांउं जेवीला : बेलौरें जेववीलें : साचोकारे तुपें पऱ्हीत्रे वाहावीलें : मग वऱ्हाडांचें अण भक्तिजनें जेवीलीं होतीं : तें नासावयाकारणें अवचीती कटकें केली : ॥ २२४ ॥

**अवचीति कटकें करणें** : ॥ एकु दी गोसांवीं म्हणीतलें : " आवो डोळो डोळो : " म्हणौनि कटकें माडीली : मग दांडी आंणीली : दांडीयवरि आरोहन केलें : आवघीं भक्तिजनें नीगालीं : काठीयाचे माळे केले : अर्ध दांडीय पुढें अर्ध मागें : ऐसें बीजें केलें : ॥ २२५ ॥

**बेलोरा वास्ति** ॥ मग गोसांवीं बेलौरेयासि बीजें केलें : दुर्गा आंतु चौकीये वास्ति जाली : मग घोडवडीसि बीजें केलें : घोडेयाची पीजुळी सोले आरोगणा केली : मग रात्रीं व्याळी जाली : मग उदीयाचि गोसांवीं बीजें केलें : ॥ २२६ ॥

**आंनदुरा वसति** : ॥ मग गोसांवीं अनदुरेयासी बीजें केलें : रणराखसा कांन्हदरणा तो गोसांवियासि साउमा आला : मग दंडवत घातलें : श्रीचरणा लागला : मग देव्हार-चौकीय वास्ति जाली : एकी वासना : त्री रात्री अवस्थान जालें : मग मर्दना मादणें जालें : पुजा जाली : वस्त्र वोळगवीलें : मग आरोगणा केली : मग तयातें गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : डोळे जाती म्हणे : " तेणें म्हणीतलें : " जी जी ! यहीं डोळां गोसावियातें देखीलें : आतां जातु माओ राहातु : " तवं रायें भाटासि दान देओं आदरालें : तेणें

डावा हातु ओडवीला : रायें पुसिलें : " हा रे ! उजीवा हातु नोडवा तें कांइ : " माटें म्हणीतलें : " उजीवा हातु तो रणराखसेया कांइंदरणेयाचेनि दानें दाटला असे : " आणि रायासि न मनेचि : तयाची खांति धरीली : मग बोलावीला : आला : मग रायें म्हणीतलें : " हां रे ! तुं काइ मजहुनि दानीं : काढा रे याचे डोळे : " मग तयाचे डोळे काढीले : जरि तेह्वळिसींचि गोसावियातें वीनवीता तरि वांचते : ॥ २२७ ॥

**सीराळां दांडी खालवणें** : ॥ मग गोसांवीं सीराळेयासि बीजें केलें : तळेयाचीय दक्षीणीली पाळी दांडी खालावीली : आणि तैसीचि दुडु दुडु करि नागनाथाचीया देउळासि धांव घेतली : लींगापासि बीजें केलें : लींग श्रीकरें स्परीसीलें : मग म्हणीतलें : " आवो मेली जाय : तुं यथ आहासि म्हणे : " मग तैसेचि बीजें केलें : ॥ २२८ ॥

**पुसदां गोपाळीं वसेति** : ॥ मग गोसांवीं पुसेदेयासि : गोपाळाचेया देउळासि बीजें केलें : चौकीं आसन : तवं बडवेयाचें आंडोर गोपाळासि बोणें घेउनि आलें : तवं गोसावीं म्हणीतलें : "आरे ! आणि आणि आणि नां म्हणे: " तेहीं गोसावियापुढें ठेवीलें : तें गोसांवीं आरोगीलें : ते घरासि गेले : घरीं (चां) पुसीलें : " हां रे ! बोणें काइ जालें : ? " " नां देवें आरोगीलें : " " आरे ! देवें कैसें आरोगीलें : ? " " नां देओ चौकीं बैसला असे : देवासि वाकि : सांखळे : मोतीयाचा टीळा : नाभिचुंबीत खाड : दांडी झालरी : चवरी ढळत असे : भगतजनें असेति : " मग तीहीं भणीतलें : " तरि काइ राउळ आले असेति : ? " तैसेंचि पाहावया आले : तव गोसावियातें देखीलें : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसावियातें वीनवीलें मग वीनवणीं स्वीकरीली : मग घरासि घेउनि गेले : ॥ २२९ ॥

**बडुवया-घरीं पुजा आरोगणें** : ॥ रात्रीं बडुवयाचां घरीं गोसांवियासि मर्दना मादणें जालें : पुजा आरोगण जाली : बाजे सुपवतीय-वरि पहुडु जाला : मग उदयाचि उपहुडु जाला : मग गोसांवीं गोपाळाचेया देउळासि बीजें केलें : सरीसें आवघे भगतजन असेति : बडुवीं खांदावरि दांडी घेतली : मग चौकीं आसन जालें : तवं एकु देवतेसि केळें उंस घेउनि आला : भीतरि गोपाळा-

पासि ठेवीलें : दंडवत घातलें : आणि नीगाले : तें बडुवीं आणुनि गोसावीयांपासि ठेवीलें : मग गोसावीं म्हणीतलें : " ऐया माझा : आतां होय म्हणे :" म्हणौनि एकु उसु आरोगीला : दोनि केळें प्रसादु केलीं : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : घे घे घे ना म्हणे : " म्हणौनि बडुवयासि प्रसादु दीधला : मग गोसांवीं बीजें केलें : एकी वासना : त्री रात्रीं अवस्थान जालें : ॥ २३० ॥

**मातुळग्रामीं भींबा खावविणें** : ॥ मग गोसांवीं मातुळग्रामासि बीजें केलें : तेथ पांढरीयवरि कडु भोपळीया नीगालीया होतीया : आणि भगतजनें अवघीं भुकेलीं होतीं : ते भोंपळे गोसांवीं दृष्टी अवलोकीलें : आणि अमृत ऐसे जालें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : भींबा खाय ना म्हणे : " भगतीजनें खाउनि पाहाति : तवं गोडु अमृत ऐसे असेति : मग अवघा तृप्त परयंत खादले : जैसी केळासि चवि तैसे लागेति : मग गोसांवीं तया रीठापासि बीजें केलें : तें रीठ देखौनि आपलवले : मग गोसांवीं म्हणीतलें : " हें मामेयाचें घर : हें माउसीयचें घर : हें यथ वाढीनलें : मुंजि-बंधन केलें : मग रीधौरासि घेउनि गेले : " ॥ २३१ ॥

**नांदिगांवीं अवस्थान** : ॥ मग गोसांवीं नांदिगांवासि बीजें केलें : ठाकुर साउमे आले : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसांवियांतें वीनवीलें : मग गोसांवीं वीनत्रणीं स्वीकरीली : मग भीतरि बीजें केलें : मग देव्हार-चौकींय अवस्थान दीस तीन जालें : मग गोसांवियांसि पडदणीं वोळगवीली : मग मर्दनां मादणें जालें : पुजा जाली : वस्त्र वोळगवीलें : मग आरोगणा जाली : पहुडु जाला : ऐसें तीघां भाउवांचां घरीं तीन दीस वस्त्र-पुजा : आरोगणा जाली : तीनिचि दी अवस्थान : मग बीजें केलें : ॥२३२॥

**आंजनगांवीं अवस्थान** : ॥ मग गोसांवीं आंजनगांवासि बीजें केलें : आवघे गांवींचे माहाजन साउमे आले : वेसीपुढें भेटि जाली : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसांवियांतें वीनवीलें : दुर्गी-आंतु घेउनि गेले : देव्हार-चौकींय अवस्थान जालें : त्री रात्रीं : मग गोसांवियांसि पडदणीं वोळगवीली : मग मर्दनां मादणें जालें : मग पुजा जाली : वस्त्र वोळगवीलें : मग आरोगणा केलीः केळें : मांडे : साकर : ऐसी आरोगणा जाली : मग गुळुळा वीडा वोळगवीला : ॥ २३३ ॥

**मातुळींग दरीसनीं ठाकुरा भेटि** : ॥ उदीयाचि गोसांवीं बीजें केलें : गांवा–पसीमें मळा : तेथ गोसांवीं बीजे केलें : तवं पैलाकडौनि ठाकुर एकु आला : हातीं मातुळींग : ऐसा एतु होता : गोसांवियांचें दरीसन जालें : श्रीकरीं मातुळींग वोळगवीलें : मग दंडवत घातलें : गोसांवीं म्हणीतलें : "ऐया माझा : आतां होय म्हणे :" म्हणौनि आरोगीली : ॥ २३४ ॥

**बंदीजन वीनती स्वीकारु** : ॥ भगतीजन गोसांवियांसि गंगातीरा घेउनि जात होते : तवं गांवा–पसीमें माळावरि बंदीजन भेटले : तीहीं दंडवत घातलें : मग म्हणीतलें : "जी जी ! आमचें वराडीचें देवत सीवन–देसा न वचावें जी :" एसीवनीयें नेतां तरि वराड पोरटें होइल जी : राउळ माय : राउळ बापु : राउळेवीन आवघें वोस : आपदा : पीडा पावेति जी : गोसांवीं परतावें जी : " मग गोसांवीं वीनवणी स्वीकरीली : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो आलतु आलतु " म्हणौनि दांडी परतवीली : ॥ २३५ ॥

**उंबरावतीय माहाजनीं साउमें यणें** : ॥ मग गोसांवीं उंबरावती-यसि बीजें केलें : उंबरावतीचे माहाजन गांवा दक्षीणे वाहाळे पैलाडि साउमें आले: गोसांवीं तयांतें एत देखीलें : आणि दांडीयवरि पंजरु घातला : तयांसि दरीसन नेदीतीच्चि : वीनती न स्वीकरीतीच्चि : बीजें केलें : मग गोसांवीं नदी उतरतां दांडीयवरुनि श्रीकरीचीया करांगुळीयाचेनि नखें–करुनि पाणीं घेतलें आणि श्रीमुखीं घातलें : एकी वासना : श्रीचरणींचा आंगुठा उदकासि लावीला : मग बीजें केलें : ॥ २३६ ॥

**राहाटगांवीं वसति** : ॥ **भानुखेडेया बीजें करणें** : ॥ मग तैसेंचि गोसांवीं भानुखेडेयासि बीजें केलें : कोंडेस्वरावरि दांडी गेली : तवं तीकडुनि कावाडीयें मोळीया घेउनि यत होती : तीहीं म्हणीतलें : " येउतां कें आलीति मरावया : तथा : मसना : पुढां वाघु बैसला असे : " तवं गोसांवीं म्हणीतलें : " आतां इउती इउती खाइल म्हणे : न खाय म्हणे : आवो खाइलाचि म्हणे : " म्हणौनि भय नटले : आवघीं भगतजनें भेभों लागलीं : मग वडजंबेसि बीजें केलें : वडाताळि दांडी खालावीली : ॥ २३७ ॥

**वडजंबेसीं क्षेळु** : ॥ मग गोसांवीं वडजंबेचीया देउळासि बीजें

केलें : वडजंबेतें श्रीकरें स्परीसीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवों तु एथ आहासि म्हणे : " ऐसा नांवेकु खेळु केला : मग बीजें केलें : ॥ २३८ ॥

**भगतीजनां-करवीं तीळ काकवी खात्रवणें :** ॥ आवर्षी भाक्तिजनें भुकेलीं होतीं : मग गोसांवीं गुळ्हारासि बीजें केलें : तवं पाटीभरि तीळ यकें आणीलें होतें : घागरिभरि काकवी आणीली : मग तीळु काकवी काठवटीय यकत्र कालवीलें : मग गोसांवीं प्रसादु केला : भाक्तिजनीं घांस दोनि दोनि घेतले : आणि गोसांवीं म्हणीतलें : " डोळो डोळो : " मग भाक्तिजनीं हात तोंड पुसीलें : तैसींचि नीगालीं : ॥ २३९ ॥

**माळधरा दांडी खलवणें :** ॥ **तीवसा दांडी खालवणें :** ॥ **सेंदुरजनीं दांडी खालवणें :** ॥ **वरान उतरौनि भीस्नौरीं अवस्थान :** ॥ मग खडुकीए दांडी सांडीली : आवर्षी भगवतीजनें टणकलीं : तीयं राहीलीं : भट माहादाइसें यें दोघें गोसावियांसवें नीगालीं : तवं रात्री जाली : मग गोसांवीं आडचि वरान उतरले : गोसावियां मागें भट माहादाइसें उतरलीं : तयाचेया आवारासि बीजें केलें : यकादसीचा दीसु : तीयें अवघीं वेसि घालुनि जागरनां गेलीं होतीं : भटीं वेसि माथां घेउनि उघडीली : माहादाइसीं साउलें फाडुनि काकडा केला : वाति लावीली : डेराभरि पाणीया तावतु होता : तेणें गोसावियाचे श्रीचरण प्रक्षाळीलें : मग भटाचे पाय धुतले : मग आपुले धुतले : मग भट तयातें बोलवावया गेले : तयातें म्हणीतलें : " आगा ! काइ जागरण करीत असां : राउळ तुमचेया घरासि आले असेति : " मग ते आवघेचि आले : गोसावियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसावियासि मर्दना मादणें जालें : पुजा केली : वस्त्र वोळगवीलें : मग आरोगणा जाली : पाट-बाज घालुनि सुपवति घातली : तीयवरि न नीजति : आत्रधया बाजा घातलीया : तयावरि न नीजेति : मग लेंकरुवें नीजैलीं होतीं : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो हे घालि घालि :" म्हणौनि तिय बाजेपासि बीजें केलें : मग लेंकरुवें उठवीलीं : मग तीय बाजेवरि पहुडु स्वीकरीला : मग म्हणीतलें : " ऐया माझा होय म्हणे : " भटीं म्हणीतलें : " जी जी ! आतां कां नव्हे : लेंकरुवें तवं उठवीलीं कीं : " " आवो मेली जाय " म्हणौनि हास्य केलें : मग भटीं माहादाइसीं आंघोळि केलीया : माहादाइसीं मणीतलें : " नागदेया जेवि : " भटीं म्हणीतले : " तुम्हीं यका-

दासि मोडाल तरि मीं जेवीन : " संम्रहेन म्हणीतलें : " नां : हो कां : " मग दोघें जेवीलीं : ॥ २४० ॥

**आवो तु आलीसि म्हणणें** : ॥ तत्रं उदीयांचि आबाइसें आलीं : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! तु आलींसि : " " जी जी ! आलीयें जी ! " मग दंडवत घातले : श्री चरणा लागलीं : तत्रं म्हांइंभट : लक्ष्मींद्रभट भागले : तें यकाचें घोडें चरत होतें : तें तीहीं धरीलें : कटी—बंधनेंयांची धारी घातली : दोघे वरि बैसले : मग भीस्नौरासि आले : तें घोडें सोडुनि दीधलें : आकळवणीं पडीलें होतें : तें चीखलें हात पाय माखले होते : ते पांदरे जाले होते : ते देखौनि गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : सोत्रंरें सोवरें होतीं म्हणे : " तीहीं म्हणीतलें : " जी जी ! गोसावियावीन सोच्यें सोत्रंरोंचि दीसत असों जी :" तीय दीसीं दुसरेया भाउवाचा उपहारु जाला : तीसरा दीसीं तीसरेयाचा जाला : ऐसा तीघां भाउवांचा उपहारु जाला : चौथेयाचा उपहारु न स्वीकरीति : मग बीजें केलें : ॥ २४१ ॥

**गव्हांणीं कोंपटीय अवस्थांन** : ॥ मग गोसांवीं गव्हांणासि बीजें केलें : तेथ म्हातारी एकीचें कोंपट : सानें ऐसें घर : होतें : तेथ गोसांवीं बीजें केलें : बाजेवरि आसन जालें : आवघीं भक्तीजनें बाजे भवतीं बैसेति : म्हातारी वळणींखालि बैसली : पांणीं पडत असे : म्हातारी भीतरि येवों बैसे : आंणि म्हणेति : " आवो मेली जाय : परती परती जाय : " आंणि भक्तीजनें म्हणेति : " आवो तुझें दैव : भाग्य : इस्वरु तुझेया घरासि आले : " ते म्हातारी म्हणे : " इस्वरीं देखों आपुलें परावें असे : आपुलीं बाजे भवंतीं बैसलीं असेति आंणि मज तरि भीतरि रीगो नेदीती : " भक्तीजने तुरीची पोपे(प)टि आंणीति एकी वासना : वालाची पोपे(प)टि आंणीति : ते डेराभरि उकडीति : भक्तीजनें पोपटीचे सोले करीति : गोसावियासि वोळगवीति : मग आवघीं भक्तीजनें पोपेटि खाति : ऐसी तीन दीस : वाकडी लागली : तेथ त्रीरात्रीं अवस्थांन जालें : मग गोसांवीं बीजें केलें : ॥ २४२ ॥

**आखतवाडां वसति** : ॥ ठाकुरा घरीं पुजा आरोगणा : मग गोसांवीं आखतवाडेयासि बीजें केलें : कळंकेश्वरीं दांडी खालविली : मग चौकीं आसन

जालें : तवं गावांतुनि ठाकुर ( ब्राह्मणु ) एकु आला : तेणें गोसांवियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागला : मग गोसांवियातें वीनवीलें : " जी जी ! माझेया घरासि बीजें करावें जी !" गोसांवीं वीनवणी स्वीकरीली : मग बीजें केलें : एकीकडे दांडीयेचा कोंतु तेणें खांदीं घेतला : मग घरासि घेउनि गेला : मग बाजे सुपवती वरि आसन केलें : मग श्रीचरण प्रक्षाळीलें : मग पडदणीं दीधली : मग मर्दना मादणें जालें : वस्त्रें वोळगवीलीं : तीयें वेढीलीं : मग गोसावी आसनीं उपवीष्ट जाले : मग टीळा केला : अक्षेता लावीलीया : मग पुजा केली : आरोगणा जाली : मग गुळुळा वीडा जाला : मग पहुड जाला : मग उदेयाचि बीजें केलें :॥२४३॥

**सीरखेडीं अवस्थांन** : ॥ मग गोसांवीं सीरखेडेयासि बीजें केलें : माहाजन आवघे साउमें आले : तुरें मांदळ वाजत गात वात नाचत बींबत चीपोळीया वात आले : गोसांवियांसि दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसावियांतें वीनवीलें : गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : मग गावांमधीं घेउनि गेले : कमळनायकाचा घरीं अवस्थान जालें : गोसांवियांसि पडदणीं वोळगवीली : मग मर्दना मादणें जालें : पुजा आरोगण जाली : मग पहुड जाला : ऐसें तेथ त्रीरात्रीं अवस्थान जालें : ॥ २४४ ॥

**मृत्य स्त्री जीववणें** : ॥ कमळ-नायकाचीय स्त्रीयासि ज्वरु होता : सात लंघनें पडीलीं : मग ते सरली : मग आवघीं रडों लागलीं : बाहीरि कीडडी केली : सर्पनें स्मसानांसि नेलीं : तवं गोसांवीं उगेचि बैसले होते : हास्य करीति : टाळी वाति : मग तीयपासि बीजें करीति : श्रीकरें-करुनि तोंडावरीला पदरु परता केला : मग म्हणीतलें : " आवो मेली जाय : उठि उठि उठि नां म्हणे : " म्हणौनि तोंडावरि श्रीकरें हाणितलें : खडपडौनि उठीली : दंडवत घातलें : श्रीचरणा लागली : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : ताक आंबीलि जेंउ घालि म्हणे : " मग ते उठीली : थाळा धुतला : मग ताक आंबीलि वाढीलि : गोसावियासि आरोगणा जाली : मग गुळुळा वीडा जाला : मग आवघेया लोकांसि आश्चर्य वीस्मो जाला : ॥ २४५ ॥

**तथा वस्त्र-पुजा स्वीकारु** : ॥ मग तीहीं वडे मांडे अमृतफळें : खीरि : घारीया पुरिया उंबरें फेणियां साकर-मांडे खीरि ऐसा बरवा पदार्थु उत्तमु

नीफजवीला : बरवें वस्त्र घेतलें : भक्तासि कोरडें दीधलें : मग तीहीं रंधन केलें : मग तीहीं गोसांवियांसि पडदणीं वोळगवीली : मर्दना मादणें जालें : मग पुजा केली : वस्त्र वोळगवीलें : तीहीं भक्तीजनातें पुसीलें : " तुम्हा आंतु दीधीचा मेइदेओ होता ( आहे ) : तो कोणु ? " मग भक्तीजनीं म्हणीतलें : "तुम्ही नोळखा ? " " नां आम्ही नोळखों : " तीहीं म्हणीतलें : " तो पैलु बैसला असे : तेथ तयाचे सोयरे :" मग क्षेव दीधलें : मग गोसांवियांसि ताट केलें : गोसांवियांचीय पांतीं कोथळोबासि वाढीलें : यर आवघे भक्तीजनें गोसांवियांचीय दृष्टीपुढें पांतीं बैसले : मग गोसांवियांसि आरोगणा जाली : मग गोसांवियांसि गुळुळा जाला : मग गोसांवीं म्हणीतलें " आवो मेली जाय : घे घे घे नां म्हणे : आवो हे खाय खाय : गोड आहे म्हणे : " म्हणौनि कोथळोबाकडे ताट लोटीलें तीहीं म्हणीतलें : " जी जी : माहाप्रसादु ! " म्हणौनि घेतला : जेउं लागले : तेव्हींचि भगतीजनासि वाकुलीया दावीति : भगतीजनें म्हणेति : " आतांचा तव घेइ लबका : गळेवरि :" मग ताट धोउनि पाळाले ( पीयाले ) : खालीलें सीतें सांवडूनि तयाचीया स्त्रीया भीतरि घेतली : ॥ २४६॥

**इस्वरनायका आभर्तणी रीधपुरा प्रयाण** : ॥ मग गोसांवीं सीरखेडासि बीजें केलें : ऐसें आइकौनि इसरनायक आले : गोसांवियासि भेटि जाली ; मग दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसांवियातें वीनवीलें " जी जी ! गोसांवीं रीधपुरासि बीजें करावें जी ! बहुत दीस जाले जी ! " मग गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : मग गोसांवीं घोडेयावरि आरोहण केलें : एकी वासना : दांडीयाचिवरि आसन जालें : ऐसें रीधौरीयासि बीजें केलें : तळेगावीं तळेयाचीय दक्षीणीली पाळी दांडी खालवीली : मग बीजें केलें : मांगजैसीं खेळु केला : मग मढासि बीजें केलें : ॥ २४७ ॥

**इस्वरनायका नामुत्रय करणें** : ॥ एकु दी गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : पांणि-संबळा पांणि-संबळा होय म्हणे : " तें पांणीं बहुत पीति : म्हणौनि गोसांवीं म्हणीतलें : " आवो सीसा सीसा होय म्हणे : आवो थोरु सीसा होय म्हणे : तयाची डोइ थोर होती म्हणौनि : ऐसीं प्रसादाचीं नांवें गोसांवीं ठेवीलीं : ॥ २४८ ॥

**सोनें-चोरु नाम करणें :** ॥ एकु दी गोसावीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : सोनें-चोरु सोनें-चोरु होय म्हणे : " म्हांइंभट तयातें सोवन हाटीं बैसवीति : ते सोवनी सारा करीतां थोडें आपण राखेति : थोडें म्हांइंभटासि देति : मग म्हांइंभटचि सोवण-सारां बैसेति : हातीं मुद्रीका डोइय टोपरें : आंगीं आंगींया : ऐसें बैसेति : भीक्षा मागेति : तेवींचि लागुभागु मागेति : ॥२४९॥

**म्हांइंभट नाम करणें :** ॥ मग बीढारासि म्हांइंभट येति : मुद्रीका आंगींया टोपरें फेडीति : मग आचळे नेसेति : कंथा पांगुरेति : मग भीक्षेसि जाति : तेवींचि लागुभागु मागेति : ऐसें गोसावीयाचें सेवादास्य करीति : लोक म्हणेति : " हें सोवणीं भीक्षा काइ जेवीति ? : हें नेउनि राउळाचीया गाइसि घालीति : तयाकारणें मागेति : सोवंणीं ऐसें काइ जेवीति ? " माइंभटासि नासलें : वीटलें : आंबलें : घटइलें : खरवडि : कोंडा ऐसें भीक्षेसि घालीति : मग मढासि येति : गोसांवियांसि झोळी दृष्टपुत करीति : गोसांवीं तीं बोटांमध्ये सामाय इतुका प्रसादु करीति : मग आडापासि येति : आडाचां कांठीं बैसेति : यकत्र कालउनि जेवीति : तेचि चीखलवनीं पीति : तवं गोसांवी तेथ बीजें करीति : मग म्हणेति : " ऐया माझा आतां होय म्हणे : चारु होय म्हणे : वारु होय म्हणे : चारु तो वारु होय म्हणे : " ऐसें प्रतदीनीं करीति : ॥ २५० ॥

**इस्वरनायका चवरी ढाळीतां पुरें म्हणणें :** ॥ इस्वर-नायक ते चवरी ढाळीति : हें तयाचें उलींग : ते यकु दी गोसांवियांवरि चवरी ढाळीत होते : आणि तेवींचि मनोर्थु करीति : " मातें गोसावी पाठवीते कां तरि बरवें होय : " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : पुरे पुरे जाय जाए नां म्हणे : " मग पुरे केलें : ते गेले : ॥ २५१ ॥

**माहांडुळ मार्गी लोंकाचा गाडा मोडला म्हणणें :** ॥ मग गोंसावीं माहांडुळासि बीजें केलें: गात्रांपुर्वे आलवरीं लोंकाचा गाडा मोडला होता : तेथ बीजें केलें : मग गोसांवीं म्हणीतलें: "आवो ! लोंकाचा गाडा मोडला म्हणे : " म्हणौनि श्रीकरु लावीति : तवं तिहीं म्हणीतलें " जी जी ! मोडला तरि काइ करुं जी ? " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : आंणीक आंख घालि म्हणे :" मग बीजें केलें: एकी वासना : गंगा-तीरीचें माहांडुळें : तो अनुकार

तेथ केला : म्हाइंभटीं तो दीसु वारु लीहीला : मग गंगातीरासि सोडीलें : माहाङुळें गांउं होता : मग तेथचेया लोकांतें सोधीलें : आमुका दीसीं : आमुका वारीं : यथ लांकाचा गाडा मोडला कीं : लोकीं म्हणीतलें : " साच मोडला : " मग तयासि आश्चर्य जालें : ॥ २५२ ॥

**वासुदेवो-भट होता तो दुर्वा जाला म्हणणें** : ॥ जगती आंतु अड्ड : तया आडापुर्वे पांढरी हरीयाळी नीगाली होती : तेथ गोसांवीं बीजें केलें : सरीसीं माहादाइसें होतीं : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो ! वासुदेवो-भट होता : तो दुर्वा जाला म्हणे : " म्हणौनि हरीयाळी श्रीकरें स्पर्सीली : " आवो होय होय म्हणे : वासुदेवो-भट दुर्वा जाला म्हणे : " तवं माहादाइसीं पुसीलें : " जी जी ! वासुदेवो-भट दुर्वा कां जाला जी ? " गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : पांखीरुं मारिलें म्हणे : तया पापातवं दुर्वा जाला म्हणे : " आणि माहादाइसें कांटाळलीं : ॥ २५३ ॥

**सांणुबाइ यां हो यातें खा म्हणणें** : ॥ गोसावी सांणुबाइयाचीय मढोलीयासि बीजें करीति : दोहीं श्रीकरें दोहीं दारसका धरीति : आणि भीतरि अवलोकीति : मग म्हणेति : " आवो तुम्हीं आहा म्हणे : नांहीं म्हणे : आवो आहाचि म्हणे : " म्हणौनि बीजें करीति : जयावरि गोसांवी कोपेति : तयातें म्हणेति : " सांणुबाइ ! यां हो तुम्हीं यातें खा म्हणे " कदाचीत मढली आंतु गोसांवी बीजें करीति : तयातें श्रीकरें स्पर्सीति : आणि म्हणेति : " आवो आतां यातें खा म्हणे : " म्हणौनि हास्य स्वीकरीति : आणि बीजें करीति : ॥२५४॥

**कोल्हापुरुनि आलीया : मातापुरा गेलीया म्हणणें** : ॥ एकु दीं गोसावियांसि माचयावरि आसन असे : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो कोल्हापुरुनि आलीया : मातापुरा गेलीया म्हणे : " मग आबाइसीं पुसीलें : " जी जी : कवणीं आलीया जी ! " गोसांवीं म्हणीतलें : " कोल्हापुरीचीया देवता येथचीय वोळगे आलीया : तीया मातापुरा गेलीया म्हणे : " ॥ २५५ ॥

**तुं वोपा नव्हेसि म्हणणें** : ॥ गोसावियांचा धाकटेपणीचा सांघाति एकु : गोसांवी तयातें धुमकेनि हाणितलें : तेणें म्हणीतलें : " हें काइ राउळ ! मातें धुमकेनि कां हाणितलें ? " आणि गोसावी तयांची वास पाहीली : मग

म्हणीतलें : " तुं बोपा नव्हेसि : नव्हेसि म्हणे : तुं भोइया नव्हेसि म्हणे :" म्हणौनि हास्य केलें : ॥ २५६ ॥

**पासोडीया वोसाडीसीं खेळु** : ॥ पासोडीयासि मधीं कमळ होतें : तेणेंसीं गोसावीं खेळु करीति : श्रीकरीचीया आंगुळीयाचेनि नखें खरवडीति : ऐसें ऐसें करीति : ऐसा तेणेंसीं खेळु करीति : हास्य करीति : मग तो फाटैल म्हणौनि म्हाइंभटीं चर्माची वोसाडी केली : चहुकडे चारी कसानियां लावीलीया : तीया चहु माचेनसीं वोढौनि बांधलीया असेति : मग गोसावी तयावरि श्रीकरें ऐसें खरवडीति : तीय नखें खरखरा वाजेति : आणि हास्य स्वीकरीति : आणि गोसावी म्हणेति : " आवो मेला जाय : फाडि फाडि फाडि नां म्हणे : " ऐसा खेळु करीति : मग पहुडु स्वीकरीति : ॥ २५७ ॥

**वांकीसीं खेळु** : ॥ गोसावियासि गुळुळा होय : मग पुजा अवसरु होय : मग श्रीचरणीं वाकि वोळगवीति : ते वांकि वाजे : आणि तेणेंसीं खेळु करीति : आणि म्हणे : " आवो मेली जाय : वोंय वोय करीत बोबात आहे : " म्हणौनि श्रीचरणु भुइसि हाणिति : तवं आगळीचि वाजे : मग श्रीकरें करुनि चरणांची वांकि काढीति : आणि मोडीति : टाकौनि घालीति : मग वेढे करीति : आणि म्हणेति : " ऐया माझा आतां होय म्हणे : " म्हणौनि म्हाइंभट मागुतीं वांकि करीति : मग आणीति : श्रीचरणीं वोळगवीति : आणि म्हणेति : " आवो मेला जाय : काद्या काद्या ?" ऐसें म्हणेति : ऐसा वांकीसीं खेळु करीति :॥२५८॥

**सांखळेनसीं खेळ** : ॥ सांखळें फुलीं गुडानि श्रीकरीं वोळगवीति : जवं पुजा होय तवं दोहीं श्रीचरणीं धरीति : आणि म्हणेति : " आवो मेली जाए : हे काद्या काद्या घालीतासि : ? " म्हणौनि खळकरि टाकीली : आणि बीजें करीति : सांकळेयावरि प्रवृत्ति नाहीं : ॥ २५९ ॥

**प्रतीबींबेसीं खेळुं** : रांजणीं अथवा माथणीसीं सुर्याचेया चक्राचें बींब देखेति : तें श्रीकरें करुनि धरुं जाति : तवं उदक आववें भांसळे : आणि नेदखेति : आणि म्हणेति : " आवो मेली जाय : यपते (पळते) म्हणे : " म्हणौनि श्रीकरु काढीति : मागुतें पाहाति : आणि देखेति : मागुता श्रीकरु घालीति : मागुतें पाणीं हालवें : तें हातासि न य : आणि म्हणेति : " आवो

जाय : गेला गेला म्हणे : " म्हणौनि हास्य करीति : ऐसा खेळु करीति :॥२६०

**रक्षादीप सीत नटणें** : ॥ गोसांवी जेथ राख देखति तेथचि आसन होय : दोन्हीं श्रीकर राखेवरि ऐसें ऐसे धरीति : आणि म्हणेति : " आवो मेली जाय : सीं वाजते म्हणे : " म्हणौनि राखेवरि तापेति : कव्हणीं पाचारीति : " राउळो ! हें ऐसें काइ करीत असा ? " आणि गोसांवी म्हणेति : " आवो मेली जाय : सीं वाजते म्हणे :" म्हणौनि हास्य स्वीकरीति : आणि बीजें करीति : ऐसा खेळु करीति : रात्रीं मढा-आंतु दीप लावीति : आणि तेथही बीजें करीति : दीवेयावरि श्रीकरु धरीति : ऐसे ऐसे करीति : आणि " हाय हाय : आवो मेली जाय : सीं वाजते म्हणे : " आबाइसें म्हणेति : " जी जी ! सगडी करुं जी ! " आणि गोसावी म्हणेति : " आवो मेली जाए " भणौनि हास्य स्वीकरीति : आणि बीजें करीति : मग पहुड स्वीकरीति : ॥ २६१ ॥

**जगळ-दरणेयाची सेवा स्वीकारु** : ॥ मग जगळदरणेनि गोसांवियांकारणें दांडी : चवर : नवा मांचा : दुटी : वांकि : सांकळे : कांबि : गंगाळ : तामाण : ताट : वाटे : वाटी : आरिसा : फणी : लोहे : दोनि तांब-कळस : झाडि : दुभतीया दोनि गाइ : १५ : तीया दुभेति : जवं उडेति : तवं असेति : मग पाठवीति : तवं तो दोनि आणीकी दुभतीया पाठवी : तीया अडापासि बांधलीया असेति : खरवडी कोंडा घालीति : चौ-आसुचीं फुलें पुजेसि लागेति : ऐसी पुजा करीति : मग गोसांवी बीजें करीति : ते बाटी गाइसि घालीति : मग दुहीजेति : तेव्हेळि गोसांवी आपुला ठांइं कोपु नटति : मग आबाइसें दुध वाढीति : ऐसी व्याळी होए : प्रतदीनीचा प्रसादु जगळदरनेयासि जाए : जेधवां प्रसादु जाय तेधवां जेवी : प्रसादेवीन तयासि जेवण नाहीं : ऐसा बदरीखा लाविला होता : ॥ २६२ ॥

**धामणें माउरें म्हणणें** : ॥ गोसांवियांसि वीचार-चीरेयावरि आसन होय : मग अनुकार करीति : " धामणया जावें कीं माउरेया जावें : आवो नाणौरी जावें कीं सौनौरी जावें : " ऐसें अनुकार करीति : मग जेथ बीजें करावयाची प्रवृति तेथ बीजें करीति : ॥ २६३ ॥

**सीराळें पुसदें म्हणणें** : ॥ मग गोसांवीं वेढे केले : आणि दुडुदुडु-

करि धांव घेतली : आणि वीचार-र्चारेयावरि उभे राहीले : मग अनुकार करूं लागले : "रामेंया जावें कीं साउरा जावें : सीराळेया जावें कीं पुसदेया जावें :" ऐसे अनुकार करीति : वीचारीति : मग जेथ बीजें करावयाची प्रवृति तेथ बीजें करीति : ॥ २६४ ॥

**नाथोबातें ठाउवां म्हणणें** : ॥ एकु दी गोसांवीं माचयावरि पहुड स्वीकरीला असे : बंबाळ दीवा पाजळत असे : आणि नाथोबा च्यारी पाहार बैसले असेति माचयाजवळि : गोसांवीं तयाचीय डोइयवरि श्रीकरु ठेवीति : आणि म्हणेति : "आवों तुं ठाउवा ठाउवा होसि म्हणे :" श्रीकरें स्पर्शीति : पोटळीतीं तांबोळ प्रसादु देति : मग पहुड स्वीकरीति : ॥ २६५ ॥

**सूर्यातें वरता य म्हणणें** : ॥ स्याळे दीसु एकु दी उदीयांचि गोसांवियांसि मादणें होत होतें : तें सीत वाजत होतें : श्रीकरें करूनि ऐसें सुर्या-कडे केलें : आणि म्हणीतलें : "आवो वरता वरता य नां म्हणे :" तवं पाहारा यकांचेनि मानें सुर्यू वरता आला : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेला जाय : तावि तावि नां म्हणे :" आणि सुर्यू खडतरीं कीर्णीं तपों लागला : मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेला जाय : आतां होय म्हणे :" मग सीत नीवा-रलें : मग मर्दनां जाली : मादणें जालें : ॥ २६६ ॥

**भुतानंदा क्षमालींगण देणें** : ॥ एकु दी गोसांवियांसि माचयावरि आसन असे : तवं भुतानंदें आलीं : तवं गोसांवीं माचेयावरूनि उठौनि तयासि क्षमा-लींगन दीधलें : भट वाजेस्वरा वीजना गेले होते : देउळा वायव्य कोंणीं बैसोनि नीरोपण करीत होते : तवं तेथ भुतानंदें गेलीं : दंडवतें जालीं : परि भेटतीचि नां : भुतानंदीं म्हणीतलें : "मज गोसांवीं क्षमालींगन दीधलें : तुम्हीं कां ने भटा !" तवं आवघीं हांसों लागलीं : गोसावियांसि क्षमालींगन नेदीति तरि कोणासि गा देती ? : मग आवघीं भक्तीजनें बीदारासि आलीं : तवं गोसांवीं उंच-मढाचेया से( सी )हाडेया इसान्यें बीजें केलें : तेथ भेटि जाली : मग भुतानंदीं म्हणीतलें : "जी जी ! मज मागुतें क्षेमालींगण दयावें जी : यें अवघीं ( मज ) हांसतें असेति जी ! भेटति नां जी :" मग गोसांवीं म्हणीतलें : "आवो मेली जाय : य य य नां म्हणे :" म्हणौनि मागुतें क्षेमालींगन दीधलें : अवघेयां भक्तीजनां

आश्चर्य जालें : मग भट प्रुक्ष (रव्य) करुनि समस्तें भक्तीजनें भेटलीं : मग भुतानंदाची श्रम-नीवृत्ति केली : पाय धुतले : मग आबाइसीं जेउं वाढीलें : मग जेवीली: आंचवली : ॥ २६७ ॥

**केसवनायका अग्नि( ग्नि )चातु सुचणें** : ॥ एकु दी गोसांवीं केसवनायकाचीय घोडवडीसि बीजें केलें : मग अनुकार करुं लागले : गोसांवीं म्हणीतलें : " आवो हें सुटैल : हें न सुटे म्हणे : आवो हें सुटैलाचि म्हणे : " तंव आगि लागली : गोसांवीं सूटैल म्हणीतलें : तें सुटलीं : एरें आवघीं घोडीं जळिनलीं : मग केसवनायकें म्हणीतलें : " राउळीं म्हणीतलें : तेंचि जालें : तैसीचि सोडितों कां तरि पसुवा वांचितीया : राउळ माय : राउळ बापु : राउळ इस्वरु : राउळ सांगति तें अन्यथा नव्हे : " ॥ २६८ ॥

**वीठल-नायका दरीसनीं दत्त कापुरु भुइं सांडणें** : ॥ वीठलनाएक ते तळेगावींचे : एकु दी गोसांवी उंच-मढांतु रीगतां उजवेया हातां सोंडीयवरि आसन असे : तवं वीठलनाएकु आले : गोसावियाचें दरीसन जालें : दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग तेहीं तळहातीं कापुर घेतला : आणि दृष्टि वोळगवीला : तो गोसांवीं तळहातु हाणितला : आणि कापुरु भुइं सांडला : मग वीठलनाएकें म्हणीतलें : " जी जी ! मीं वोळगों नेणेंचि जी ! " मग अवघा करंडाचि श्रीकरीं वोळगवीला : मग गोसांवीं तीं बोटीं घेउनि श्रीमुखीं घातला : मग म्हणीतलें : " ऐया माझा : आतां होय म्हणे : " मग वीठलनाएकें म्हणीतलें : " जी जी ! : बहुती धुरा देखीलीया : परि ऐसा कापुरु घेतकव्हणीं धुर देखीली नांहीं जी ! " मग गोसांवियासि दंडवत घातलें : श्री चरणा लागला : मग गेला : ॥ २६९ ॥

**जोग-नाएकाची वस्त्र-पुजा स्वीकारु** : ॥ एकु दी गोसांवियांसि मर्दना जालें : मादणें जालें : आवघीं वस्त्रें गोसांवियांसि दृष्टपुत केलीं : परि न स्वीकरीतीचि : तवं जोगनायकासि आठवलें : " मातें वस्त्र यक नळीयसि असे : तयाचें मोल एक ( तरी ) कव्हणांहीं देववेना : हांडीयाचीय सांदीं पडलें असे : तें काइ बरवें :" मग ते गेले : नळीचें वस्त्र काढुनि घेउनि आले : मग गोसांवियांसि वोळगवीलें : गोसांवीं म्हणीतलें : " ऐया माझा आतां होय म्हणे " मग तें

वस्त्र स्वीकरीलें : मग भटीं म्हणीतलें : " जी जी ! आतां कां नव्हे ! " गोसावीं म्हणीतलें : " आवों मेळा जाय : " म्हणौनि हास्य स्वीकरीलें : ॥ २७० ॥

**म्हाइंभट उपाहारीं रात्रीं करणें** : ॥ एकु दी म्हाइंभटीं गोसावि-यांचा ठाइं स्वेतू उपहारु केला : दहीं : वडे : मांडे : तांदुळाचा भातु : तांदु-ळाची क्षीरि : खीरि घारिया : काल(व)न : दुध : दहीं : अपार घेतले : साकर-माडे केले : साकरेचे लाडु तीळ्वें : ऐसा उपहारु नीपजवीला : आपण माहा-द्वारीं उभे राहीले : आणि ऐसा मनोर्थु केला : समाधान मानिलें : " मीं सदैउ : नां माझे इस्वरी ऐसें प्रवेसन होत असे : " ऐसा मनोर्थु केला : गोसावीं वीह-रणासि बीजें केलें होतें : रात्रि जाली : परि गोसावीं नेयतीचि : मग भटीं म्हणीतलें : " म्हाइंभटो ! तुम्ही काहीं मनोर्थु केला : एकी वासना : भावीलें ? : " म्हाइंभटीं म्हणीतलें : " हो भटो ! ऐसा मनोर्थु केला : माझें ऐसें इस्वरी प्रवेसन होत असे : तरि मीं सदेउ नां ? " भटीं म्हणीतलें : "आहा ! वोखटें भाविलें : कोणीकडे इस्वरु : आणि कोणीकडे तुमचा पदार्थु : आणि जीवातें काइ असे ? हें आवघें इस्वरीचें : आनित्ये (आणि तेणें) पदार्थ नित्य वस्तु पावों म्हणत असा : जा आतां गोसावियांसि आड पडा : " मग भट म्हाइंभट गेले : तवं दाभवीहीरीचेया वडाताळि गोसावियांसि आसन असे : तेथ म्हाइंभट आड पडीले : दुःख केलें : मग वीनवीलें : " जी जी ! उपहारु नासला जी ! " मग गोसावीं मढासि बीजें केलें : मग पडदणीं वोळगवीली : मग मर्दनां मादणें जालें : मग पुजावस्वरु जाला : मग आरोगणा जाली : एकी वासना : चाचले-स्वरीं : गोसावीं पहुड स्वीकरीला होता : तेथ वीनवीलें : मग मढासि बीजें केलें: ॥ २७१ ॥

**म्हाइंभट दुटीं विध्वंसणें** : ॥ एकु दी गोसावियांकारणें साटीं आसुचीं मेघवर्णी दुटी घेतली : आणि मनोर्थु भाविला : " मीं सदैउ भाग्याचा नां : माझें यसनें वस्त्र पाटाउं दुटी इस्वरी प्रवेसन होत असे नां : " ते समै गोसावियांसि मर्दनां मादणें जालें : मग दुटी वोळगवीली : आणि मनोर्थु भाविला : आणि गोसावीं कोपु नटले : पन्हीवा श्रीचरणावरि दुटी भुइंसीं घासीली : श्रीचरणवरि ओढिली : आणि म्हणेति : " घो(घा)पटीं होस न :

मसी घसी होस न : " म्हणौनि पऱ्हीर्वा चीखला आंतु घातली : श्रीचरणवरि चींखला आंतु कुसकरीली : मग भटीं म्हणीतलें : " म्हांइंभटो ! तुम्हीं आपुला जीवीं कांहीं तोखलेति ? " " म्हांइंमटीं म्हणीतलें " हो भटो " भटीं म्हणीतलें " आहा म्हांइंभटो ! चोखटें केलें : घाला घाला दंडवत :" मग तेहीं दंडवत घातलें : दुःख केलें : मग श्रीचरणा लागले : मग टुटी धुतली : मग स्वीकरीली : ॥ २७२ ॥

**म्हाइंभटवर्णी सांडणें** : ॥ पांणीं सारावयाचें उलींग तीपुरारि-भटाचें : तें एकु दी म्हाइंभटीं गंगाळभरि पांणीं सारिलें : गोसांवीं बीजें केलें : चौरंगावरि आसन जालें : आंणि पांणीं ऐसें अवलोकीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेळा जाय : हें तें नव्हे म्हणे : हें माइंभटवर्णी होय म्हणे : " म्हणौनि सांडिलें : मग जवं लोहेभरि पांणीं तापें तवं तैसेचि आसनीं बैसले होते : मग तीपुरारि-भटीं उदक सारिलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया माझा आतां होय म्हणे !" मग मादणें जालें : वस्त्र वेढिलें : गोसांवियांसि जें जयाचें उलींग तें तेणेंचि करावें : एरासि करुं नेय : ॥ २७३ ॥

**म्हाइंभट दत ( धूत ) जांणीवें सांडणें** : ॥ एकु दी गोसांवियासि मर्दनां मादणें जालें : म्हाइंभटीं यज्ञोपवीतासि चोखणीं लावीली : चोखट घासिलें : बरवें धुतलें : मग श्रीकरें ओळगवीलें : आंणि गोसांवीं चीखला आंतु घातिलें : मग कुसकरिलें : मग म्हणीतलें : " आवो मेळा जाय : घे घे घे ना म्हणे : " मग तीपुरारि-भटीं चोखट धुतलें : मग गोसांवियांचा श्रीकरीं ओळगवीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया माझा आतां होय म्हणें : " मग मादणें जालें : वस्त्र वेढिलें : मग पुजा-अवस्वरु जाला : ॥ २७४ ॥

**सारंग-पंडीता भेटि** : ॥ सारंग-पंडीत वाराणसी नीगाले : ते रीध-पुरासि आले : भक्ती-जनांसि भेटि जाली : भक्तीजनातें सारंग-पंडीतीं म्हणतिलें : " तुम्हीं मज श्रीप्रभु दाखवु नको : मज येळापुरीं गोसांवीं श्रीप्रभु दाखविले असेति : ते मींचि ओळखइन : " " हो का : " मग गोसांवियांसि उपहुड जाला : मग रार्यांगणीं वेढे करित असेति : तवं सारंग-पंडीत आले : उंच-मढाचेया स्याहाडेया समीप दरीसन जालें : मग दंडवत घातलें : श्रीचरणा लागले :

" हृदयभज परेसं स्वामिनं गुंडमाक्षं(ख्यं) " हा श्लोकु बोळगवीला : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेळा जाए : हा तो नव्हे म्हणे : " आणि सारंग-पंडितीं हडुतीं मान घातली : मग सारंग-पंडीतीं गोसांवियांतें उपहारालागीं बनिवीलें : मग गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : मग आवघे पदार्थ आणुनि आबाइसाचा हातीं दीधलें : मग आबाइसीं उपहारु नीफजवीला : मग गोसांवियांसि पडदणीं वोळग-वीली : मग मर्दना मादणें जालें : पुजा केली : बरवें वस्त्र वोळगवीलें : मग धुपारति मंगळार्ति जाली : मग ताट केलें : आसन रचीलें : मग गोसांवीं आसनीं उपवीष्ट जाले : मग भक्तजनासहीत आरोगणा जाली : मग गुळुळा वीडा जाला : ऐसें आवाडिपूर्वक बरवें केलें : मग गोसांवीं म्हणीतलें : "ऐसा माझा : आतां होय म्हणे :" ॥ २७५ ॥

**ठ(ढु)लु बाइया ठोंबरा खादला म्हणे** : ॥ एकु दी गोसांवीं म्हणी-तलें " ठोंबरेया(चा) वाटा होइल म्हणे : तोही पडैल म्हणे : आवो ठोंबरा ठोंबरा खादला म्हणे : " ॥ २७६ ॥

**भटां नांम पुत्रत्व करणें (भटपुत्रा नाम करणें)** : ॥ एकु दी गोसांवीं म्हणीतलें : " आवो हरीमेयांचा हरीमा होय म्हणे : " गोसांवीं वैराग्य-देवातें यत देखीलें : मग म्हणीतलें : " आवो मेळा जाय : हरीयेयांचा हरीमा आला मा : " सातां वरीखांचे वैराग्यदेव : गोसांवियाचीय मांडीयवरि मुंजीबंधन जालें : वऱ्हाड कीजे ऐसी मुंजि केली : ऐसा गोसांवीं तयासि सोहळा केला : मग बारां वरीखां भटांपासौनि धर्म-श्रवण जालें : नेचि अनुसरण : मग आउठां वरीखा परमेस्वर दरीसना गेले : ॥ २७७ ॥

**वोडण-झडपा घरां पुजा आरोगणा** : ॥ गोसांवीं आवघयांचियां घरांसि बीजें करीति : परि वोडणझडपाचीया घरासि कहीचि बीजें न करीतिचि : मग एकु दी गोसांवीं वोडणझडपाचीया घरासि बीजें केलें : सरीसें भट माइंभट होते : वोडणझडप ते रजपुत : थोर दुर्गळ : ते घरा नव्हते : खेडासि गेले होते : मग बीजें केलें : तवं तयाची राणी दारा आड उभी राहीली : ते गोसांवी थापा हाणौनि परती लोटीली : मग भीतरि बीजें केलें : उतरडीचे डेरे दोंदेसि धरुनि उत्तरीति : समोर आणिति : आणि माजिघरीं फोडीति : तेवीचि लाट्टांकेति : तळि :

तांदुळ : गहु : जोन्हळे : उडीद : चवळे : ऐसें आवघे यकत्र केलें : तवं वोडणझडपातें यत देखीलें : आणि भट म्हाइंभट भेओं लागले : ' हा थोरु दुरळु कैसें होईल पां ' : म्हणौनि साउमे दारवठेयापासि गेले : मग भीत भीत भटीं म्हणीतलें " वोडणझडप हो ! तुमचेया घरासि राउळ बीजें केलें असे : " तेणें म्हणीतलें : " माझें दैव भाग्य :" "नां तुमची अस्त्री दाराआड उभी राहीली : ते धापा हाणौनि परती लोटीली : " तेणें म्हणीतलें : " पापीणि गोसावी आलेयां दाराआड केसी राहीली : राउळ मारीतांचि नां : " भटीं म्हणीतलें : " नां तुमची आवघी राहाटी फोडीली :" तेणे म्हणीतलें : "बरवें केलें : आतां मज गोसांवी तांबेयाची राहाटि देति : " मग तो घराआंतु गेला : तव गोसांवी भय नटले : वोजें करूं आदरीलें : तवं तेणें म्हणीतलें : " जी जी ! आतां कें जाइजैल? : " म्हणौनि आड पडीला : गोसांवियांतें वीनवीलें : मग बाज सुपवती घातली : तेथ गोसांवियांसि आसन जालें : मग तेणें हाटांतुन कणीक : तांदुळ : चवळे : तुप : केळें : ऐसें आणीलें : कासाराचीय घरुनि तांबीयाची राहाटि आणीली : एकी वासना : घरांचि आवघी तांबेयाची राहाटि जाली : सोन्याची मागतां तरि सोन्याची होती : मग भटां म्हाइंभटां नीरोपु दीधला : मग गोसांवियांसि पडदणीं दीधली : मग मर्दनां मादणें जालें : तवं म्हाइंभटीं रंधन केलें : मग गोसांवियांसि बरवी पुजा केली : वस्त्र वोळगवीलें : मग ताट केलें : मग आरोगणा जाली : मग भट म्हाइंभट गोसांवियांचीय दृष्टीसमोर जेवीले : तयांसि पांती जेवण जालें : मग गोसांवियांसि गुळूळा वीडा वोळगवीला : मग गोसांवीं मठासि बीजें केलें ॥ २७८ ॥

**तुतेकारपुर्वक संन्यासी वीपलाणें** : ॥ न्याय-सारथी वारानसी-हौउनि खेडासि आले : तयांसवें पांचसे संन्यासीयां होतीं : तयांसि केसवनायकु आंणावया म्हणौनि साउमे गेले : तयांसि भेटि जाली : केसवनायकें म्हणीतलें : " आंमचेया गावांसि यावें : " तीहीं म्हणीतलें : " नां तुमचेया गांवांसि नेयों : " केसवनायकें म्हणीतलें : " कां नेया ? " " नां तेथ राउळ असेति : ते भ्रष्टाभ्रष्ट करीत असेति : तयासि जरि नेमु होवैल : तरि आम्ही एउनि " केसव-नायकें म्हणीतलें : " राउळ समर्थ : राउळाचा गांवें : राउळांसि आमचेयांस्तव नेमु कैसा होवैल ? : ऐसें आहे :" मग तीहीं म्हणीतलें : "तरि आम्हीं आचारुनि : मग

येउनि :" मग तीहीं अवघां वीचारीलें : सारिवीं म्हणीतलें : "केसवनायकु थोर माणुस : हे म्हणताति तें करावें : जावें लागेल : " मग न्यायभारथी म्हणीतलें : " जा : आम्ही एउनि :" मग केसवनायकु आले : घरीं आवघी आइति केली : तवं संन्यासी देवाळेयासि आले : तेथ राहीले : मग आवघें रांधाले : मग केसवनायकाची स्त्री मांचळीयवरि बैसोनि मांडे पुरियाचीया घडीया करीत असेति : तवं तेथ गोसांवीं बीजें केलें : तीयें माचळीवरूनि उठीली : तेथ गोसावियांसि आसन जालें : मांडे पुरियाचीया घडीया करूं लागले : पहीलें व्यतिक्रमें केलीया : मग अनुक्रमें केलीया : पहीलें व्यतिक्रमें गणोलीया : मग अनुक्रमें गणीलीया : तवं पुढीचीय वेळे संन्यासी आले : मग केसवनायकें कांबले बैसों घातलें : न्यायभारथी मुख्य करुनि आवघेचि बैसले : मग मंडळ केलें : आधीं मंडळीं गोसावियांचे श्रीचरण प्रक्षाळीले : मग न्यायभारथी याचे धूतले : मग एरां आवघयांचे धुतले : मग आधीं गोसावियांसि टीळा केला : मग आवघेयां केलें : मग अक्षता केलीया : मग गोसावियांसि सीरा ताट केलें : मग ते आवघे गोसावियांखालि बैसले पत्रावळि मांडीलीया : मग तयां आवघयांसि वाढिलें : मग केसवनायकें आनुज्ञा दीधली : मग गोसावीं यथोचीत आरोगण केली : ते आवघे जेवीले : मग गोसावियांसि गुळुळा जाला : ते आवघे आंचवले : नव्हा राजणांची पाणवै यकींचि : एकी सारणीं पाणीं जाय : तीयवरि गोसावियांसि आसन : मग गोसावियांसि अधीं वीडा वोळगवीला : मग आवघेयांसि : लवंगा जायफळाची मुख-सुधि दीधली : मग गोसांवी हरीयाळीसि पांन पुसीत : मज जाणुवरी पुसीति : मग वीडीया करुनि श्रीमुखीं घालीति : मग संन्यासीं म्हणीतलें : " पुरुषाचा ठांइं प्रपंच साम्यथा( ता ) बरवी असे : हा प्रपंचु : तैसा तो प्रपंचु " ऐसा वीडा घेतला : मग गोसांवीं मढासि बीजें केलें : मागिला कडुनि ते आवघे मढासि आले : मग उंच-मढा पुढें म्हाइंभटीं जाडी बैसों घातलीया : ते आवघे बैसले : गोसावियांसि वेगळे पाट गादीयवरि आसन : पाटाउं गरुड-नीळ दुटी प्रावर्ण केली असे : श्रीमुखभरि तांबोळ असे : मग गोसांवीं म्हाइंभटाची वास पाहीली : परि म्हाइंभटासि उमटेचि ना : मग भटीं म्हणीतलें : " म्हाइंभटो ! यासि काइ बोलावें ऐसी गोसावियांची प्रवृत्ति असे : " मग म्हाइंभटीं ' जीवनमुक्त ' हा प्रश्नु केला : म्हाइंभटीं म्हणीतलें " जीवनमुक्त तो कैसा ? " यावरि उभाणि झाली : तेहीं म्हणीतलें : " जीवन-

मुक्त तो ऐसा ऐसा : " मग म्हाइंभटीं म्हणीतलें : " तो ऐसा नव्हे कीं " म्हणौनि आक्षेपु केला : मग तयातें अडीलें : मग गोसांवीं हास्य केलें : तेह्वळि श्रीमुरतीचें तांबोळ उसळलें : तो भक्तीजनीं प्रसादु घेतला : मग 'जीवनमुक्त वस्तु ते ऐसी :' म्हणौनि गोसांवियाकडे दाखविलें : तेहीं म्हणीतलें : " ऐसें होय : " मग गोसांवीं म्हणीतले : " आवो मेला जाय : टोळे टोळे होती म्हणे : " तीहीं म्हणीतलें : "जी जी ! : टोळ ते आम्हींचि कीं :" " आवो मेला जाय : तुतेकार तुतेकार होती म्हणे : " तेहीं म्हणीतलें : "जी तुतेकार ते आम्हींचि कीं : संन्यासु तो गोसावियांचा कीं : " मग म्हाइंभटीं आववीयांसि टीळे लावीले : अक्षता केलीया : मग ताटभरि लवंगा जाएफळें आणीलीं : तयासि मुखसुधि दीधली : मग न्यायभारथी गोसावियातें दडवत केलें : मग आवघेचि गेले : ।। २७९ ।।

**सींमुगा सींपणें** : ।। गोसावियासि वृधाप्य सींमुगा आला : आवघे चाटे खेळे दारवठां बोबावों लागले : मग गोसांवी कांपत कांपत मांचेयावरु(रो)नि उतरले : मग दारवठेयापासि बीजें केलें : तवं दारवठा घातला असे : भो(भू) आगळ घातली होती : ती उपराठी आगळ उघडीति : भटीं म्हाइंभटातें म्हणीतलें : " गोसावियासि खेळावयाची प्रवृत्ति असे : " मग कवाडें उघडीलीं : आणि तीहीं खेळां टाळीया वाइलीया : " आरे ! धुर धूर " म्हणौनि घोटेवरि गोसांवियांसि सींपीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय :" म्हणौनि कोनेसीं दडले : मग तीहीं गोसावियातें दांडी वाउनि नेले : मग गोसावियांचे धाकुटें-पणीचे सवंगडे म्हातारपणीं खेळावया नीगाले : मग चार्‍ही पाहार रात्रीं बाळकाचीया ऐसीया क्रीडा केली : चीखलु : माती : राख : सेन : ऐसा खेळु केला : मग : कापुरु : कस्तुरि : चंदन मळणें : सेंदुर ऐसा खेळु जाला : मग मृदांग काहाळा तुरे टीपरि ऐसा खेळु खेळीनलें : मग मढासि बीजें केलें : मग मर्दना मादणें जालें : मग नी(य)मस्तु पुजावस्वरु जाला : ।। २८० ।।

**द्राविडां भेटि** : ।। द्रावड देसीचेनि ब्राह्मणें एकें भवीक्ष(ष्य) पुराण पाहीलें : एकी वासना : कल्पीं(काऱ्यीं) नीगाले : वींक्षा तळवटीं वराड देसु खेड रीधोरें गाओं : तेथ इस्वर अवतार अवरतरला असे : कांणवा ब्राह्मणाचां ठांइ : मग तेणें ब्राह्मणें म्हणीतलें : " काइ पां हें सास्त्र सत्य कीं मीत्थ (थ्या) :

पांहां नां कां : " म्हणौनि : सकुटुंबी नीगाला : सोधीतु सोधीतु वराड देसासि आला : सर्वे उगाणयाचा बैलु : स्त्री : दोघें लेंकरुवें : तवं गोसावी तेलाळेयापासि पांच-पींपळेयासि खेळु करीत असेति : उत्तरेचेया पींपळा उत्तरे भेटि जाली : सास्त्रीची अवघीयां खुणां पाहीलीया : मग तेणें म्हणीतलें : " आपण काइ ? " मग गोसांवीं श्लोकु म्हणीतला : " नाहं मनुष्यो न च देवयक्षौ न ब्राह्मण-क्षत्रियवैश्यशूद्राः । न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्न चाहं नीजबोधरूप :" मग तेणें दंडवत केलें : श्रीचरणा लागला : स्त्री-लेंकरुवं श्रीचरणावरि घातलीं : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया मेला जाय : आतां होय म्हणे : " तैसेंचि गोसांवीं मढासि बीजे केलें : सरीसें तेहीं आले : एकी वासना : मढाआंतु रीगतां उजवेया हातां पटिसाळेवरि भेटि जाली : तयाची बोली कळे नां : मग म्हाइं-भटीं संस्कृतें पुसलिं : मग तेणें म्हाइंभटातें आवघें सांगितलें : मग तयासि श्रीपुरखीं बीढार दीधलें : गोसावियाचे श्रीचरण उदकें सींचन केलें : मग तुळसी वाइलीया : चरणोदक भीतरि घेतलें : मग आपुलीय भाखा स्तुति केली : " आजि माझेया सास्त्र-अभ्यासाचें सार्थक जालें : जें गोसावियांसि भेटि जाली " मग ते बीढारासि गेले ॥ १८२ ॥

**द्रावडांचां उपहारु स्वीकारु** : ॥ मग उदयांचि ते गोसांवियांचीया दरीसना आले : गोसांवियांसि दंडवत धातलें : मग उपहारालागि वीनवीलें : गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : मग ते बीढारासि गेले : तेहीं आपुलीय देसीचे तांदुळ आणिलें होते : तयांचि रसांतु खीरि रांधीली : सोलेयाची पत्र-साक रांधीली : पांच भेले : सेरु साकर : तेरा केळे : वाटीभरि तुप : ऐसी गोसांवि-यांसि आरोगणा दीधली : मग आपुलें देसीचें वस्त्र आंणीलें होतें : तें गोसांवि-यांसि वोळगवीलें : ऐसी बरवी पुजा केली : पांच दीस होते : मग नीगतां गोसांवियांपासि आले : गोसांवियांसि दंडवत घातलें : श्रीचरणां लागले : पांच परीसा केलीया : मग दोन्ही श्रीचरण मस्तकावरि ठेवीलें : मग गेला : तया नाम कृष्ण-भट : ॥ २८२ ॥

**कुरें मातांग श्रीवडी स्वीकारु** : ॥ कुराचा मातांगु तो तीं वस्त्रे बरीसा दीसा( चीं ) वीनें : तयासि म्हाइंभट तीं वस्त्रांचीयां चौथरीया साटि आसु

देति : मग एकु दी तेणें म्हणीतलें : "एका वस्त्राचीया वीस आसु मीं नेघे : माझी यक वस्त्र गोसांवियांसि प्रवेसन करावें : नांहीं तरि मीं वीकतें नेदीं : एकी वासना न वींणे :" तयासि वरीसा दीसा चाळीस आसु देति : तया चाळीस आसुची दोनि वस्त्रें आणि एक ते याचें ऐसीं त्ररीसा दीसा त्रींवडि वोळगवीली : ॥ २८३ ॥

**पांगुळा पाय देणें** : ॥ एकु दी एकु पांगुळु दारवठां बैसला होता : तयाची माय गावांतु गेली होती : तवं गोसांवीं तयापासि बीजें केलें : आणि तयातें दृष्टि तावीलें : मग म्हणीतलें : "मेला जाय : उठि उठि उठि नां म्हणे :" मग तो उठीला : गोसांवियांसि दंडवत केलें : श्रीचरणा लागला : मग चालत आपलीय माएपासि गेला : तया माया म्हणीतलें : " हें काइ रे बा ? " तेणें म्हणीतलें : " नां : आतां राउळीं मज पाय दीधले : राउळ माय : राउळ बापु : राउळ समर्थ : राउळ करीति ते काइ नव्हे ! " मग ते मढासि आलीं : एकी आसु गोसांवियांचीयां दरीसना केली : दंडवत केलें : मग गेलीं : ॥ २८४ ॥

**मुकया वाचा देणें** : ॥ एकु दी गोसांवियांसि माह्याद्वारीं आसन असे : एका ब्राह्मणाचा आंडोरु तो मुका : ' उं उं ' करी : परि सबादु बोलु फुटे नां : गोरा : गोमटा : हळदीसा : परि वाचेवीन आमळु (आंगळु) जाला : तयाचेया (माया) आपुलेया म्हणीतलें : " हें काइ : राउळापासि घेउनि जा : मग राउळातें वीनवा कां : " मग एकु दीसीं घेउनि आला : गोसांवियांसि दरीसन जालें : दंडवत केलें : गोसांवियांतें वीनवावें तवं गोसावीं म्हणीतलें : " आवो मेला जाए जाए : " म्हणौनि आंडोरातें धुमकेनि हाणितलें : आणि तयाची पाठि घेतली : मग ते " आगा बा आगा बा " करीत बोबाइलें : तयासि गोसांवीं वाचा दीधली : मग तयाचेनि बापें म्हणीतलें : " आरे ! तुज राउळीं वाचा दीधली : राउळ माय : राउळ बापु :" मग तेणें गोसांवियांसि दंडवत केलें : मग तयातें घेउनि गेला : ॥ २८५ ॥

**लक्ष्मींद्रया चारु नांम करणें** : ॥ लक्ष्मींद्रबा ते नासलें : वीटलें : खरवडि : कोंडा ऐसें जेवीत होते : तवं गोसांवीं तेथ बीजें केलें : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : चारु चारु होय म्हणे : आवो मेला जाय : चामु चोरु चामु—चोरु होय म्हणे : " ते वेव्हारीं थोर पुश्चळ होते : मग लक्ष्मींद्र-

बासीं म्हणीतलें : " जी जी ! मींया थोर चाम–चोरी केली जी : ऐसा पापीया जी ! " म्हणौनि श्रीचरणा लागले ॥ २८६ ॥

**तळु उपरु जाणवणें :** ॥ एकु दी गोसांवी वेढे करीत होते : तवं अडुखळले : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : तळु न म्हणे म्हणे : उपरु न म्हणे म्हणे : " तीयें दीउनि भक्तिजनें तळु उपरु जाणवीति : राज–मढाचेया उंबरवटापासि पटिसाळ उतरतां भक्तिजनें म्हणेति : "जी जी तळु जी !" पटिसाळेवरि चढतां म्हणेति " जी जी ! उपरु जी ! " ऐसें म्हणेति ॥ २८७ ॥

**प्रतबींबेसी खेळु :** ॥ गोसांवीं अडापासि बीजें करीति : कांठीं उभे राहाति : आंणि अडाआंतु श्रीमुख पाहाति : आपणयां आपण बोलेति : आंपणयां आपण गोष्टी करीति : नखें खाड वींचुरीति : हास्य करीति : आडांतु श्रीकरु घालीति : कदाचीत आडाचा कांठीं लोंबतां श्रीचरण आसन होय : ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ २८८ ॥

**इस्वरनायका रोगभयं नीवृति :** ॥ इस्वर–नायकाचे वऱ्हाड जालें मग घरासि वरात आली : मग वौहर गोसावियासि दंडवतां आंणीलें : तयासि रोगु होता : रोडीके ऐसे दीसेति : बरवीं अनें [ न्नें ] : तुपें : तांदुळे : जेवीति : परि रोगें–करुनि काष्टवत जाले होते : गोसांवियांसि मांचेयावरि आसन : तवं वौहर आले : गोसांवियांसि दंडवतें घातलीं : श्रीचरणा लागले : आंणि इस्वर–नायकातें पाठीवरि धुमकेनि : हांणितलें : आंणि म्हणीतलें : " आवो मेला जाए जाए जाए नां म्हणें " आंणि तयाचा व्याधि गेला : मोटे–धाटे जाले : ॥ २८९ ॥

**सोणेसळेयां गव्हाची रोटी आरोगणें :** ॥ एकु दीं तीहीं सोनेसळेया गहुवांचीया रोटीया केलीया होतीया : तेयां नांवं सीतोमीतो : मग लुगुडां गूंडुनि सुपीं झांकुनि ठेविलीया होतीया : तवं गोसांवीं तेथ बीजें केलें : रोटीया काढीलीया : आरोगणा केली : तवं तीया बोबांओं लागलीया : " आवो माझीया रोटीया राउळीं खादलीया : आतां मीं काइ करुं? :" म्हणौनि बोबांओं लागलीया : तवं गोसांवीं बीजें केलें : मग म्हाइंभटीं तयाचे गहुं दीधले : ॥ २९० ॥

**पक्षकर्दमातें ओकरू म्हणणें** : ॥ कापुरु : कस्तुरि : चंदन : कुंकुम : केसर : गंहुले : ऐसा यकत्र एक्षकर्दमु गोसावियां कारणें करीति : आणि गोसांवीं म्हणेति : " आवो मेला जाए : हा ओकरु ओकरु होए म्हणे : " मग सर्वांगीं मोरि करीति : मग लल्हाटीं टीळा रेखीला : भांगीं जवादि भरीली : ते श्रीकरें करुनि पाहाति आणि म्हणेति : " आवो मेला जाय : होय म्हणे : " म्हणौनि हास्य स्वीकरीति : ॥ २९१ ॥

**जवादितें श्लुष्मां म्हणणें** : ॥ एकु दी गोसांवियांसि मर्दनां मादणें जालें : सर्वांगीं चंदनाची मोरि केली : ललहाटीं अर्धचंद्र टीळा रेखीला : मग भांगीं जवादि भरिली : ते श्रीकरें करुनि पाहाति : आणि म्हणेति : " आवो मेला जाय : हा श्लुष्मा श्लुष्मा होय म्हणे : " म्हणौनि भांगीची जवादि श्रीकरें करुनि भींतीसि पुसीति : ॥ २९२ ॥

**कापुरु मागणें** : ॥ एकु दी गोसांवियांसि कापुराची प्रवृत्ति जाली : तो देसीं कापुरु तुटला होता : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : कटक-देवगीरीसि जाय नां म्हणे : आवो ! तेथ केसव-नायक वेव्हारा असे : तयाचीय घरीं भुयरीं अमुकीय मांदुसे असे : अमुकीय पेटि असे : उदय-भास्करु असे : तो आंणावा म्हणे : नांणावा म्हणे : आवो आंणावाचि म्हणे : " मग भट म्हाइंभट कटक-देवगीरीसि गेले : मग पुसत पुसत केसव-नायकाचीया घरासि गेले : तयातें पुसिलें : " तुमतें उदय-भास्करु कापुरु असे ? " तेणें म्हणीतलें : " नाहीं " मग भटीं म्हाइंभटीं म्हणीतलें : " नां भुयरीं अमुकीय मांदुसे : अमुकीय पेटी असे : " तयासि आठवलें : तेणें म्हणीतलें : " तुम्हीं केवि जाणां ? : आणि इतुकेया मोलाचा कोणां कारणें घेत असा ? " भटीं म्हाइंभटीं म्हणीतलें : " नां आंमुचे राउळ असेति : तेंहीं सांगितलें : तया कारणें घेत असों : " मग तेणें म्हणीतलें : " नां गुंजभरि कापुर माझा राउळा कारणें नेयाल आणि माझी यकि भीक्षा घेयाल तरि मीं तुम्हासि कापुरु देइन : " मग म्हाइंभटीं भटाची वास पाहीली : भटीं म्हणीतलें " घेया : आपुलीया चाडा घेइजे : कां पुढलिाचा प्रीती घेइजे : कां आपुली अवीधि चुकवावया घेइजे : कां पुढीलाचा अवीधि चुकवावया घेइजे : मां परमेस्वराकारणें काइयक न कीजे ? " मग भटीं म्हाइंभटीं म्हणीतलें : " आम्हासि भीक्षा देया : "

तेणें म्हणीतलें : " नां एथाचि जेवावें :" मग भटीं म्हांइंभटीं म्हणीतलें : "नां : हो कां " म्हणौनि मानीलें : तो वाडमार्गीतु : तेणं बरवे पदार्थ नीपजवीले : मग ताटें केलीं : वाटीयां तुप घातलें : एका वाटीय मदीरा घातली : ऐसीं ताटें केलीं : मग भटासि म्हांइभटासि बोलावीलें : मग बैसले : तयासि आपोसणें घातलीं : मग भटीं म्हांइंभटीं पवीत्रा आंगुळीया करुनि घेतलें : मग वाटीया खालि ठेवीलीया : आंणि तयासि थोर सुख जालें : मग ते जेवीले : आंचवले : मुख-सुधि दीधली : मग दोनि गुंजा कापुरु वीकतु दीधला आंणि आपुला गुंजभरि दीधला : मग रीधपुरासि घेउनि आले : मग कापुरु गोसांवियासि वोळगवीला : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐया माझा : आतां होय म्हणे " म्हणौनि स्वीकरीला : ॥ २९३ ॥

**नखें फेडीतां वारिका सीक्षापणें :** ॥ एकु दी गोसांवियांसि रीगतां डावेया हातां पटिसाळेवरि आसन असे : म्हांइंभटीं वारीकु बोलावीला : तेणें बरवीं नखें चोखीं फेडीलीं : तयासि म्हांइंभटीं एकु दामु दीधला : आंणि गोसांवीं तयातें थापा हाणितलें : आंणि म्हणीतलें : " आवो जाए जाय नां म्हणे :" तेणें म्हणीतलें : " जी जी ! म्यां आगळें घातलें : म्हणौनि गोसांवीं मज सीक लावीली जी ! बरवें केलें जी ! " म्हणौनि श्रीचरणासि लागला : ॥ २९४ ॥

**दर्पणीं प्रतबींबेसीं खेळु :** ॥ रीगतां डावेया हातां पाटिसाळेवरि आसन असे : तेथ तया आरीसयापासि बीजें करीति : उकड आसन होय : मग आरीसां श्रीमुख पाहाति : श्रीकेंस खाड वींचुरीति : केसकळाप सरीसे करीति : मग अनुकार करीति " आवो बोलते म्हणे : गोष्टी करीते म्हणे : आवो हांसते म्हणे : आवो नटते म्हणे : " म्हणौनि श्रीकरु आरीसां लावीति : ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ २९५ ॥

**ताक पी माइला ताक पी लुखीए म्हणणें :** ॥ माइला तो केसवनायकाचा दाळीदी : लखी ते बटीकी : माइला तो थाळाभरि ताक आंबील घेउनि जेवी : आंणि लुखी तेही जेवीति असे : तवं गोसांवीं बीजें केलें : आंण ते (यां) आंतु बेसेति : आंणि ताक आंबील ओरपति : आंणि

म्हणेति : " ऐया माझा : आतां होय म्हणे : " ऐसी दोघा सरिसी प्रतदीनीं आरोगणा करीति : मग तीयें देवें सरलीं : मग गोसांवी मढी आरोगणा करीति : सेवटीं ताक-भाताची आरोगणा होय : तेथवां तीन चुळ ताकाचे आरोगणा-स्थानीचिया खांबां बुडीं घालीति : मग म्हणेनि : " ताक पी माइला ! ताक पी लुखीय !" तीन वेळ म्हणेति : ऐसें प्रतदीनीं करीति : ॥ २९६ ॥

**करवतांचें उदकपांन** :॥ उंच-मढाचीया पानाळातळीं सीळा होतीया : तयां सीळा मध्यें सीळाडीया वरीली सेवटीं करवतां होता : गोसावी बाहीरीली कडूनि बीजें करीति : आणि करवतेयापासि उकड आसन होय : श्रीकरीं करवता घेति : आणि म्हणेति : "आवो मेला जाय : वरता वरता य नां म्हणे :" आणि सरकरि वरता ए : आणि श्रीमुखीं धारुकें घालीति : मग उदक स्वीकरीति : मग म्हणेति : "ऐया माझा आतां होय म्हणे :" म्हणौनि सोडौनि देति : आणि बटकरि करवताखालि : बैसे : मग मढा आंतू बीजें करीति : ऐसाचि सीळाडीयासि खेळु करीति : ॥ २९७ ॥

**माहाकाळ माहालक्ष्मीए क्रीडा** :॥ गोसावी माहाकाळ माहालक्ष्मीएचीया देउळासि बीजें करीति : मग माहाकाळ माहालक्ष्मी श्रीकरें स्परीसति : आणि म्हणाति : " आवो तुं यथ आहासि : आवो मेली बोले नां म्हणे : आवो बोल बोल म्हणे : " आणि हास्य स्वीकरीति : माहाकाळीतें म्हणति : " आवो ! तो एकु काळु : तुं माहाकाळी होसि म्हणे : " ऐसा खेळु करीति : मग बीजें करिति : ॥ २९८ ॥

**महेश्वरभटां-करवीं जाणिवें सांडवणें** :॥ एकु दी गोसावियासि मर्दनां जाली : मादनें होत असे : गोसावीं श्रीकंठीचें जाणिवें काढूनि चौरंगावरि ठेविलें होतें : तवं महेश्वरभट आले : तींहीं जाणिवें घेतलें : घांसो बैसले : आणि गोसांवी कोंपु नटले : आणि म्हणीतलें : " आवो मेला साडि साडि सांडी नां म्हणे :" मग तीहीं जाणिवें ठेवीलें : मग तिपुरारिभटीं जाणिवें धुतलें : मग श्रीकंठीं वोळगवीलें : मग मादनें जालें : ॥ २९९ ॥

**समसान प्रेत जीववणें** :॥ एकु दी परस ना(य)काचा पुत्रू सरला : तो गांवां इसान्य कोनीं नगरेश्वरु तेथ नेला : सरण रचीलें : वरि घातला : मग

समसान-पींडु दीधला : पाइंतीं अग्नि पेटवीला : मग धार दीधली : पाइंतीं घागरि फोडीली : तवं गोसावीं तेथ बीजें केलें : मग म्हणीतलें : " आवो मेला काढि काढी नां म्हणें : " तीहीं म्हणीतलें " जी जी ! आतां काइ काढाल ? वाङुवेळु जाला जी ! " गोसावीं म्हणीतलें : " आवो मेला काढी नां म्हणे : " म्हणौनि वरीली सेणीं श्रीकरें टाकीलीया : परतीया केलीया : आणि श्रीकरें तोंडा-वरि हाणितलें : आणि म्हणीतलें : " आवो मेला उठि उठी नां म्हणे : " आणि जीयाला : खडबडौनि उठीला : बस्त्रें वेढीलीं : तयासि आश्चर्य जालें : " आरे ! परस-नागकाचा पुत्रू राउळीं राखीला : राउळ मायें : राउळ बापु : राउळ समर्थ : राउळ करीति तें काइ नव्हे ! " ॥ ३०० ॥

**उपडौनि पडवाळि लावणें** : ॥ एकु दी गोसावीं ब्राह्मणा एकाचेया घरासि बीजें केलें : तीहीं पाणवैएवरि पडवाळि लावीली होती : ते गोसावीं उपडीली : आणि तिथें बोबाइलीं : तीहीं म्हणीतलें : " राउळो ! फळतें फुलतें झाड कां उपडीलें ? " आणि गोसावी कोपू नटले : " आवो मेली बोबांते म्हणे : " म्हणौनि तीची पाठि घेतली : ते पळौनि घरांतु गेली : आणि कवाड घातलें : गोसावीं कवाडा-पासि उभे राहीले : आणि धुमकेन कवाड हाणितलें : मग बीजें केलें : पडवळि सांडिली : मग तीसरां दीसीं ते पडवळि आणिली : मग रांजणावरि काडिया उकरिलें : तिचीं मुळें रोवीलीं : तीएचि रां(ज)णींचें तीन चूळ घातलें : मग तीया बाइला म्हणीतलें : " राउळो ! सुकलें आतां काइ लागैल कीं ? " तें तीसरां दीसीं जीयालें : फुलीं फळीं मोडौनि आले : मग तीया म्हणीतलें : "राउळ मायें : राउळ बापु : राउळ करीति तें काइ नव्हे : " ॥ ३०१ ॥

**माए-पूता बुझावणीं** : ॥ म्हातारीए यकीचा पुत्रू तो आपुलीएचि म्हाता-रीएवरि रोसें नीगाला : तेयामागें म्हातारीही नीगाली : ते तेयातें टाकांति जाति असे : तवं गोसावी दाभविहिरीसि बीजें करीतां पीवळ-तळौलियां अग्निकोनीं आडवाटे भेटि जाली : तीया म्हातारीया गोसावियांसि दंडवत केलें : श्रीचरणा लागली : मग वीनवीलें : ' जो जी ! माझा पुत्रू रोसें जातु असे : राहे नां : तरि काइ करूं जी? : " म्हणौनि रडों लागली : मग गोसावीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : काह्या रूसतासि : " मग गोसावीं तेयातें श्रीकरें धरिलें : तीएपासि नेला : मग

तीएसि आणि तेयासि बुझावणीं केली : मग तीयें दोघे गात्रांसि गेलीं : मग गोसांवीं मढासि बीजें केलें : ॥ ३०२ ॥

**भूजाडयां ग्रहीं क्रीडा** : ॥ भूजाउं तें व्यव्हारे : तयाचें घर परसगमापसीमें : ते तीघ भाउ : तीयां भाउवांचीय तीन चौकीया : एकाचि जोतें : तेथ गोसांवीं बीजें केलें : तयांचीयां बाजां सुपवतियांवरि पहुडु स्वीकरीति : ताटीं ठाणत्रे : एथोचित आरोगणा करीति : तयाचें नांव परसनायक : तेणें परसरामाचें देउळ केलें : ॥ ३०३ ॥

**खातियां ग्रहीं खाजें आरोगणा** : ॥ भद्रा उतरे खातियाचें घर : पुर्वामुख : तेथ गोसांवीं बीजें केलें : चौरंगावरि आसन जालें : मग तीहीं ताटीं घालौनि चारोळियां : गोडंबीया : उत्ततियांचें कुट : खोबरेयाचे रवे : गुळु : साखर : ऐसें खाजें : एकत्र केलें : मग गोसांवियांसि वोळगवीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " ऐसा माझा : आतां होए म्हणे : " मग आरोगणा जाली : गुळुळा जाला : मग वीडा वोळगवीला : मग मढासि बीजें केलें : ॥ ३०४ ॥

**म्हांइंभटां पसारां क्रीडा** : ॥ म्हांइंभट आंगीं आंगिया घालीति : डोइं टोपरें घालीति : हातीं दशांगुळे घालीति : काखें वाटवा घेउनि पसारेया जाति : पसारां बैसाति : नानवटू करीति : तवं गोसांवीं तेथ बीजें केलें : आणि म्हाइंभट उठीति : तेथ गोसांवियासि आसन होए : मग आसु काढीति : श्रीकरीं चेति : मग अनुकार करीति : "हे वांकट : हे खोलट : हे तकमठ : होए : होए : हे नव्हे :" ऐसा नावेक खेळु करीति : मग बीजें केलें : ॥ ३०५ ॥

**सोवर्नी पसारां क्रिडा** : ॥ आवघे सोवर्नी बैसले असति : तेथ बीजें केलें : आणि सोवर्नी उठीति : तेथ गोसांवियासि आसन होए : मग कसवटी काढीति : वोनवळीया काढीति : कसवटीए सोनें लावीति : " हें बावनकस : हें अठेतालीस कस : " ऐसीं कसवटी पाहाति : मग ताजुआं घालीति : आणि तुकीति : " हें पुरलें : हें न पुरे : " ऐसें अनुकार करीति : गुंज : वाल : जउ : तोळी : दुतोळी : मासा : ऐसा खेळु करीति : तैसेचि आत्रवेयाचा पसारां करीति : मग बीजें करीति : ॥ ३०६ ॥

**गाजर मूळे मागणें :** ॥ ग्रामस्था आणि सेजीए गावींचीया माळीणी हाटीं बैसलीया असति : तव गोसांवी बीजे करीति : आणि म्हणति : " आवो ! गाजर दे दे ना म्हणे : " आणि श्रीकरू घालीति : गाजरें घेति : जीया घेवों देति तेयांसि दुणा लाभु होए : जीया नेदीति तिया तैसीयाचि राहाति : एकीचे मुळे घेति : तेथचि आरोगण करीति : आणि म्हणति : " आवो मेली जाय : तीखट आहे म्हणे : " म्हणौनि टाकीति : आणि म्हणति : " आवो मेली जाय : घे घे म्हणे : " आणि तिया "जी ! जी ! माह्रा-प्रसादु" म्हणौनि घेति : आणि ठेवीति : मग वीकरा करुनि घरांसि जाति : मग आंबीलीसी खाति :॥३०७॥

**कुमारी गौरी आंतु खेळु :** ॥ गावींचीया कुमारी वाळसारा पूजावेया कारणें वोडयाळेया जाति : पश्चिमाली पाळी उत्तरेंचेया कोनां आश्राइत : तेथ वाळुसारा पुजीति : तेथ गोसांवीं बीजें करीति : तेयामध्यें खेळ स्वीकरीति : तिया टीपरीं घालीति : वाजवीति : एकी वोला घालीति : एकीतें माजीं धरीति : मग सोडीति : आणि म्हणति : " ऐया माझा : आतां होए म्हणे : " ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ ३०८ ॥

**पोळांचे बैल बुजवणें :** ॥ पोळेयाचीये अंवसेचां दीसीं गावींचे बैल श्रींगारीति : गोसांवीं वोडियाळेयाचीए पाळी बीजें करीति : उतरीली पाळी वाव्य-कोनां आश्राइत : हु हु म्हणौनि उठीति : बुजवीति : आणि बैल रान वळघति : आणि वळौनि मागुतें आणीति : मागुतें तैसेंचि करीति : ऐसें त्रीसूधी करीति : मग गोसांवीं बीजें करीति : मग बैल आपुलालेया घरा नेति : ॥ ३०९ ॥

**कांबिसीं खेळु :** ॥ गोसांवियांसि मर्दना होए : मग बाहीरि चौरंगु घालीति : कदाचीत पाटु घालीति : तेथ गोसावींयांसि आसन होए : मग श्रीमुगुटीं चोखणी लावीति : मग कांबी करुनि श्रीमुगुटु वोरपति : मग दोहीं श्रीकरीं कांबी घेति : आणि दुणति करीति : श्रीमुगुटावरि ठेवीति : श्रीकंठीं घालीति : मागुती श्रीमुगुटावरि ठेवीति : मग श्रीकरें वोरपति : आणि म्हणति : " आवो मेली जाय : ऐसें होए म्हणे : " म्हणौनि श्रीमुगुटु पुसीति : मग कांबी पाणीयाआंत टाकीति : ऐसा खेळु करीति : मग मादणें होए : ॥ ३१० ॥

**बंदेश्वरीं पहुडु :** ॥ गोसांवीं बंदेश्वरासि बीजें करीति : पुर्व पश्चिमु

पहुड होए : मूरकुंडी पहुडु स्वीकरीति : मग उपहुडु होए : मग आसनीं उपबीष्ट असति : आणि अनुकार करीति : "आवों मेला जाए : आतां जाइजैल म्हणे : आवो यें सीवनीयें काइ करीति : आतां कोठें पाठवीजति : कवणांसि नींगेवीजती :" ऐसी चींता गोसावीं स्वीकरीली : मग मढासि बीजें केलें : ॥ ३११ ॥

**ब्राह्मणां आसु देणें** : ॥ एकू दी गोसावियांसि बंदेश्वरीं दुपाहारीचा पहुड होता : मग उपहुड जाला : तवं एकु ब्राह्मणु आला : तेणें म्हणीतलें : "येजमाना ! मीं दुबळा : नीष्कचनु : खावेया नाहीं : कण वृत्ति न मिळे : आणि कन्यां नोंवरी उपवर जाली असे : तरि काहीं खावेया देयावें" : आणि तैसेंचि गोसावी उठीले : आणि म्हणीतलें : "मेला नां म्हणे :" म्हणौनि बंदेश्वरा पश्चिमे टेंक : तेथ बीजें केलें : आणि श्रीचरणीचेनि आंगुठेनि उकरीली : आणि म्हणीतलें : "आवो मेला घे घे नां म्हणे : म्हणौनि तीना आंजूळी आसू घातलीया :" एकी वासना : दोनीचि आसु दीधलीया : मग तेणें म्हणीतलें : "एजमाना ! जैसेंचि माझें प्रागत्न तैसेंचि देत असेति :" आणि गोसावीं हास्य स्वीकरीलें : मग बीजें केलें : तो गेला : ॥ ३१२ ॥

**कांसारवाडेया बीजें करणें** : ॥ गावींचा कमळसेटि तो देसाउरा गेला होता : तो देसाउरींहुनि आला : आणीक माणिक : मोतीं : पवळें : ठींकडीं : ऐसें अपार घेउनि आला : तो दोहीं अळंदीया पश्चिमे राहीला : तेथ गोसावीं बीजें केलें : आववेयां पदार्थां संबंधु दीधला : मग प्रसनता देखौनि तेणें बीनवीलें : "जी जी ! माझेया घरासि गोसांवीं बीजें करावें जी ! लेंकरुवांवरि दृष्टी घालावी जी !" मग गोसांवी वीनवणीं स्वीकरीली : घरासि घेउनि गेला : तेयाचें घर तें माळिए जांबु पश्चिमें टेंकावरि : तेथ घेउनि गेला : मग बाज सुपवती घातली : तेयावरि आसन जालें : मग श्रीचरण प्रक्षाळीले : चरणोदक भीतरि घेतलें : आवघें घर सींपिलें : मग म्हणीतलें : "जी : आजि हा ठाओ पवीत्राचा पवीत्रु जाला जी !" मग तांदुळ वेळिले : पोळिया केलीया : गाजराची पत्रसाक रांधीली : चणेयाचें वरण : तुप : ऐसी गोसांवियांसि आरोगणा जाली : ताटीं हारवें डांगर वोळगवीलें : मग गोसांवीं म्हणीतलें : "ऐया माझा आतां होए म्हणे :" ऐसी आरोगणा जाली : मग गुळूळा जाला : वीडा वोळगवीला : मग

तेणें वीनवीलें : " जी ! गोसांवीं कांसारवाडेया बीजें करावें जी ! कृपादृष्टि आवघेयांवरि घालावी जी !" गोसांवीं वीनवणीं स्वीकरीली : मग घरोघरीं बाजें करीति : खेळ क्रिडा करीति : मग बीजें करीति : ॥ ३१३ ॥

**चंडिकापूरीं अवस्थांन** : ॥ गोसावियातें चंडिकापूरीं अवस्थान दीस सात जाले : गणेसु : चंडिका श्रीकरें स्परीसति : आणि म्हणति : " आवो आवो मेली जाए : तुं एथ आह्यसि म्हणे : " आणि तेथचि गाभारां पहुडु स्वींकरीति : ॥ ३१४ ॥

**आबैसांतें आग्रहें दुध मागणें** : ॥ एकु दी गोसावियांसि मंचियावरि लोंबतां श्रीचरणीं आसन असे : आणि दुधाची प्रवृत्ति जाली : मग म्हणीतलें : " दुध आणि आणि नां म्हणे : " म्हणौनि आग्रहो घेतला : मग आबैसीं दुध आणलें : मग आरोगणा जाला : मग म्हणीतलें : "ऐया माझा आतां होए म्हणे : " म्हणौनि स्वीकरीलें : मग गुळुळा वीडा जाला : ॥ ३१५ ॥

**दुरौनि गौ दोहन** : ॥ गोसावी पाखाणींचीए गाइपासि बीजें केलें : तितें श्रीकरें स्परीसति : कुरुवाळीति : पान्हावो आणीति : आणि मग म्हणति : " आवो मेली जाए : हे लाहातील म्हणे : आवो(डे)देवील म्हणे :" म्हणौनि पैऱ्हा जाउनि उकड आसन होए : मग देहावेयाचे अनुकार करीति : मग आपणाचि म्हणति : " आवो ! पूरे पूरे " म्हणौनि नीराकरीति : " आवो वासरूवासि होइल म्हणे : आवो वासरू सोडि सोडि म्हणे : " म्हणौनि हास्य स्वीकरीति : ऐसा खेळु करीति : मग बीजें करीति : ॥ ३१६ ॥

**दासि पडदासि पाटु** : ॥ एकु दी साधीं माहादाइसांसि म्हाणियें दीधलें : गोसांवीं आइकीलें: मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : दासि पडदासि : रांड मुंड खापर खांड : " ऐसें गोसावी कोपले : म्हणौनि जें जे याचें म्हणियें तें तेणेंचि करावें : जें जेयाचें उलीग तें तेणेंचि करावें : याआंतु गोसांवीं आचारस्थळ सांगीतलें ॥ ३१७ ॥

**उतुरवाडीए आंधां ग्रहीं आरोगण** : ॥ गोसांवीं अळजपुरासि बीजें केलें : उतरवाडीसि आंधाचीं घरें होतीं : तेथ एकाचेया घरासि बीजें केलें : तवं तो आंधु घरांतु जेवीतु होता : आणि तेणें गोसावियांसि देखीलें तैसाचि

उठीला : उभा राहीला : मग बाइलेतें म्हणीतलें : " उठि : राउळीं बीजें केलें :" ते उठीली : श्रीचरणा लागली : कांबळेयाचें आसन घातलें : गोसांवीं आसनीं उपवीष्ट जाले : मग उतरडीचे तांदुळ काढीले : ते वेळीले : पोळिया केलीया : वालाचें वरण रांधिलें : मदु काढीला : मग गोसावियासि आरोगणा दीधली : मग गोसावीं म्हणीतलें : "ऐया माझा आतां होए म्हणे :" मग आरोगणा जाली : गुळुळा जाला : वीडा वोळगवींला : मग बीजें केलें : ॥ ३१८ ॥

**मत्कूण कथा अनुवादु :** ॥ एकु दी गोसावी कळंकेश्वरासि बीजें केलें : सरीसें अवघे भक्तजन असति : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाय : एथ दोनि ढेंकूण होते म्हणे : ते रात्रीं बाहीरि नीगति : एथ जो वसे ते तयातें खाति : ऐसी कीती एकें खादलीं : एकें गीळीली : ऐसें ते करीति :" मग माहादाइसें पुसिलें ! " जी जी ! ऐसें कैसे जी ढेंकूण : " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय ते वीग्रहो म्हणे : मग माहादाइसें उगीचि राहीली : ॥ ३१९ ॥

**रामुनाथीं पहुडु :** ॥ गोसावियासि चामाचा वोवरा आरोगणा जाली : मग रामनाथासि बीजें केलें : चौकीं मुरकुंडीं पहुडु स्वीकरीला : मग उपहुडु होउनि मढासि बीजें करीताति : कदाचित दासवीहीरी बीजें करीति : एतां राम-नाथासि बीजें करीति : चौकीं नावेक पहुडु होए : अथवा आडदांडीए वरि लोंबतां श्रीचरणीं आसन होए : मग मढासि बीजें करीति : ॥ ३२० ॥

**रांडमुंड इत्यादि पाठू :** ॥ एकु दी स्त्री एकी दक्षिणीलीकडे पौळीसीं बाहीरी बैसली होतीं : तवं गोसावीं बीजें केलें : तितें देखीलें : आणि श्रीकरीं दगडु घेतला : आणि ते भीयाली : उठिली : पळों बैसली : तवं गोसावी तिची पाठि घेतली : आणि म्हणीतलें : " आवो मेली फेडि फेडि फेडी नां म्हणे :" म्हणौनि सवीया दीधलीया : " रांडमुड खापर खांड : दारीं दासि मोसारि : " परि तिया धांव घेतली : पळौनि गेली : मग गोसावीं बीजें केलें : ॥ ३२१ ॥

**नीजधामा बीजें करणें :** ॥ मग गोसांवीं सावीयांचि वृधात्व स्वीकरीलें : श्रीकंठु श्रीमुगुटु : श्रीकर : सावीयाचि थरथरा कापति : मग आरोगणा करीति : तें अण्ण पचे नां : मग बाहीरि तीचा उपद्रो स्वीकरीला : ऐसी तेरा दीसं प्राणीं स्वीकरीली : मग आबैसें पुक्ष करुनि आवघीं भक्तजनें

वीनवीति : " जी जी ! वोखद स्वीकरीजो जी : हा उपद्रो समावा जी : गोसावी प्रवृत्ति भंगावी जी ! " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली काह्या काह्या म्हणताए : आवो आतां जाइजैल म्हणे : " मग सावीयांचे बाहीरि तीचा उपद्रो स्वीकरीला : मग गोसावीयांसि पाटावरि उकड आसन होए : श्रीकरें मांचा धरीति : मग परिश्रयो सारीति : आबैसें तांभाणीं उदक वोळगवीति : काणवडेया आडौनि उदका वीनीयोगु करीति : मग एकु दी भटीं पुसिलें : " जी श्रीचक्रधरें रायें तुम्हांसि नीरोपीलें : आतां गोसांवी बीजें करीतांति : तरि आमतें कवणासि नीरोवीलें जी ? " " मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : यें आवर्घी तुज नीगेवीलीं : आणि तुतें श्रीदत्तात्रयप्रभुसि नीरोवीलें : " एकी वासना : गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला मातापुरासि जाए म्हणे : आणि तैसेंचि वय संवत्सरी भाद्रपदवदि चोर्थीचां दीसीं गोसांवीं बीजें केलें : ॥३२२ ॥

**दुखाक्रांत लेंकी येणें** : ॥ सांवळापुरीं गोसावियाची लेंकि होती : तिया घरीं आइकीलें : जें गोसांवीं नीजधामां बीजें केलें : एकी वासना : ते पाणिया गेली होती : तेथ पाणिवठां आइकीलें : आणि पाणिवठा घागरि ठेवीली : ते रीधौरेयासि आली : ते दुखें करूनि डोळां काइ देखे ना : आवघी वाट बापाकारणें रडीजे : तैसी रडत आली : तवं श्रीमुर्तिसि सर्वांगीं चंदन वोळगवीलें : फुलें वोळगवीलीं : तांबोळ ठेंचौनि श्रीमुखीं घातलें : नवा वोलि साउला श्रीमुर्तीवरि वोळगवीला; पांगुरवीला : मग कींडडीएवरि सयन केलें : मग भट म्हाइंभट लक्ष्मींद्रभट चौथा कोणुं ते नेणिजें : ऐसी कींडडी घेउनि गेलें : चींचेतळीं पुर्वीली पालवी उतरीली : नीक्षेपु खाणत होते : तवं पैलाकडौनि गोसांवियांची लेंकि आली : कींडडी देखीली : आणि धडकरि आंग टाकीलें : ते मूर्छना आली : तवं भट म्हाइंभट धावंत आले : तेंहीं साउधी केली : मग हाळळ वील्हळीं रडों लागली : श्रीमुर्तिवरि पडे : " माझें माहेर गेलें : " म्हणौनि आळाप आळापीं रडों लागली: ऐसें तीचें दुख देखौनि भट म्हाइंभट हृदयस्फूट जालें : आवघेयां भक्तां थोर दूख जालें : भटीं म्हाइंभटीं म्हणीतलें : " हे साचोकारी गोसांवियांची लेंकी होए : " मग भटीं म्हणीतलें : " आमतें लोळिलें : ताळिलें : इस्वरु ऐसा प्रतीति : आम्हांसि एवढें दुख नाहीं :" मग नीक्षपु खाणीतला : भटीं हातुभरि सुपवती कापिली : ते खालि घातली : वरि श्रीमुर्ति पहुडवीली : मग वोलि साउला पांगुर-

वीला : एकी वासना : उघडी श्रीमुर्ति : ऐसा नीक्षेप केला : मग भट म्हाइंभट मुक्ष [ख्य] करुनि आवघे भक्त-मढासि नीगाले : भट म्हाइंभट गोसावियाचे लेंकीतें नेत होते : परि ते न वचेचि : चीर चोळी देत होते : परि ते नेघेचि : "आतां काई घेईन ? काइ माझें माहेर आहे : ?" मग ते गेली : मग भटीं म्हाइंभटीं विचारुनि म्हणीतलें "माहाजन पाहाति : म्हणौनि : तेथौनि काढुनि तेया नीक्षेपा दक्षीणे पौळीसीं नीक्षेप केला : काइ इस्वरीचें पुर ते कर्पुरवत की : तरि राहीलें तें काइ ? नां ते कव्हणीं एकी हेतु म्हणौनि : मग माहाजनीं वरि देउळी केली : ॥ ३२९ ॥

शुभं भवतू लेपकपाटकयो वाचिता विजया हो ॥ छ ॥ यादृशं पूस्तकं दृष्ट्वा तादृशं शलीखीतं मया ॥ यदीशुद्धवाशुद्ध मम दोष न लीप्यते ॥ १ ॥ शके ॥ १४९५ श्रीमुख संवत्सरे कार्तीक मासे कृष्ण पक्षे प्रदिपदीयां पून्यतीथौ भृगदीने ऋद्धिपुर लीळा संपूर्ण ॥

# शब्द – कोश

### अ

**अग्निवात**–आग २६८;

**अघमर्ख(र्ष)ण**–स्नानसंध्या करतांना हातांतील पाण्यावर नाकांतील वायु सोडून त्या पाण्यानें जमिनीवर आघात करणें. ५६.

**अड**–लहान विहीर. ७,८. २८८

**अनुकार (रु)**– आविर्भाव, एखादी क्रिया हातांनीं दाखविणें.४६,२५२ ज्ञा–६--३००.

**अनुवाद**–विचार, चिंतन. ३४.

**अंत्राक्ष**--अंतरिक्ष, आकाश. ३

**अपजवणें**-मिळवणें, भिक्षा मागणें. १९३

**अपरोक्ष**–दृष्टीआड; मृत. १

**अबोलणी**-- न बोलणारी. १९४

**अभाळ**--अभ्र: ढग. ७१

**अमलक**-- आंवळा १५७

**अमृत-फळ**–मध्यें गोड पुरण भरून उकडून तयार केलेला एक पदार्थ. ८९.

**अवकाळ** - अवेळ. २१९,२२०. ज्ञा. १७-२५१.

**अवटळणें**-मरगळणें १७४

**अवगीखणें**– (नाम ) अवर्पण.२१४

**अवस**-- अमावस्या. ३०९

**अवसि**-- पूर्वरात्र, संध्याकाळ. १०९ ज्ञा. १३-२९.

**अविधि**-- पाप. २९३

**अळंदी**--मातीचें मोठ्या तोंडाचें भांडें

### आ

**आइती**-तयारी. २७९. शि. ९१०, ज्ञा. १३-५९०.

**आकळवणी**--अकाल-पर्जन्य.२४१

**आखर**–गांवाजवळील जमीन.२५२ ज्ञा. १३–५५८. उ १०७

**आंख**–अक्ष. axel. दोन चाकांत असणारी लोखंडी कांब. २५२

**आखें**–एक पाख, बाजू ७

**आगळ**--अडसर. २८०

**आगळा-ळी-ळें**-- अधिक, निराळा, २६, १८२, २९४.

**आंगारीक**-- पोळी. १४७

**आंगी**--अंगरखा. ३०५.ज्ञा.९.५०२

**आचळ**-- गोल धोतर ( कासोटा न घालतां ) नेसण्याची पद्धति २५०

**आड**- विहीर १९६.

**आड पडणें**-क्षमा मागणें:आग्रहाची विनंति करणें ११५, ११६, १८९, २७८. ज्ञा. १३- ३७५.

**आडा**-- गंध १०३, भ. पू. ६९.

**आंडोरें**- लहान मूल. २०, १३४

**आंध**- एका जातीचें नांव ३१८.
**आधातुरा**-- अर्धपोटी. १७४
**आन**- निराळा. १४१
**आपजवणें**- भिक्षा मिळवणें, १९३, २१३
**आपलवणें**—तोंडाला पाणी सुटणें. लुब्ध होणें, लालचावणें. २३१.
**आपान-वायु**–पाद. १०१
**आफळणें**–आहाटणें, ठोकणें. १३८
**आभडणें**–प्रसूत होणें (?) ७२
**आभर्तण**-- अभ्यर्थना, प्रार्थना २४७
**आंब**—दहीवड्यांतील आंबट पदार्थ २०१.
**आंबील**- ताकांत ज्वारीच्या कण्या घालून केलेला पदार्थ. २४५
**आंमसी**- आमच्याशी. २६
**आमळ**- अमंगल (?) २८५.
**आरणी**- सेनासमूह. ७०
**आरंबळणें**-व्याकुळ होणें, पोळणें १०. ज्ञा. ११-३२५:
**आरातणें**—जवळ येणें.२८;शिशु ११६.
**आरोगण**-- भोजन: ईश्वराच्याच भोजनाला हा शब्द वापरतात. ५ लो. २-२;
**आर्वाचीक**-सामान्य, साधारण १००.
**आलतु**- परता. २३५
**आली**- सखी. १९४
**आलेया !** -- गड्या ! मित्रा ! १९४.
**आलोणी**- मीठ कमी असलेलें; अळणी. ११८.
**आवगणें**- सोंग घेणें; वेष घेणें. १२०, १४५.
**अवकाळवणी**-- अकाळीं पाऊस पडणें. २२१
**आवा**-- कुंभाराच्या भट्टींतील मडक्यांचा समूह; मडकें १२४, १५३
**आसु**— एक नाणें. ५४
**आळकवसा**- तरवड्याची भाजी. २२१
**आळंद**- दुधाची खोबरी, तावणी ३८
**आळी**- ओळ, गल्ली.
**आहिता**- धिरडें. ८८, १९८
## ओ
**ओकरू**- ओकारी, वमन. २०१
**ओडवणें**- पुढें करणें. २२७
**ओरपें**- नागवणी. ११५
**ओलि**- पातळ रेशमी वस्त्र. ३५
**ओसरणें**--एकदम दूर होणें. १५३
**ओळगावणें**—अर्पण करणें,सेवाप्रीत्यर्थ देणें. ३५.
## इ
**इउतां**—इकडे, या बाजूला. २३७.
**इउलालें**—एवढेसें, फार लहान.१९८
**इळी**—विळी. १८०
**इंगळ**—अंगार, विस्तव. १३२

**काकवी**—उसाच्या रसावरील मळी-पासून तयार केलेला पदार्थ. २३९.
**कांटाळणें**— भीति वाटणें; अंगावर कांटा येणें २५३.
**कांठपरा**—फुटलेल्या मडक्याचा वरचा भाग. १३३.
**काठवटी**—लाकडाचें ताट. १७०,२४९
**कांडि**—ओळ, चरण. १२६
**काणव**—काण्व; कण्व शाखेंत जन्मलेला. १.
**काणवडा**—ओशाळा. ३२२
**कानवडा**—वाकडा, एकीकडे. ५६
**कांनवला**—गुळाच्या पुरणाची करंजी. १८९
**कापडी**—यात्रेकरू. २०३.
**कार्पीण्य**—कार्पण्य, कद्रुपणा. २१८
**काबाडी**—मजूर, २३७
**कांबी**—मुतास पांजण करण्यासाठीं फुलांच्या आकाराच्या केलेल्या काड्या. २६२, ३१०
**कास**—कमर. १५९
**कासार**—तांबटकार. २७८
**कासें**—एक धातु. १५३
**कासोटी**— लंगोटी १
**काहाळा**— एक वाद्य. २८०
**काह्या**— कशासाठी १२३, १५६
**कीडर्डी**—तिरडी. ८१, ८३.
**कुटकरणें**—तुकडे तुकडे करणें. ३५.
**कुंटींत**—कुंठित, अडखळत. ३२
**कुंटुं**—अडखळपणा ३२
**कुडी**—खोटी, वाईट. ५४.
**कुडें**—खोटें. २१५
**कुंपी**—खुंटी १७४
**कुमैतु**—दांडी, आयाळ, गुडघे, कान, पाय हे काळे असून बाकीचें शरीर तांबूस असलेला घोडा १६०
**कुरू**— (?) ८३
**कुरुकली**—लहान टोपली. ११
**कुहिटी**—कुजलेलें गवत, ( ओसरी-वरचें ). १६.
**कें**—कोठें. १५६, २३७, २७८
**केंकट**—कुत्रें. ५९.
**केजी**—भाजीपाल्याची किंमत म्हणून त्याच्या मोबदल्यांत दिलेलें धान्य. ११.
**केणें**—विक्रीचा माल. ५३
**कोठा**—गुरांचा गोटा. ६८
**कोणटा**—कोपरा. ९, २१३.
**कोणसे**—कोणत्या. १२३
**कोणा ( ना )**— कोपरा. २८०
**कोणीं रिगणें**—बाळंत होणें. ७२
**कोंप**—ढोली. ४२, ७७
**कोंपट**—खोपटें. २८२.
**कोंब**—पालखीचा पुढें आलेला भाग, धरावयाचा दांडा. २८३
**कोमाइणें**—कोमेजणें. १७८

**कोरका**—तुकडा. ६१
**कोहळी**—कोहळ्याची वेल. ५८
**कौपीन**—लंगोटी. १९३

**ख**

**खडखांबुल**—खांबाला हात लावण्याचा एक खेळ. २०, ९९
**खडपडौनि**—खडबडून. २४५
**खतें**—क्षतें, व्रण-११५
**खरवड**—खरवडून काढलेलें अन्न २६२
**खळें**—युद्धभूमि. १८४.
**खाजें**—खाद्य, भातकें, खाऊ. ४५, ५२, ५३, ३०४
**खाड**—दाढी. ९७, २२९, २८८, २९५
**खा (खां) डुकें**—फोड. ११५
**खाणें**—चावणें, डसणें ८१, ५०, ११२ १९१, ३१९
**खाती**—लोहार, घिसाडी. ३०३
**खातें**—कोनाडा. १६०.
**खाद्णें**—डसणें. ८१, १३०
**खालउती**—खालती, खाली. ७५
**खालाळी**—खालील भाग. ३४
**खीच**—खीर. १३३
**खीचु**—अनेक प्रकारची पक्वान्नें. १८७
**खुब**—वाकडी मूठ; (?) १४४
**खेव**—क्षेमालिंगन. १५६
**खेणणें**—आमंत्रण देणें. ८२
**खोंडि**—मोडक्या हाताची. १२१, १६९
(गोविंद प्रभू आबाईसाला नेहमी खोंडी म्हणत.)

**ग**

**गरुड**—एक रत्न, पांच. २७९
**गवसणी**—खोळ. १२२
**गहुलें**—एक सुगंधी द्रव्य. २९१.
**गळदंडा**—हार. ११० ली. २–६;
**गांगा**—पांढऱ्या रंगाचा. १६१.
**गाव**—चार कोसांचें अंतर १
**दीढा गाउवा**—सहा कोसाच्या अंतरावर.
**गुडु**—गडवा. ९१
**गुंडु-गुंडु**—गुंडाळून गुंडाळून २२०
**गुंडा**—दगड. ८५
**गुरुवें**—गुरें, ढोरें. १३०
**गुळहार**—गुऱ्हाळ. २३०.
**गुळुळा**—गुळणा. ४५, ५३ ली. २५;
**गोडरें**—गोडिरें, गोड. १८०.
**गोदरी**—पडित जागा. ५८
(२) बाजार पेठ. १७२.
**गोडसइला**—गोडसेला, गोड असलेला. १७२
**गोसावी**—स्वामी, मालक १६.
**ग्रह**—गृह: घर. ५०
**ग्राणी**—आजार ३२२
**ग्रीदा ग्रीदी**—पाहऱ्यापाहऱ्यानें. (गिर्दा-पहारा). २२०
**ग्रीवा**—मोपळा. २३०

घ

**घटैले**—कमी झालेलें; शुष्क झालेलें. २५०

**घरवात करणें**—घर निघणें. २१३.

**घसी**—चिखल. २७२; आचार सू ४४

**घोडवाडि**—पागा, तबेला. ११७,२६८.

च

**चरण चार्य-(री)** पायीं जाणारा १००.

**चाटा**—मुलगा २

**चामु**—चामडें. २८०

**चाम-चोर**—चामड्याची चोरी करणारा; व्यभिचारी. २८६

**चिकसा**—उटणें. १९६

**चिखलवनी**—चिखलांतील पाणी २५०

**चींचोरा**—चिंचोका. १३.

**चीडारू**—कोंबडें १८४.

**चीप**—लाकडाचा पातळ तुकडा, झिलपी. १२०

**चीरचोळी**—वस्त्र (लुगडें)—चोळी १२४

**चीरणी**—दाटी; गर्दी. ९९.

**चीरा**—एक दागिना. ९९.

**चुची**—स्तनाची बोंडी, चूचुक. ८

**चुभळणें**—बुडवणें. १५६

**चुळ**—एका हाताची ओंजळ. २४

**चोखट**—चांगला, स्वच्छ. ३७

**चोखनी**—डोक्याला लावण्याची शिकेकाई वगैरे; उटणें. ९१, २७८, ३१०

**चौतरा**—चबुतरा, ओटा. १६५

**चौक भरणें**—रांगोळी काढून त्यावर ठेवलेल्या पाटावर गहूं तांदुळ इत्यादींचें आसन तयार करणें. १८७

**चौथरी**—विशिष्ट नाणें (?). २८३

ज

**जउ**—जव, जेव्हां ३०६

**जगती**—अंगण. ९६, १०४

**जवादि**—कस्तुरी. २९१, २९२

**जळांत**—अथांग १६४

**जाए**—जायेस, बायकोला. ८१

**जाडि**—एक प्रकारचें घोंगडें. ९१, २६२. ली. २-९;

**जाणीवें**—जानवें. ३५, २७१

**जांबु**—जांभळाचें झाड. १४२.

**जीवग्रह**—जीवनाची पुंजी. ७०

**जीववणें**—जिवंत करणें. ८

**जुझ**—युद्ध. १६४

**जोइसी**—जोशी. ३८.

**जोडा**—जोडी, दोन. ३५

**जोतं**—घराचा चौथरा. ३८३

झ

**झिरमिट**—झिम् झिम्. २०९

ट

**टणकणें**—थकणें. २४०.

**टाकणें**—प्राप्त करून घेणें, भरणें. ३०२

**टीक** - मोती. १५३
**टींबकारणें** - छेडणें; वाजवणें. १४१,
**टीर** - ढुंगण. १५७
**टेकाळी** - टेकडी. ३१.
**टेंक** - टेकाड, उंचवटा. ३१२
**टौळें** - दिवलाणी. १५३
**टोळ** - भटके; मठ्ठ. २७९

**ठ**

**ठाउवा** - ठावा ( पलंगाचा ). २६५
**ठाओ** - पाटपाणी, भोजनाची तयारी ९७.
**ठाओ करणें** - पाटपाणी, भोजनाची तयारी करणें २०७.
**ठाणवै** - समई. २०७; ३०३
**ठाव** - ताट मांडण्यासाठीं लहान तिवई ३७. **ठाव मांडणें**-पाटपाणी करणें.
**ठीक** - ठिगळ. २१४
**ठीकडी** - अंगठींतील रत्नें. ३१३
**ठेंटरें ( ठेंठरें )** - जोंधळयाचा एक खाद्य पदार्थ. १५०
**ठोंबरा** - ज्वारीच्या कण्या भरडून केलेला भात. १५५, २७६.

**ड**

**डांगर** - नदीच्या थडींत होणारें एक गोड फळ.
**डाउ** - लग्नाची सुपारी. २२४
**डुळडुळीत**–हलणारा-री-रें.लवलवीत; फुटण्याच्या बेतांत असलेलें. २५.
**डो**-नारळाच्या करवंटीचें एक माप.
**डोलो**-डोलवा. ७४.
**डोळिकार**-डोली वाहून नेणारे. १०३

**त**

**तडवा**-पाल उभारण्यासाठीं वापरलेली दांडी. २१६.
**तराळ**–रात्रीचे पहारेकरी. ३२.
**तवंग**-उंच माचा, बसण्यासाठीं तयार केलेलें उंच आसन. ६४, १७०
**तळखंड**–जमिनीवरील आसन १६६, पाट पिढें १७४
**तळी उचलणें** - आरतीचें ताट उचलणें, हातभार लावणें.
**तापणें** - तापाजवळ बसून अंग शेकणें. १०
**ताबीलें**–पाहिलें, सामर्थ्यसंचार केला. ( तावणें ) २८६.
**तांबकळस**–तांब्याचें मोठें भरणें, कळशी, घागर. २६२.
**तांभाण**–ताम्हण. २६२, ३२२.
**तिकटें** - विस्तवाचें गाडगें ज्यावर नेतात. ( प्रेतापुढें ) तें. ८३.
**तिव्हाळा**–(१) तीन पायांचा माचा. १६० (२) पोत्यांचा गंज, दुकान १६०.
**तोंबणें**–ओलें होणें. २११
**तीव्हाळें**-तीन पायांची घडवंची. ३२

**तुकणें**-मोजणें. ५३, १३०, ३०६.
**तुकमठ**-वजनानें हलकें. ५४.
**तुटणें**-संपणें. २९३.
**तुतेकार**- **तुता**-नांगर वखर हाणतांना त्यांना लागलेली माती काढून टाकण्यासाठीं हाणणाराच्या हातांत असलेली काठी.) ही काठी धरणारा तो तुतेकार. अर्थात अडाणी माणूस. २७९
**तुरें**-एक वाद्य. २४४
**तोळी**-तोळा मोजण्याचें वजन. ३०६.
**तोंगले**-बाशिंगाला लावलेले मोत्यांचे घोस, लोलक. २२४
**तोंडोळे**-एक आडनांव. २२२.
**तोंड धरणें**-तोंड दाबणें. २०७
**त्रहाटीत**-जोरानें-आवेशानें ८
**त्रीवाडि**-तीन पटांचें वस्त्र., तीन पदर जोडून तयार केलेलें. ९९, २८३.
**त्रीसुद्धी**-तीन वेळ; निश्चित. १८९

**थ**

**थडी**-काट. ११८
**थाळा**-परात. १२३.
**थेबडु**-मळवट, फतका. १५३

**द**

**दरडे**-दरवडे. ११५.
**दरीसन**-दर्शन. ४.
**दवणा**-एक सुगंधी पदार्थ. दमनक. ११७
**दवणा-पर्व**-दमनक पर्व, (चैत्र शुद्ध पौर्णिमा.) ११७
**दशांगुळ**-पांच पांच बोटांत. एक याप्रमाणें दोन्ही हातांत घालायचा एक दागिना. ३०५
**दसीया**-दशा, स्थिति. २६.
**दसकी**-दहांची रास. १६०.
**दाटे(टा)**-दाट; जवळ जवळ. ९०.
**दाढून**-चेंळेच; १४०.
**दांडी**-पालखी. ७४, १६२, २०५
**दादुला**-नोवरा. ७२.
**दावण**-एका दावणींत (ओळींत) बांधणें. १०९.
**दाम**-एक नाणें. ९७, १५३.
**दांवें**-जनावर बांधण्याचा दोर. १९.
**दाळीदी**-दायाद, नातेवाइक. २९६
**दीउनि**-दिवसापासून. २८७
**दींड**-कापडाचें गांटोडें, ५२, २११
**दीवे**-दिव्याच्या आकारानें एक पक्वान्न. १८७
**दीस**-दिवस. १
**दुरळ**-उग्र, कडक. २७८.
**दुटो**-पांघरण्याचें दोन पदरी वस्त्र. ९७, २६२.
**दुना**-दुप्पट. १४३.
**दुनला**-दुप्पट. ५२.
**दुरडि**-टोपली. ९७, १५६.
**दुस**-तंबू. ७५, ९९.

**देवकी**-देवाची. १३१.
**देवाळा**-एका तलावाचें नांव. ५५.
**देव्हार-चौकी**-देवघर. २२७.
**देहां**-दिवसां. १९७.
**दोंद**-मोठें पोट. १७, ९७.
**दोरे**-कडीं, हातांतील दागिना. १५३.
**दोवै**-दुर्वा. १२५.
**दौंडी**-एक वाद्य. १४४, १५४

### ध

**धडकरि**-धाडकन. २१३.
**धरमाळी**-गांवाबाहेर ढोरांचा पाणी पिण्याचा हाळ ७६.
**धवळ**-विवाह समयीं गाइलेलें मंगल गीत. २२४
**धम्म**-फण, कडब्याची मोंगणी झाल्यावर खाली राहिलेला धांड्याचा तीक्ष्ण भाग. २२०.
**धाटी**-पट्टा. २४१.
**धांदले**-१८१.
**धांमें**-धामून धामून पाडलेला 'डोळा' १३
**धार देणें**-प्रेताला (जळत असतांना) पाणी देणें. ३००
**धारी**-घोड्याला लगामा ऐवजी घालायची हांटाळी. २४१
**धारुके**-तोटी. २०, २९७.
**धीडरें**-धिरडें. ८८.
**धुमका**-धक्का, बुक्का, धम्मक-लाडू. ४४, १२९.
**धुमाळि**-गडबड, दांडगाई. २६.
**धुरा**-(पालखींत बसण्यांत पटाईत असे) श्रेष्ठ पुरुष. १०३, १०९, २६९, २८०
**धोटा**-पिचकारी. ६४, २८०.
**धों**-धुणें (नाम). १७०.
**धोंगडी**-जाडाभरडा कपडा. ९७, १५३
**धो (धा) पटी**-चुरगळलेलें धोतर, वस्त्र २७२.

### न

**नाचणीं**-नाचणाऱ्या, नर्तिका. ६४, १०७
**नाणिवट**-न आणण्या इतकें. १९३.
**नानवट**-नाण्याची देवघेव. ३०५.
**नावेक**-क्षणभर. ७.
**निखारणें**-निवारणें, स्वच्छ होणें २०९
**निगावा**-निघण्याचा मार्ग. २२०.
**निगदणें**-म्हणणें, घोकणें, पाठ करणें. २
**निपटणें**-शेवटचें मूळ. १. ए. भा. ३, २८, ६९९.
**नीकें**-चांगलें. ७०
**नीघरा**-ज्याला घर नाहीं असा. १६.
**नीबर**-जाड, कठिण. १४७.
**नीरवडि**-निरवानिरव, व्यवस्था. ४९.
**नीरुतो**-निश्चित. २२०.
**नीवाप**-शिधाआटा. २७८.
**नेजवी**-न जेवी, जेवत नाहीं. ७७.
**निसणें**-निवडणें. १४८.
**नेमु**-नियमन. २७९.
**नेणणें**-न समजणें. ४.

नै (नइ)- नदी. १९३.
नृत्य - नैऋत्य. ९६.

## प

पंचकवडी- एक शिवी. १४५.
पंजरु - पडदा, झांकण. २३६.
पटिसाळा- ओसरी. ८१. ली. २-४.
पडदणी - आंघोळीचें वस्त्र. ७५, ९१, १८१, २३२.
पडदासी- दासीची दासी. ३१७.
पडवळ- एक प्रकारच्या भाजीची वेल. ३०१.
पडवा - पलंगाची नवार. ६६. रु. ४५६
पडीताळणें- दुःखाच्यावेळी दुःखिताची विचारपूस करणें. १००, १२६.
पढणें - वाचणें. २.
पत्रसाक- पालेभाजी. २८२, ३१३.
परिएलु— नाट. १११.
परि (र) स्त्रय- परसाकडे, शौच्य ५६
परिहार- शंकानिरसनार्थ साक्ष, ग्वाही १९७.
परीस - प्रदक्षिणा. २८२.
परीख- लक्षभोजन. ७१.
परीच्छेद - नियम. १७४.
परुखार्थ - पुरुषार्थ, पराक्रम. १६०.
पन्हिवा - मोरी. ५६, १६८, २७२, २७४.
पव्हरकी - संख्या विशेष (? १६०.
पव्हा — पाणपोइ. २०.
पसाय— प्रसाद. १५४.
पसारा— दुकान. ४०, ५३, ३०५.
पसुवा— पशू ( अ. व );जनावरें २६८.
पस्यात् - पश्चात, शेवटचा. १२१.
पहुडु— निद्रा. १५. ली. २-२;
पळसुला - उपनयन संस्कारांत चौथ्या दिवशीं करावयाचा एक विधी. या विधींत पळसाच्या डहाळी भोंवतीं पाणी घालावें लागतें. १.
पाइक- सेवक. ७५.
पाइतें— पायाकडची बाजू. १३८, ३००
पाखाण— पाषाण, दगड. ३१५.
पाखाल— पखाल, पाणी वाहून नेण्याची चामड्याची पिशवी. दोन पार्श्वे असतात म्हणून पाखाल. ७.
पाग— शेला. १९३.
पागोटें— पगडी, वऱ्हाडांत वापरलें जाणारें शिरस्त्राण. १५१.
पाजण— खळ. ९१.
पांगुळा— लंगडा (दोन्ही पायांनी) २८४
पाटगादी-रेशमी वस्त्राचें आसन. १९६
पाटबाज- पलंग. २४०.
पांटी— डालें, टोपलें. ९.
पाटी— पासोडीचा भाग. ८६.
पाटी— पाट, पिढें. ८३, ९६.
पाठक— वेदवेत्ता ब्राह्मण. ७८.
पाठी घेणें— मारणें, पिटणें. १८०, २८७, ३०१.

**पाणव**- पाणी ठेवण्याची जागा. २७९.

**पाणवै** - पाण्याची जमीन २२२, ३०१

**पाणी सारणें** - स्नानासाठीं पाणी काढणें, (घंघाळांत) २७३

**पाताळि** - पत्रावळि ७१

**पांनद**-पांधन, दोन कुंपणामधील भाग ८

**पासोडी**- पांघरूण. २५७,

**पान लागणें** - सर्प डसणें. १३१.

**पांढरी** - गावाच्या शिवेजवळील जमीन २३१.

**पारु** - चौथरा, चबुतरा. १२५

**पारुखणें** - थांबणें, वाट पाहणें ३७.

**पालउ**- पदर. ३७.

**पालड**- तराजूचें पारडें. ५३.

**पालव**- शाखा. १०४.

**पाहाणें**- उजाडणें, दिवस निघणें. १२१, १३०.

**पाहातीय**- पहाटचा, सकाळचा १३०

**पाहालें**- प्रातःकाळ झाला. १२१. ज्ञा. १८-१९६;

**पाहाळ**-- ढीग ( पिंजलेल्या कापसाचा) ९.

**पाळी**- तलावाचा बांधून काढलेला काठ. ६२.

**पुंजा**-- केरकचरा. ९७.

**पुडी** · जेवण. (संन्याशाचें) २२, २७९ पुडी करणें- भिक्षा मागणें.

**पुणिव**- पौर्णिमा. ३५.

**पुर**- शरीर. ३२५.

**पुश्चळ**- व्याभिचारी. २८८.

**पुहचळ**- पुंश्चलि, छिनाल. १५२.

**पुढारु**- पुढारी, मुख्य. १३८.

**पेखणें**- नृत्य. १०७.

**पेठ**- व्यापाराचें केंद्र. २८.

**पेंडाळु**-पेंडी नांवाचें एक फळ. १४९

**पेंव**- धान्य वगैरे साठविण्यासाठी जमिनींत केलेला खोल गड्डा. ९१.

**पेवनें**-जोंधळ्याच्या पिठापासून तयार केलेला एक गोड खाद्य पदार्थ. १८८, १९०.

**पैज**-- होड. २१३.

**पैरा (न्हा)**- पलीकडे. १७३, २०३, ३१६ ली. २-७.

**पैस**- पलीकडे. १७३.

**पोटळणें**- पोटाशीं धरणें. २६५.

**पोत**-- कांकडा. २२१.

**पोतौडी**- कापडाची घडी. ८७.

**पोथी**-- आळु, चमकोरा. १७२.

**पोपट**-- मीठ टाकून उकडलेल्या तुरीच्या शेंगा. २४२.

**पोफळ**- सुपारी. ५३.

**पोल्हार**- पायांतील एक दागिना १५३

**पौळी** - आवाराची भिंत. ११

**प्रजन्यु** - पर्जन्य. २१४.

**प्रजन** - श्रीमंत लोक. ३४.

**प्रबत ( परबत )**- पर्वत. २१३

**प्रसाद करणें** - उष्टें करणें. ११०, १८०, २३०

**प्रमाण** - शास्त्रशुद्ध रीतीनें. १०७

**प्रागत्न**- प्राक्तन; नशीब. ३१२.

**फ**

**फाकि** - फक्कीका, पंक्ति, ओळ. १३६.

**फाळोकें**- फडकें. ८९.

**फुटक** - आठ पैसे किंमतीचें नाणें. ५४.

**फुटा**– अंगावर घेण्याचें उत्तरीय वस्त्र, शेला. ९७.

**फुलौरा**– खाद्य पदार्थ लटकवलेली लाकडी अथवा लोखंडी चौकट (देवावर बांधण्याची) १०२.

**फेडणें**– काढणें, कमी करणें. ८, ११, ३३. ली. २-५;

**फेंडि**– नितंब, ढुंगण. १०१.

**फेंदी**– फेंगडी (पायानें) १२१.

**ब**

**बउलें**– बोहलें, रितपुर येथील एक स्थान. ९४.

**बटरूं**– लहान मूल, बटु. २७.

**बडुवा** - पुजारी. १०६.

**बदरीका (खा)- (१)** बोरें. २१६. **(२)** नेम. २६२.

**बंदी** - भाट. २३५.

**बरवट**– चांगली. ५४.

**बळद**- बैल, बलीवर्द. २०८.

**बाइल** - स्त्री. ६.

**बाटी** - निर्माल्याचीं फुलें. कोवळे कोवळे धांडे. २५२

**बारव** - पाय-विहिर. १५९.

**बासींग** - लग्नाच्या वेळीं डोक्यावर बांधावयाचें. २२४.

**बाहीवट** - बाहू. १८५.

**बाहीरती** - हगवण. ३२१, ३२२.

**बाळवेसी** - बाळवेष धारण करणारा. १७९.

**बांकुवा** - एक दागिना. ९९.

**बिढार** - घर. ८५.

**बीजें करणें** - जाणें. ५. ली. २-४;

**बीदी**– रस्ता ३१.

**बुडकळी**– बुडी. ७८.

**बुजवणें**– भिववणें. ६०, ३०९.

**बुथि**– तोंड न झाकतां घेतलेला बुरखा डोक्यावरून घेतलेलें वस्त्र. ४१.

**बुरुगाळि**– थोडें. १६७.

**बेलसरीं घालणें**– टांगणें. १८०.

**बेळ** - दुफाटी, Y या आकाराची डील १००.

**बोचकवडां** - एक शिवी. १४

**बोडी** - एक शिवी. १४१, १४५.

**बोपा**- फाजील लाडावलेला मुलगा २५६

**बोणें** - नैवेद्य. १११, २२९.

**बोबाणें**– ओरडणें. ५ ली २-२.

**बोरुं** - घोड्यांची एक जात. १६१ शि. ९३७.

**बोलें**-- बहुलें, बोहलें. २२४.
**बोळाविणें** - पांचविणें. ४१.
**बोळवीत** - बोळवण, वाटीं लावणें. २०७.
**ब्रह्माओ** - विनंती, स्तुति. २१५.
**ब्राह्मणी** - ब्राह्मण स्त्री, पत्नी. ३.

**भ**

**भले (ल) तें** - वाटेल तें, कांहीही ६९.
**भवंडणें** - फिरविणें. १४.
**भ्रिडी** - भिरडी, वासुदेव, मल्हारी. १५४.
**भाओ**– किंवा, अथवा. २२७.
**भागणें**-- थकणें, २०५.
**भांगार**–सोनें, सोन्याचे दागिने. ७०.
**भाणवस**– स्वयंपाक-घर. ९२, ११०, १३९.
**भातार** – नवरा २८७.
**भावै**– ज्येष्ठ महिन्यांतील अमावस्येला येणारा एक सण. ९७, १२५.
**भांसळणें** --चकाकणें. २६०.
**भांडे**– मातीचा तवा, एकोली. ८८.
**भीतें**– जळतें लाकूड. १८१.
**भू·आगळ भोआगळ)**- जमीनींत घातलेली आगळ–अर्गला–अडसर ९८, २८०.
**भुयर**– भुयार, बळद. २९३.
**भुसारे**– वाणी, धान्याचा व्यापारी १९९
**भेंकणें**– रडणें. २८.
**भेडवणें** - भिवविणें. १८१.
**भेला-ली**-गुळाची ढेप. ९७, २८२.
**भोइ**– तापांत घालण्यासाठीं प्रत्येकानें आणावयाचा जळतणाचा किंवा सर्पणाचा हिस्सा. १०
**भोगराम**– सार्वजनिक मोठें पूजास्थान ६५.
**भोरि**– उटी. १०३, २९३.

**म**

**मढोली** - लहान मठ. २५४.
**मदु** - मधु, मध, सहद. ३१८.
**मधुरांबील** - एक गोड पदार्थ. ११८
**मरवा** -- एक सुगंधी वनस्पति. ११
**मर्दना**– मर्दन करणें, तेल चोळणें. ७५, ९१, ९४.
**महीका**– म्हैस. ७८.
**मवणें**– मोजणें. ५४, १०३.
**मागुता**– पुन्हा. ५.
**माचणें** -- चोळणें. २२०.
**माचा** - मंचक. ६९.
**मा (मां) चळी**–लहान बाज, खटली १७, ८३, २७९.
**माची** --पलंगडी. ८०.
**माजि-घर**– माजघर. २७८.
**मांजठीय**– मंजिष्ठ, लाल रंगाचा २१३
**माथण**– पाण्यासाठीं असलेला मातीचा मोटा डेरा. २६०.

**माथां-होउनि** – माथ्याहून ( पंचमी वि. ) ४

**मांडखुटी**– वीरासन. १०८.

**मांडौसणें** - मांडवाला बांधणें. (?) १२५.

**मातुलिंग**– एक फळ. २०२, २३४.

**मादना**-उष्णोदकाचें स्नान. ७५,९४.

**मांद(दि) रा** - गळयांत घालण्याच्या साखळयांचा सर (?) १५४

**मांदळ**-एक वाद्य. २४४

**मांदुस** - मोठी पेटी, मंजूषा. २९३.

**माहारी**– महदाइसा. १२१.

**माळवंचा** - घरांतील सामानासाटीं वर उंच बांधलेली फळी. ८२.

**माळिय** - मळयामधें. १४२.

**मीनणे** - मिळणें, प्राप्त होणें. १९२.

**मुख-पाक** – तोंड येणें. ९४.

**मुठीयें** - मुटकळे, एक खाद्य पदार्थ. १८७.

**मुठु**– बैलाच्या पाठीवर घालण्याची गादी १५, १७४.

**मुड बाहिया**- हाताचें कोपर. १५३.

**मूद** – ओगराळयांत किंवा पेल्यांत भात अथवा इतर पदार्थ घालून तयार केलेला गोळा. १८७-ली. २-५

**मूरकुंडी** – शरीराची घडी करून. १८२, ३११, ३२०

**मेघवर्णा**-मेघवर्णी,काळया रंगाची.२७२

**मेजणें**–मोजणें. ५४,

**मेहरी**–स्त्री; बाई. २२४

**मोगरसूळ** – कोणत्याही पदार्थाचा ढीग (लोकांकडून लुटवणें.) १२४.

**मोडणें**–बहरणें, प्रफुल्लित होणें. २४

**मोतियाचा टीळा**- २२९.

**मोदळा**–गवताची पेंडी, भारा. १४९.

**मोडसी**–अपचनामुळें पोटांत होणारा एक रोग. १७८.

**मोरवीस**–मोरपीस. १५४

**मोवारणें**–तिंबून मऊ होणें, मुरणें. १४७

**मोहाळु**–एक फळ. १७५

**मोसारी**–एक शिवी. १४१, १४५.

**मृतिका–सौच्य**-मातीनें हात स्वच्छ धुणें. ५६.

**म्हणियें**– काम, धंदा, आज्ञा. ३, ३७, ३१७.

### य

**यकसरी**–एकसारखा. २.

**यक्षकर्दम** - एक उटी. कुंकुमागरु-कस्तूरी कर्पूरं चंदनं तथा। महा-सुगंधमित्युक्तं नामतो यक्षकर्दमः ॥ २९१.

**येउती**–इकडे. २३७

**येरिवाहीं** - एकीकडे, दुसरीकडे. १७३, २१६.

र

**रंगपूजा**-रंगीत रांगोळया वगैरे काढून केलेली पूजा. १८७

**रजक** - धोबी. १५१

**राखस**—रणशूर. २२७

**रंद** - पूं. ४४

**रवण** - अंगण. ९५, १६५.

**रवे**—किसून काढलेला भुगा. ३०४

**राउत**—घोडेस्वार. ७५

**राउळ** - राजा. ५, १३९.

**राखणाइत** - राखण करणारे. २२०

**रांड**—विधवा स्त्री. ६, १५५

**रातें**-एक पदार्थ. लोणचें ५१

**रांधण** - तवा. १५३

**रांधवण हाट** - हलवायांचा बाजार.

**रायणी** - नाम विशेष. १६१.

**राहाटीं**—भांडीं. १६, २७८

**रींगणें** - प्रवेश करणें. ६६. ८६

**रींगावा** - आंत जाण्याचा मार्ग,प्रवेश २२०.

**रीठ**—हिंगणबेटाचें झाड, फळ. २३१

**रूप करणें**—यथार्थतेनें वर्णन करणें; योग्य निदान करणें १०७

**रूप-वाटे** - चांदीचें भांडें. १६७

ल

**लाक**—लाख, एक धान्य. २९, १९५, २५२

**लागु**—आधार. १९६

**लागु भागु**—लगबग; लौकर; अगदी थोड्या वेळांत. २५०.

**लांपट**-ढिलें; लौकर लागणारे. १७६

**लाहाकणें**—थकल्यामुळें धापा टाकणें २७८.

**लाहांसें** - काळें चिन्ह, डाग. १६१

**लुलुसी** - स्थूल, लुळलुळ. १७८

**लेख** - किंमत. १५२, १५३

**लोथ**—गांठोडें २२०.

**लोहवीं**—लोहित, लाल रंगाचीं. १२२

**लोहिवा**—लाल. ६६, १८७.

**लोहे** - लोखंडी कढई (?) २६२.

**लोहें** - पाणी तापवण्याचें लोखंडी भांडें. २७३.

व

**वणीजार** - वंजारी. १६०

**वणी** - पाणी -( संस्कृ. वनम्. ) २७३

**वर्ण** - व्रण, फोड, जखम. ४४

**वरटा** - वरुता, वर. ६२.

**वऱ्हाड** - वर व वधू पक्षाकडील, लग्नाप्रीत्यर्थ आलेली मंडळी २८९.

**वरीखणें** - वर्षाव होणें. २१४

**वरीख (ष)**—वर्ष. १, २.

**वरैत** - नवरा. ८२, १५६

**वसो** - बैल. १८३.

**वळघणें** - चढणें ३०९.

**वळणी** - वळचण. २४२

**वाळिवट** - वळून तयार केलेले पदार्थ.

**वांकट**- वांकडी. ५४.
**वांकी**—पायांतील अलंकार. ७४, १२९, २५८.
**वाटुवा**-पोतें. ३०५.
**वाउ·मार्गींनु**—वाममार्गींचा. २०३.
**वाडा**- एक पदार्थ. ५१.
**वाडु-वेळु**—उशीर, बराच वेळ. ३००
**वाणें**—वाहणें, अर्पण करणें.३५, १६२.
**वाणें**-वाजविणें.२४४.( **वात**-वाजवीत)
**वारीक**—न्हावी, म्हाली. ३३, २९४
**वावर**—शेत. १८४
**वाव्य**—वायव्य. २१.
**वावो**—व्यर्थ. ११४
**वास पाहणें** - एखाद्याकडे हेतुपूर्वक पाहणें. ८. वाट पाहणें.
**वासना**—मत. १. **एकी वासना**- एकाच्या मतें; कांहींचें मत असें आहे कीं.
**वाहाळ**—ओढा. २३६
**वाळसार**— वाळूंचे कण ३०८
**विचारूणें**—विचार करणें. २७९.
**विजुळी**— तोबरा (?) २२६.
**विधुंसणें**- विध्वंस करणें- हं णें.१७२.
**विनाटी**—वाकुली. १५८.
**विस्मो**-विस्मय, आश्चर्य. १२
**विसाण**—गरम पाण्यांत घातलेलें थंड पाणी. ३९
**विहरण**—बाहेर फिरणें १०२
**विहिरा**—लहान विहीर, शेवडी. नदीच्या वाळूंत खोदलेला झरा.७५.
**विळीचां**—सायंकाळीं १७४; ६८.
**वि(वे)ळुवरि**-दिवसभर. १८२.
**विखोरा**— गांठोडें. १७४
**वींझा**—विंध्य पर्वत.२८१
**वीपलाणें**—(१) वांकडें लावणें. २२, १४०, २१७, २७९.
(२) चुकी लावणें. १७९,१८२.
**वीरगुंठी**-केसांचा जुंबाडा. १८५
**वीस्मुर्ति**-पिसेपण; वेड, विस्मृति १९.
**वीळवरि**—दिवसभर १७४
**वीळि**—संध्याकाळ. ५७ ली. २-२;
**वेखंडणें**-वेखंडाच्या रंगाप्रमाणें मलिन होणें; मळ चढणें. १५३
**वेंघणें** - चढणें. ८२.
**वेंचणें**—खर्च होणें, संपणें. २०६
**वेठी** —टोपरें. १५४
**वेढी ( वाढे )** - वाडगा. १५६. तूप वाढण्याची वाढी.
**वेव्हारा**—व्यापारी. ७३, २८८, ३०३
**वेसि**-वेशीचा दरवाजा. २४०.
**वेळणी** — झांकणी. ७२.
**वेळणें**-तांदुळ शिजवण्यास टाकणें.३१३
**वैरणें** - आच्छादन. १२५.
**वेल लावणें**—अनेकांनी हातांत हात धरून एखाद्याच्या भोवती कडें करणें १०३.

**वोखटें**—वाईट. १६.
**वोडण-खांडे**—ढाल तलवार. १०४
**वोड (डि) याळ**—रितपुर येथील एक तलाव. ३०८, ३०९.
**वोडवणें**-उंच सखल जमिनीवर ताट हलूं नये म्हणून खाली घालण्याचें ओडगण. ३७.
**वोउसें( वोउसणें )**–लुटणें, लुटवणें १२४, १३८
**वोणां घालणें**–कोलदांडा घालणें; गटारांत बुडवणें ६३; १९५.
**वोतपळी**-ऊन खाणें.उन्हांत बसणें.२०९
**वोनवणें**—ओणवें होणें, वांकणें ६६.
**वोनवळी**–निरानिराळ्या कसाचे सोन्याचे तुकडे ३०६.
**वोंबी**—गव्हाची लोंबी. २१९.
**वोलि**—रेशमी पातळ वस्त्र. १५४
**वोवरा**—पाल, कापडाचें दुस. १६६
**वोसारि**—एक शिवी.
**वोसाडि**—पडदा. २५७.
**वो(वौ)हर**—वधूवर. २२४, २८९.
**वोळग**-सेवा. २५३.
**वोळणें**—ढग येणें. २१४.
**वृत्ति**-सरकारांतून मिळणारें वतन, उपजीविकेचें साधन. १६७.
**वृद्धाप्य**-वृद्धापकाळ. २८०
**व्यतिक्रम**—उलट क्रम. २७९.
**व्याळी**—संध्याकाळचें जेवण. २२४

## स

**सगडी** - चूल. ८७, ८९
**संबळ**-मोट २४८.
**संतोख**—समजूत, समजावणी. १३३.
**संबोखणें**-सांत्वन करणें. १०८, २०३
**संका**-दरवाज्याची उभी बाजू. २५४
**सडणें**-उखळांत कांडणें. १५०, १९७
**सचील**-सचैल, वस्त्रासहित. १३८
**सतानीकु**-शतायुषी. ८.
**सद्यस्त**—नुकतेंच तावलेलें. ८९.
**समावणें**—शांत करणें. ३२२.
**सरणें**—मृत्यु पावणें. ८, ४१, ५७, २९६
**सरंगा**—घोड्याची एक जात. १६१
**सराउ**–भांडें.( संस्कृ.शराव ) ८९
**सरि-वीणा**-वीण्याचा एक प्रकार.१४१
**सरीसें**—बरोबर. ३७
**सलोणी**—खारट. २२
**सव**—शव, प्रेत. ८.
**सवळ**-सकाळ. ३८, ५८, १७४.
**सवा**—बाजू. ८८.
**सवी**-शिवी. ६, १५६.
**साउला(ळें**-सोवळें; सोळा हात लांबीचें रेशमी वस्त्र. ३५, ९१, १९२, ३२३.
**साइली**—मैत्रीण. ७, ८, ७०
**साक**-भाजी. ८२, १४८.
**सांखळें**-गळ्यांतील अलंकार. २२९.
**सागवती**-भाजी. १८७.

**सूणें** - घालणें, देणें. ११२. ली. २५;
**सूप** - सुपडें [ पाखडण्याचें ]२९०
**सेओ [उ]** - शेव, पद्र, १२२, १७४
**सेजा** - सेजारीं. ७.
**सेणपुंजी** - शेण व केरकचरा गोळा करणारी. १९९.
**सेणी (नी)** - गोवऱ्या. ८५, ३००
**सेंबुड** - शेंबुड. २१७.
**सेस भरणें** - कुंकू लावणें, मळवट भरणें. २१३.
**सेहाडे** - शिडी, जिना. २६७
**सोजी** - रवा. ८८, १४६.
**सोनसळें** - गव्हाचा एक प्रकार.२९०
**सोनेसळा** - जरतारी ९७.
**सोंड** - दरवाजा बाहेरील ओटा; दाशा १११, २६९.
**सोपान (?)** - ५४
**सोवणी** - सोन्याचा धंदा करणारा; सराफ, सोनार. २९०.
**सोल**-सोललेल्या हरभऱ्याचे दाणे २२६
**सोवनी** - सराफ. ३०६.
**सोहन—हाट**—सराफा बाजार. २४८
**सांवरें**—डुकरें, शोच्य २४१.
**सौमे**—साउमे, समोर. ३५.
**संखा** - लघुशंका
**संग्रहेन**—भिडेमुळें. २४०
**संग्रहेणु**—संग्रह करणारी, माळीण१७२
**संदी**-संधी, जोड. ४३, १०९.
**स्तीति**-ईश्वरानें दिलेला एक प्रकारचा आनंद, स्थित्यानंद. ४३
**स्यारें**—भूतबाधा. १२५
**स्याळे**—थंडीचे. १७८, २६६.
**श्लेष्मा**—शेंबूड.

## ह

**हडुतीं**—खालीं. २७५.
**हरळ**-गवत. ५७.
**हळु**—हलकें, पचायला चांगलें. १३०
**हाट**—बाजार. २८, १४३, ३०६.
**हाटवटी**-बाजारांतील रस्ता.२७, ३२.
**हातिवा**-एकमेकींच्या हातांत हात, बोटांत बोटें घालून. ३१.
**हाल्हळ - विल्हळ** - ओक्साबोक्सीं ३२३.
**हारा** - कामट्यांचें किंवा परखाट्यांचें मोठें टोपलें. १२५.
**हेडाऊ** - घोडे विकणारे. १६१
**हेलभरि**-हेलाभर; हेल्याची एक खेप.७
**हो करणें**- "हो ऽऽ" असें उंच आवाजानें म्हणणें. ६०.

## क्ष

**क्ष (ख) ण**-निमंत्रण, ८२.
**क्षणणें**- निमंत्रण देणें. ८२.
**क्षें (खें) व** - आलिंगन. २४६



( प्रस्तुत प्राचीन ग्रंथाचा अभ्यास करतांना अभ्यासकांनीं प्रथम शब्दकोशाचे साह्य घ्यावे. शब्दकोशाच्या साह्याने बहुतेक कठीण स्थळे सुस्पष्ट होतील असे वाटते. शब्दकोशांत येऊ न शकणाऱ्या संदर्भादिकांचा खुलासा पुढील टीपात केला आहे. या टीपा अत्यावश्यक तेवढ्याच दिल्या आहेत. )

( १ ) **गर्भी अवतारु स्वीकरीला:** महानुभावांच्या मते गर्भ, पतित व दवडणे या तीन प्रकारांनी ईश्वर अवतार स्वीकारतो गर्भावतार=निसर्ग-नियमानुसार आईच्या गर्भातून बाहेर येणे. पतितावतार=एखाद्या मृत शरीरात प्रवेश करून अवतार घेणे. उदा:-चक्रधराचा अवतार हा पतितावतार होता. दवडणे=एखाद्या देहात असलेल्या जीवाला मुद्दाम तेथून काढून दुसरीकडे पाठवणे व आपण त्याचा देह स्वीकारणे. **वोंकारु न म्हणती :** कारण गोविंद प्रभु स्वतःच परमेश्वरावतार होते. दुसरे असे की ॐ शब्दाने निराकार परमेश्वराचे स्तवन होते; पण महानुभाव निराकार परमेश्वराचे भजन पूजन करीत नाहीत. ते सगुणोपासक आहेत. म्हणून 'वोंकार' म्हणत नव्हते. तसेच ॐ या शब्दाने ब्रह्मा विष्णु महेश या देवतांचे स्तवन होत असल्यामुळेहि गोविंद प्रभु वोंकार म्हणत नव्हते. ( २ ) **मेला जाय०** कोणाशीहि बोलतांना 'मेला जाय' अशी शिवी देण्याची गोविंद प्रभूला सवयच होती. तसेच एकच गोष्ट तीनतीनदा चारचारदा ते सांगत असत त्यावेळी त्यांचे पहिले व शेवटचे म्हणणे तेच काय ते खरे मानायचे असे. ( ६ ) **साधें:** श्रीचक्रधर स्वामींची एक शिष्या. हिचे मूळ नाव एल्हो असे होते. ली. च. भा. ३ पृ. ३३ व ३८ पहा. १८) **घोडेयावरि:** श्रीप्रभु खरोखरच घोड्यावर बसले होते असे नाही. एखाद्या दगडावर बसून त्यालाच घोडा म्हणून ते म्हणीत असत. अशा एकूण बारा पाषाणांचे त्यांनी घोडे बनवले होते. ते बारा संबंधी पाषाण घोडे म्हणून प्रसिद्ध आहेत (१९) **घाटे हरिभट:** लक्ष्मीद्रभट देऊळवाडेकर यांचे हे सासरे होते. (२८) **तीया आराति नां :** त्या घरी येत नव्हत्या; घरी जायला त्यांना वेळ नव्हता. **अपरोक्ष ज्ञानीया : विशेष ज्ञानीया :** हे ज्ञानियांचे प्रकार आहेत. ईश्वरापासून ज्याला प्रत्यक्ष शाब्द [ शब्दद्वारा ] ज्ञान झाले तो 'शाब्द ज्ञानिया.' शाब्दज्ञान

चरितार्थ (पूर्ण) झाल्यावर मग अपरोक्ष ज्ञान होते. अपरोक्ष ज्ञानियाला जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर या चारही पदार्थांचे स्वरूप स्पष्ट दिसते. या नंतरची पायरी सामान्य ज्ञानाची व त्या नंतर विशेष ज्ञानाची. विशेष–ज्ञानियाचे ज्ञान पूर्ण झाल्यावर – चरितार्थ झाल्यावर त्याच्या अविद्येचा छेद करून ईश्वर त्याला ब्रह्मानुभूति देतात. हाच त्याचा मोक्ष श्री. च. सू. पृ. ८५ व ८६ पहा. (३४) **विचार चिरा** : रितपुर येथील आपले निवास-स्थान जो राजमठ तेथून बाहेर पडून महाद्वाराजवळ असलेल्या एका पाषाणावर श्रीप्रभु दररोज उभे राहत. मग 'आज कोणीकडे फिरायला जावे' या संबंधी तेथे उभे राहून विचार करीत असत. म्हणून त्या विशिष्ट पाषाणाला 'विचार चिरा' असे नाव पडले. हल्ली हा चिरा शिल्लक नाही. तो संबंधी पाषाण असल्यामुळे भक्तांनी तो फोडून फोडून नमस्कारासाठी आपल्या घरी नेला. **टेंकाळी : खालाळी : प्रजना आळी** : रितपुर मधील कांही गल्ल्यांची ही पूर्वीची नावे आहेत. टेकडीकडे जाणारी गल्ली ती टेकाळी : एका सखल भागाकडे जाणारी गल्ली ती खालाळी आणि श्रीमंत लोकांची आळी ती प्रजना आळी. (३६) **सुतकासि बिजें करीति** : रितपुरातील एखादा माणूस मेल्यावर त्याला पोचविण्यासाठी स्मशानाकडे जाण्याची श्रीप्रभूंना बरीच सवय होती. त्यानंतर ज्या विहिरीवर ते स्नान करीत तिला 'सुतक' विहीर असे म्हणत. ही विहीर अजूनहि रितपुरला आहे. (४१) **मरणहार असे** : मरणार होते. श्रीप्रभूंना ही प्रायः नेहमीचीच सवय होती. एखाद्याच्या घरी मृत्यु व्हायचा असेल तर तत्पूर्वीच हे त्याच्या घरी जाऊन तिरडी बांधायला सुरवात करीत व अशा रितीने आगामी मृत्यूची सूचना देत. **कपाळ मोक्षन होय तवं** : जळणाऱ्या प्रेताची कवटी फुटे पर्यंत स्मशानात राहण्याची चाल अजूनहि आहेच. **सुतकासि** : ३६ व्या लीळेवरील टीप पहा **सोंदक विहीर** : सोंदक नावाने प्रसिद्ध असलेली रितपुरातील एक विहीर. **मग जयाचे...करीति** : एखादे प्रेत जाळून आल्यावर श्रीप्रभु ओले वस्त्र डोक्यावरून घेऊन, ज्या घरी पुढे कोणी लवकरच मरणार असेल त्या घरी जाऊन एका कोपऱ्यात बसत असत व अशा रीतीने त्या घरांत येऊ

घातलेल्या मृत्यूची पूर्वसूचना देत. (४९) **इदुरीचीय :** या ऐवजी एका प्रतीत 'इंदोरीचिय' असाही पाठ आहे. इदुरी (अथवा इंदौर) हे एका गावाचे नांव. (५६) **कर्मब्रह्मां मांनु देणे :** कर्मकांडाला व ब्रह्माला मान देणे. प्रथम कर्मकांडानुरूप क्रिया करणे व नंतर कशानेही लिप्त न होणाऱ्या 'ब्रह्म' स्वरूपाला शोभेल अशी क्रिया करणे. श्रीप्रभु हे स्वतः ब्रह्मस्वरूप असल्यामुळे उभ्याने मुतणे वगैरे क्रियांनी त्यांना बंधन प्राप्त होत नव्हते. 'श्रीप्रभु ते निर्गुण ब्रह्म' असे श्री चक्रधरांनी म्हटलेच आहे.(६६) **दादोस :** श्रीचक्रधराचे रामदेव नांवाचे एक शिष्य. **आंमचेयां गोसावियांसि :** श्रीचक्रधर स्वामीस. (६९) **नेमाळ पांडे :** एलिचपूर येथील राण्याचा प्रधान. याची स्त्री धानाइसा. धानाइसाने चक्रधराला आपल्या घरी नेऊन त्याचा मोठा पूजापुरस्कार केला होता. ली. च. एकांक. पृ. २३ पहा. **टेकिचेनि रायें :** देवगिरीच्या राजाने **टेक** हा शब्द त्यावेळी देवगिरीसाठी वापरीत असत असे दिसते. (७४) **एकांकी : राज्यधर्म :** श्रीचक्रधराच्या प्रयाणानंतर त्याचे सर्व शिष्य श्रीगोविंदप्रभुजवळ आले. त्या पूर्वीचा काळ तो श्रीगोविंदप्रभूचा 'एकांकी' काळ मानला जातो व तदनंतरचा काळ तो 'राज्यधर्म' काळ मानला जातो. **गुढा :** या नांवाचा एक पाषाण. (८४) **आंमुच गोसावी:** श्रीचक्रधर स्वामी. (८५) **चांगदेव राउळ:** श्रीचक्रधर. कारण भरवस येथील हरिपाळ देवाच्या मृत शरीरात चांगदेव राउळांनीच प्रवेश केला होता. ली. च. भा. १ पृ. ३ पहा. (९१) **फाटका पाओं सो नका :** अगोदरच फाटलेल्या कापडात आपला पाय घालून ते आणखी जास्त फाडू नका. श्रीप्रभु माझ्यावर रागावले आहेत हे एक दुःख मला आहेच. ते तुम्ही आपल्या या अशा बोलण्याने उगाच वाढवू नका. **समस्तळ आसन :** आरंभी श्रीप्रभु उकिडवे बसले होते पण महादाइसेने आसन रचल्यावर ते त्यावर सरळ मांडी मारून बसले. **सीरा ताट करणें :** पंक्तीमध्ये एखाद्याला मुख्य जागेवर बसविणे. (९३) **आबाइसा :** नागदेवाचार्यांची आई. स्मृ. स्थ. पृ. ३ पहा. (९४) **दाइंबा :** चक्रधराचा एक शिष्य. ली. च. भा. २ पृ. ४३ पहा.

(९६) **गर्धव :** गर्दभ; गाढव. (९७) **भावैची चतुर्दशी :** ज्येष्ठ वद्य १४ ला येणारा हा सण. या सणात ' पूर्वी जुन्नर देशी भावैचा सणा जोगी नागरावर बैसोनि निर्विकल्पतेतंव सकलांची अन्ने भक्षावी ऐसी वृत्ति असे. ' वाइदेशकरांचा विचार बंद. हाच सण वऱ्हाडात देखील असावा असे दिसते. **गुळाची भेली ०** पूर्वी गुळाच्या भेल्या (गोळे) लहान असत हे येथे लक्षांत ठेवावे. पंजाब प्रांतात आजहि तोंडात सहज घालता येण्याजोग्या गुळाच्या लहानलहान भेल्या तयार करतात. **म्हाइंभटीं ( मातंगा ) साष्टांग दंडवत घातले :** याचे कारण स्मृतच्यिा एका पोथीत पुढील प्रमाणे दिले आहे. 'मग तो मातंग पाठिमोरा जालाः आन म्हाइभटीं पाटी खालि ठेवीली : आन म्हणतिले : न मे प्रियश्चतुर्वेदी मद्भक्तश्वपच : प्रिय : । तस्य दहोती तदग्राह्यीत्तस्य पुजामहं यथा : मज देव दाखवीला म्हणोनि तयासि साष्टांगी नमस्कार घातले : ' (९९) **रामदरणा :** एलिचपूरचा राणा. ली. च. एकांक पृ. ३८ पहा. हा यादवांचा राणा असावा असे लीला-चरित्राच्या वाइदेशकर पाठातील हकीकतीवरून कळते. **नरसींगदरणा :** रामदरण्याचा पुत्र. **चिरणी चीरली : (** चिरणी = आडोमा, अडथळा ) त्याजभोवती असलेला सेवकसमूह विभागून–दूर सारून तो पुढे गेला. **वेले लावुनि :** एखाद्याला भोवतालच्या गर्दीचा त्रास होऊ नये म्हणून ( किंवा तो पळून जाऊ नये म्हणून ) त्याच्या भोवती अनेक माणसे एकमेकांच्या हातात हात घालून कडे धरतात. त्यास वेले लावणें असे म्हणतात (११४) **इतोके दीस...साच :** आम्ही इतके दिवस जशा रीतीने हातपाय धूत होतो ते व्यर्थ होते. आता गोसाव्यांनी जसे हातपाय धुतले तसे धुवायला पाहिजेत. (११६) **हरी मां :** श्रीप्रभूंनी नागदेवाचार्याला ठेवलेले नांव (११७) **दवणयाचे पर्व :** दमनक पर्व. चैत्र शुद्ध १५ या दिवशी देवावर व गुरुवर दवणा वाहतात. (१२०) **माचाचि चहु ०** चार बाजूंनी धरून पलंगच त्यांनी बाहेर काढला. (१२१) **खोडी :** नागदेवाची आई आबाइसा, हिला श्रीप्रभु खोडी या नावाने हाक मारीत. याचे कारण पुढे १२७ व्या लिळेत दिले आहे, ते पहा. **देंव देओ दीधला ०** देवें [ श्रीगोविंदप्रभु ]

दिधला : श्रीचक्रधरांनी मला तुमचे सेवादास्य करण्यास सांगितले, पण रुपाई व उमाई ह्या मला ते दास्य करूं देत नाहीत. त्यांनी जणु माझ्या हातातील देव (श्रीप्रभु) हिराऊन घेतला. **दर्भेयाची दर्भी :** श्रीप्रभूच्या तोंडी असलेली एक शिवी; दुर्वेप्रमाणे क्षुल्लक. (१३२) **लोण नाही जे०** चिंचेबरोबर खाण्यासाठी माझ्याजवळ मीठ नाही असे नाही. म्हणजे आबाइसाला-माझ्या आईला-वस्त्र विकत घेण्यासाठी माझ्याजवळ पैसा नाही असं नाही. पण तसे केले तर तुम्ही असे म्हणाल की ० (१२५) **भावे दोवे सोंपणे :** ज्येष्ट वस्त्र अमावस्येच्या दिवशी देवावर फुलोरा (खाद्य पदार्थ) वगैरे बांधून तो हरीयाळींनी म्हणजे दुर्वांनी शिंपण्याचा सण. (१२६) **दोहीं देवाचे :** श्रीचक्रधर व श्रीगोविंदप्रभु या दोन्ही ईश्वरावतारांचे. (१३४) **खडे घालणे :** जादूटोण्याच्या प्रकारात खडे फेकण्याचा एक प्रकार. (१३८) **सोभागा :** दायंबाची आई. ही फार कुरूप होती. तिचे दात फार पुढे होते. तरी आपण नवऱ्याच्या फार लाडक्या आहोत असे तिने चक्रधराला जेव्हा सांगितले तेव्हा त्यांनी तिला "तर मग तुम्ही खऱ्या सोभागा (सौभाग्यवती) आहात" असे म्हटले. तेव्हांपासून सोभागा याच नावाने ती ओळखली जाऊ लागली. ली. च. भा. ३. पृ. ३ पहा. **भोजा :** दायंबाला चक्रधर भोजा (भोजराज) म्हणत असत. कारण एकदा त्याने चक्रधराला भोजराजाची गोष्ट सांगितली होती म्हणून. ली. च. उत्तरार्ध. (१४०) **दादुलेयाचे आवगौनि आली :** पुरुषाचे सोंग घेऊन, पुरुषाचा वेष करून आली. (१४४) **बाइलेचे आवगौनि आला :** स्त्रीचा वेष करून आला. (१५६) **निदैवाचे निदैवे :** दुर्दैव्यातील दुर्दैवी–अत्यंत दुर्दैवी स्त्रिये. (१६१) **करंड मळा :** एका मळयाचे नांव. (१६७) **बावना पळाचे :** अठ्ठावीस ढब्बूंचे वजन म्हणजे एक पळ. अशा बावन पळांचे ते नाट होते. तितके ते वजनदार होते. **भिक्षा करणे :** संन्यासदीक्षा घेणे. (१६९) **पाणियें दीवा पाजळला होता :** [मरणापूर्वी] पाण्याने दिवा मोठा होणार होता. म्हणजेच मृत्यूचा अनर्थ ओढवणार होता. (१८६) **आउसा :** चक्रधराची एक शिष्या. ही जोगीण होती. ली. च. भा. ४ पृ. ४९ ते ५२ वर हिची हकीकत पाहावयास सापडेल. (१८८) **आतां हा**

**नार्णी रे :** येथे आउसा या स्त्रीने स्वतःला उद्देशून 'हा' असे पुल्लिंगी सर्वनाम वापरले आहे. याचे कारण असे की आउसा आपणास स्त्री कल्पून कधीच बोलत नसे, तर नेहमी पुरुष म्हणूनच आपला उल्लेख करीत असे. (१९१) **जोगियातें ऐसेंचि म्हणें :** जोगी लोकांना काय असेच [ विंचू वगैरेंची हिंसा करण्याचे ] सांगितले आहे ? '(१९४) **असती-परी :** आचार धर्म. श्रीच. सू. पृ. ८९ पहा. (१९५) **चारी यक लांक :** असा पदच्छेद करावा. लाक [ ख ] नावाचे एक धान्य आहे. (२१२) **आमचां गोसावियांसि :** श्रीचक्रधर स्वामींना. **गणपतिमठ :** पैठण येथील एक स्थान. (२१६) **श्रीचरणवरि विध्वंसिली :** श्रीप्रभूंनी आपल्या लाथेने त्यांचा नाश केला—चेंदली. २१७) **उळीचा कांदा :** पातीचा हिरवा कांदा. (२२४) **तुरीया थाट गाए :** तुऱ्यांच्या वाद्यांचा थाट गायन कर. (२७२) **मसी घसी :** चिखलमातीने बरबटलेला. आचार. सूत्र ४४ पहा. (२८१) **कल्पी नीगाले :** कल्पी पुराणात आढळले. **नाहं मनुष्यो ०** हाच श्लोक चक्रधराच्या तोंडीहि आहे. 'गोसावियासि गणपतमढीं अवस्थान : एकवेळ गोसावियांच्या दर्शना प्रज्ञासागर संन्यासी आले : तेही दंडवत घातले : श्रीचरणां लागले : मग तेही गोसावियातें पुसीलें : 'जी जी : गोसावी कवण काइं :' गोसावी म्हणीतले 'नाहं मनुष्यो ० '... एकी वासना : हा श्लोक श्रीप्रभु गोसावी द्रावडदेशीचिया ब्राम्हणाप्रती म्हणीतला : तयाचे नांव कृष्णश्रमा ( कृष्णशर्मा ) भट : हे परसराम बासाची बासना' प्रकरणवश. (२८६) **चामुचोरु :** चामड्याची चोरी करणारा. अर्थात परस्त्रियाशी व्यभिचार करणारा. (२९३) **पवित्रा अंगुलिया :** दुर्वांकुराच्या मुद्रा बोटात घालून त्यांचे शेपटे खाली सोडणे. (३०९) **रान वळघणे :** रानोमाळ भटकणे :



# व्यक्तींची सूची

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| प्रस्तावना | | | |
| ९ | ३ | प्रत्यायापूर्वी | प्रत्ययापूर्वी |
| १० | ३ | आधुधिक | आधुनिक |
| १४ | १३ | आहे | आहे. |
| १४ | २५ | तिसऱ्या | तिसरे रूप |
| १४ | २६ | नव्हे | नव्हे. |
| १८ | १४ | हरिव्रास | हरिव्रास— |
| २२ | १२ | जाणिवेनेंचे | जाणिवेनेंच |
| २३ | २८ | कर्तृमकर्तृम० | कर्तुमकर्तुम० |
| २६ | १३ | धराच्या | धरांच्या |
| ३१ | २७ | प्रस्तावतेच्या | प्रस्तावनेच्या |
| ३४ | ७ | पाहिजे | पाहिले |
| ४४ | १७ | गुंडु गंडु | गुंडु गुंडु |
| मूळग्रंथ | | | |
| ८ | २७ | पांणा | पांणी |
| १६ | २४ | वाडा | वीडा |
| १७ | ११ | धरांसि | घरांसि |
| २२ | २३ | मनोंरर्थु | मनोर्थु |
| ३१ | ४ | जेवासि | जेवीसि |
| ३५ | २५ | नणे | नेणे |
| ३६ | २० | दव | दैव |
| ३९ | १४ | हरी मां | हरीमां |
| ५० | २४ | १५२ | १५१ |
| ५४ | १५ | भग | मग |
| ६९ | १० | नै यंचि | नैयंचि |

| | | | |
|---|---|---|---|
| ६९ | २४ | ब्रखें | बरवें |
| ७० | ८ | समदृष्टि | समै वृष्टि |
| ७३ | २७ | आंत्रे | आंत्रे |
| ७६ | १४ | दाडीयवरी | दांडीयवरि |
| ७७ | १२ | वसेति | वसति |
| ७९ | १४ | पजरु | पंजरु |
| ८३ | १२ | मगतीजनें | भगती जनें |
| ८६ | १९ | गुडुनि | गुंडुंनि |
| ८९ | १४ | भग | मग |
| ९४ | २० | मज | मग |
| ९६ | १५ | १८२ | २८१ |
| ९९ | २६ | पुढलिाचां | पुढीलाचां |
| १०३ | १९ | तकमठ | तुकमठ |
| १०४ | ८ | ३६७ | ३०७ |
| १०७ | २६ | बाहीरि तीचा | बाहीरितीचा |
| १०८ | ७ | नीरोपीलें | नीरोवीलें |
| १०९ | ६ | पुरते | पुर तें |